# सच्चिदानन्द-सोपान

अर्थात्

## श्री उपासनी महाराजांचीं बोधवचनें



संकलन

हसमुख धीरजलाल सांकलिया

# सच्चिदानन्द-सोपान

अर्थात्

## श्री उपासनी महाराजांचीं बोधवचनें



संकलन

हसमुख धीरजलाल सांकलिया



# आ शी र्वा द

श्रीसंत सद्गुरू उपासनीबाबा महाराजांच्या अनुभवसिद्ध अमृत-वाणींतून निघालेलीं हीं तत्त्वबोधवचनें ! श्रींचे परमभक्त डॉ. ह. धी. सांकलिया यांनीं त्यांचा अभ्यास करून लोकोपयोगासाठीं हें पुस्तक प्रसिद्ध केले.

संतांची वाणी ही गगनभेदी आकाशवाणी आहे. संतांना त्यांच्यासमोर जगाचे अदृश्यदृश्य सर्व समोर दिसते. त्याप्रमाणें ते जगाला ओरडून टाहो फोडून सांगत असतात कीं, हीं तत्त्वें तुम्ही अंमलांत आणा. त्यांचा विचार करा. तसे वागा म्हणजे, तुम्हांला संसारात, परमार्थांत केव्हांही कांहींही अवघड जाणार नाहीं. हीं तत्त्वें म्हणजे संतांच्या दिव्य ज्ञानाचें दर्शनीय रूप ! वाङ्मयरूपानें संत प्राणिमात्राच्या अंतःकरणांत वास करोत. संतवाणीचा गंगाप्रवाह मनुष्याचे मनबुद्धी शुद्ध करून जगाचें कल्याण होवो.

कन्याकुमारी स्थान
साकोरी
दि. ५-१-७१

**सती गोदावरी माता**

# प्रस्तावना

श्री-सद्गुरु उपासनीबाबा हे पूर्ण पदाला पोहोंचलेले ऐक अद्वितीय सत्पुरुष होते. त्यांच्या निमित्तानें जें जें घडत असे, तें सर्व अहेतुक असे. विशिष्ट उद्देशानें त्यांनीं काहींच केलें नाहीं. त्यांच्या संबंधानें जें जें घडलें, तें तें सर्व परमेश्वरी इच्छेनेंच घडत गेलें. श्रीबाबांच्या मुखकमलांतून जी प्रवचनें बाहेर पडलीं त्यांबाबतही असेंच होतें. सद्धर्मसंरक्षणासाठीं परमेश्वरी इच्छेनेंच सकल शास्त्रें स्वयंभू त्यांच्या मुखांतून बाहेर पडलीं. त्यांचें हें बोलणें देवांनाही त्यांच्या सुधेप्रमाणें प्रिय होण्याजोगें झालें. त्यामुळेंच श्रीबाबांच्या प्रवचनांना श्रीउपासनी–वाक्सुधा असें सार्थ नांव प्राप्त झालें.

श्री उपासनीबाबा जेव्हां साकोरींत पिंजऱ्यांत राहिले होते, तेव्हां त्या पिंजऱ्यांतून श्रीबाबा तासचे तास बोलत. त्यांचीं तीं प्रवचनें ' श्रीसाई–वाक्सुधा ' या नांवानें पुढें प्रसिद्ध झालीं. कारण श्रीसाईबाबाच श्रीबाबांच्या मुखांतून बोलत. यांतूनच पुढें " श्रीउपासनी वाक्सुधेचा " जन्म झाला. या वाक्सुधेचे एकूण पांच भाग आहेत. भाग १ ला ४५५ पृष्ठें, भाग २ रा ५०१ पृष्ठें, भाग ३ रा ४८२ पृष्ठें, भाग ४ था ५१४ पृष्ठें आणि प्रत्येक पृष्ठाच्या कमींत कमी वीस ओळी धरल्या तरी सुद्धां ४८४८० म्हणजे सुमारे पन्नास हजार ओळींचे हें एक अद्वितीय ज्ञानभांडार आहे. ह्यांत वेदविद्या, उपनिषद्, अद्वैत, द्वैत, तत्त्वज्ञान, भक्ति, पूजा, वर्णव्यवस्था, राजकीय घडामोडी, आचार-विचार इत्यादींचा समावेश झालेला आहे.

पूर्वी मीं हें सर्व कांहीं संपूर्ण वाचलें नव्हतें. परंतु योगायोगानें १९४० मध्यें मी बाबांच्या सानिध्यांत आलों आणि त्यांचें शिष्यत्व पत्करलें. तेव्हां बाबांची अशी इच्छा होती कीं, उपासनी-वाक्सुधेचा इंग्रजी अनुवाद माझ्याकडून केला जावा. त्याप्रमाणें तें कार्य हातीं घेऊन मी प्रयत्न

करीत होतों. परंतु माझ्या कार्यांच्या व्यापामुळें मला त्याची पूर्तता करतां आली नाहीं. त्यानंतर दोन वर्षांपूर्वी म्हणजे जुलै १९६८ मध्यें गुरु-पौर्णिमा आम्ही साकोरीला केली. त्याच वेळीं बाबांच्या जन्मशताब्दीच्या योजनेचा विचार चालू होता. आणि साकोरीहून परत येत असतांना मला असें वाटूं लागलें कीं, उपासनी-वाक्सुधेच्या पांच भागांच्या इंग्रजी अनुवादाच्या कार्याच्या अगोदर त्यांतील मुख्य मुख्य विचार एकत्रित करून त्यांचा एक आटोपशीर असा संग्रह त्यांच्या शताब्दीच्या वेळीं प्रसिद्ध करावा. तसेच ह्या संग्रहाचा इंग्रजी अनुवाद करण्याची पण माझी इच्छा आहेच.

अशा प्रकारें मी त्या विचारांचें संकलन पूर्ण केलें आणि श्रीबाबांच्या शताब्दीसमारंभाच्या वेळीं १५ मे १९७० ला सती गोदावरी माताजींच्या दृष्टीपुढें ठेवलें. त्यांच्याच इच्छेनें आणि अनुमतीनें हें प्रसिद्ध होत आहे. श्रीउपासनी वाक्सुधेचे पाचही भाग हे सध्या अतिशय दुर्मिळ झालेले आहेत. परंतु कोणी जिज्ञासूने जर ते वाचले, तर त्यांतून शांती, समाधान आणि आनंद हे त्याला जरूर प्राप्त होईल.

श्रीगुरुनाथ श्रीधर बोकील यांनीं मला पांचवा भाग वाचावयास उपलब्ध करून दिल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. जर ह्या पाचव्या भागाचें पुनर्मुद्रण शक्य झालें, तर मराठी वाङ्मयांत तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि भक्ति या वाङ्मयात अधिक भर पडेल.

हे संकलित विचार वर्णानुक्रमानुरूप गुंफलेले आहेत; तथापि नैसर्गिक रीत्याच 'सच्चिदानंद अवस्था' कशी प्राप्त करून घेतां येईल, याचा मार्ग सूचित केलेला आहे. आणि म्याचें नांव 'सच्चिदानंद-सोपान' असें दिलें, तर तें अगदी यथार्थ होईल.

विजयादशमी
दिनांक १० ऑक्टोबर १९७०

ह. धी. सांकलिया.

# अनुक्रमणिका

* * *

## अनुष्ठान

तेच गुणधर्म आपल्यामध्यें येण्याकरतां कोणत्यातरी एका स्थानीं दृढ आसन कायम करून जी सत्करणी केली जाते, त्याचीच अनुष्ठानांत गणना होते. श्रीउवा. ४. ७. ११४

अनुष्ठान पद्धतीनें जीं सत्कर्में किंवा ध्यानधारणा केली जाते, त्यायोगें त्रास देणाऱ्या बाह्य विषय वस्तूंचा विसर पडत जातो; व परमेश्वरी संबंधांत आणि उपास्य देवतेसंबंधांत मनाचा ओघ वाढत जाऊन, मनाची एकतान वृत्ति होऊं लागते; व मग पुढें शरीराचेंहि भान कमी कमी होत जाऊन परमेश्वरी आनंद घेण्यायोग्य अशा दिव्य शरीराचा अनुभव येऊं लागतो. श्रीउवा. ४. ७. १०६

व्यवहारी प्रिय वस्तूच्या आधारेंसुद्धां असें अनुष्ठान होऊं शकतें; परंतु त्या प्रिय वस्तूच्या ठिकाणीं प्रेमाची परिसीमा झाली पाहिजे. श्रीउवा. ४. ७. १०७

अनुष्ठानाची मुख्य जरुरी चित्तशुद्धीसाठीं असते. श्रीउवा. ४. ७. ११४

मनुष्यांपैकीं कोणत्याहि जातीधर्मवाल्यांना ऐहिक किंवा पारलौकिक सुखाच्या प्राप्तीसाठीं, इष्ट हेतु पूर्ण होण्यासाठीं परमेश्वराची कृपा व्हावी म्हणून ज्याची ज्या देवतेवर भक्तिश्रद्धा असेल, त्या देवाची उपासना अनुष्ठान, तपश्चर्या, भजनपूजन इत्यादि करणें असेल तर त्याकरत

एखादें एकांत स्थान ठरवून ठेवावें; व त्या अनुष्ठानाची क्रिया करण्यासाठीं वेळहि कायम करून ठेवावी. श्रीउवा. ४. ७. १२३

म्हणजे अनुष्ठानाची जी ठरलेली वेळ असेल ती तशी देवालाच देऊन टाकली असें ठरवावें. श्रीउवा. ४. ७. १२२

ईश्वराला दिलेल्या वेळेंतच मृत्यु यावा म्हणून ईश्वरासाठीं चोवीस तासांतून कोणती तरी वेळ ठरवून, ती त्याला अर्पण करून टाकावी; व त्यावेळेंत इतर कोणतींहि व्यवहारी कर्में न करतां कोणतींहि सत्कर्मेंच करीत रहावें. श्रीउवा. ४. ७. १२५

अनुष्ठान करतांना जर कोणकोणाच्या मनाची चलबिचल होऊं लागली; मन, कांहीं विचार करूंच लागलें, तर त्याबद्दल वाईट वाटूं न देतां मन जिकडे भटकेल तिकडे भटकूं द्यावें, परंतु आपण जी नियमितपणानें सत्कर्माची क्रिया चालू ठेवली आहे, ती बंद पाडूं नये.

श्रीउवा. ४. ७. १२८

या गोष्टींत कोणतेंहि विघ्न आलें तरी जुमानावयाचेंच नाहीं, न जुमानणें ही तरी महत्त्वाची तपश्चर्याच, सत्क्रियाच आहे. श्रीउवा. ४. ७. १२८

कोणत्याहि प्रकारें असह्य असे शारीरिक व्याधि उत्पन्न होऊन जर विघ्न येऊं लागलें, कीं ज्यायोगें ती क्रियाच होऊं शकत नाहीं, अशा विघ्नाला जुमानिलें पाहिजे. अशा वेळीं झालें असेल तितकेंच अनुष्ठान बंद ठेवून शारीरिक व्याधि दूर करण्याचा उपाय केला पाहिजे.

श्रीउवा. ४. ७. १२८

तसेंच कांहीं राजकीय–म्हणजे सरकारकडून कांहीं विघ्न आलें तर तें सहज रीतीनें सौम्य उपायानें, गोड शब्दानेंहि जर टळत नसेल, तर तशा विघ्नाला जुमानलें पाहिजे; व सरकारी आज्ञेप्रमाणें जो बरावाईट भोग आला असेल, तो भोगल्यावर पुन्हा पूर्ववत् अनुष्ठानास सुरवात करून चालू ठेवावें.

श्रीउवा. ४. ७. १२९

ती आहे तोंपर्यंत दुःखाचा जंजाळ आपल्याभोंवतीं येणारच. अशा प्रकारें अनुष्ठान करीत असतां विश्वास ढुमानूं नये. देवाच्या पायीं जर जीव गेला, तर त्या जीवनाचें जीवपण जाऊन सुखरूप अशी शिवअवस्था येते.

श्रीउवा. ४. ७. १३२

मुदतीपर्यंत तो निश्चय कायम टिकला, तर इष्ट देवता तेथें प्रकट होते.

श्रीउवा. ४. ७. १३२

ती इष्ट देवता दोन प्रकारें प्रगट होतें. एक तर इष्ट देवता आपणच आहोंत, असा अनुभव येतो, किंवा ती इष्ट देवताच आपल्यापुढे येते. ज्या वेळीं ती इष्ट देवता आपणच आहोंत असा अनुभव येतो, तेव्हां स्वतःच्या स्थितीला विसरून ज्या देवतेचें ध्येय धरून आपण अनुष्ठानाला बसलों, तेंच आपण आहोंत असें भान होतें. श्रीउवा. ४. ७. १३२

त्याचीहि कालमर्यादा आहे. प्रथम पुसट पुसट तें भान होतें; पुन्हां देहभान येतें. असें पुढें पुढें पुष्कळ वेळ होतें, तरीं तें एक विघ्नच आहे असें समजून त्याचा हर्ष-विषाद मानूं नये. आपली क्रिया भंग करूं नये, ती तशीच सारखी चालू ठेवावी, म्हणजे हळूहळू त्या इष्ट देवतेचें ध्यान पूर्ण होतें.

श्रीउवा. ४. ७. १३३

त्याच्या पूर्णतेनंतर अनुष्ठान करणारा पुढें व इष्ट देवता आसनावर बसलेली दिसते; व ती पुढें असतांनाच दर्शन होऊन उपदेश वगैरे कांहीं होणें असेल तर तो होतो. म्हणजे आपण होतों इष्ट देवता, व इष्ट देवता होते अनुष्ठान करणारी.

श्रीउवा. ४. ७.१३३

अनुष्ठान किंवा सत्कर्म करावयाचें त्याचा उपयोग काय आहे? तर असत् जें असेल तें शुद्ध सत्मध्यें आणण्याचा, किंवा कितीहि अपवित्र असेल तरीहि तें पवित्र करण्याचा गुण त्यामध्यें आहे.

श्रीउवा ४. ८.१५७

★

## अनुग्रह

ईश्वर कोणावर अनुग्रह करतो ? म्हणजे कोणाला तो आपल्यामध्यें घेऊन आपले गुणधर्म देतो ? तर ज्यानें परमेश्वराला आपल्यामध्यें आपले ठिकाणचे असलेले मनुष्यपणाचे गुणधर्म दिले, त्याला भगवान अनुग्रह या शब्दानें आपलासा करतो. श्रीउवा. ५. २५. ३८९

प्रथमतः आपलेकडून परमेश्वरास पूर्णपणें हृदयांत ग्रहण केलें गेलें, म्हणजे परमेश्वरहि आपल्याला हृदयांत ग्रहण करतो. म्हणजे त्याच्यांत व आपल्यांत फरक रहात नाहीं. म्हणजेच परमेश्वरानें आपल्यावर अनुग्रह केला असें होतें. श्रीउवा. ५. २५. ३८९

परमेश्वरी अनुग्रह होण्यास प्रथम लहान वयापासूनच मुलामुलींना त्यांच्या वाडवडिलांकडून किंवा पालकांकडून किंवा शिक्षकाकडून परमेश्वरी बाजू कशी हृदयांत सांठवावी, याबद्दलचेंच शिक्षण व वळण प्रथमपासून देण्याची वहिवाट ठेवली गेली पाहिजे. श्रीउवा. ५. २५. ३९०

बहुतेक आयुष्य असद्विवेचें शिक्षण, व विषयलंपट स्थितींत प्रपंच करतां करतां निघून गेलें; मग म्हातारपणीं परमेश्वरी विचारांचें हृदयांत ग्रहण होऊन परमेश्वरी अनुग्रह कसा होणार ? श्रीउवा. ५·२५·३९२

## अभिमान

कोणत्याहि बऱ्यावाईट गोष्टींचा आपले ठिकाणीं थोडाहि अभिमान शिरला न पाहिजे. त्याची शेवटची मर्यादा म्हणजे आपण कोणत्या आई-बापाचे आहोंत, याचाहि विसर पडला पाहिजे. श्रीउवा. २. १. ३.

आपल्याला वाटतें आपण कोणी निराळेच आहोंत. परंतु आपल्या-

विषयीं आपण कोणत्याहि प्रकारें निराळें मानून न घेतां, खास परमेश्वर जो, तोच आपल्या सर्वांच्या व सर्व जगाच्या रूपानें आहे असें निश्चित जाणावें. श्रीउवा. २. ५. ९०

परमेश्वरासाठीं लज्जा, भय, संशय सुटून ज्याची पूर्ण निरभिमान वृत्ति झाली त्याचें आपोआप असें बनतच असतें. श्रीउवा. २. ३४. ४३६

कोणाहि सत्पुरुषाला कोणी वाईट वगैरे म्हटलें तर आंतून बाहेरून वाईट वाटत असेल तर तशा अपूर्ण सत्पुरुषांनीं त्या लोकांचे उपकार मानून तें सर्व सहन करून आपल्या सत्पुरुष अवस्थेच्या पूर्णतेकरतां सहनशीलपणाचा व निरभिमानपणाचा अभ्यास वाढवावा.

श्रीउवा. २. ३४. ४४२

माझे ठिकाणीं आलेली ही पूर्ण परब्रह्म अवस्था याला तरी मूळ बीज पूर्ण निरभिमानपणाच आहे. श्रीउवा. २. ३४. ४३५

कोणत्याहि प्रकारांनीं जर तुम्हीं आजच निरभिमानी व्हाल, तर आजच तुमचे स्वतःचे ठिकाणीं आणि सर्वत्र परब्रह्माची जाणीव होईल.

श्रीउवा. २. ३४. ४३५

कोणतींहि पुराणें वाचणें, श्रवण करणें व त्याचप्रमाणें वागणें; तसेंच कोणत्याहि प्रकारें परमेश्वरासंबंधीं सत्कर्में करणें, हे सर्व निरभिमान होण्याचे उपाय आहेत. श्रीउवा. २. ३४. ४३४

अशी माझ्या ठिकाणीं असलेली पूर्ण परब्रह्म अवस्था ज्याला कोणत्याहि प्रकारांनीं जितक्या प्रमाणांत लक्षांत येत असेल, तितक्या प्रमाणाचा तो म्हणणाराच निरभिमानी असतो. श्रीउवा. २. ३४. ४३५

म्हणून जन्म घेतल्यापासून आयुष्य संपेपर्यंत संसार प्रपंचांत, व्यवहारांत राहून जसे निरनिराळ्या अभिमामानाची भर होण्याकरतां तशीं तशीं कर्में करून तसें वागलें जातें; तसेंच आलेल्या अभिमानापासून निरभिमान होण्याचे उपाय आयुष्य संपण्यापूर्वीं या जन्मांतच करणें हें

प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. श्रीउवा. २. ३४. ४३४

जन्म होऊन संसार, प्रपंच इत्यादि व्यवहारी बाजूंत जे निरनिराळ्या तऱ्हेचे लहानमोठे अभिमान मनुष्यांमध्यें आलेले असतात तेच अभिमान परमेश्वरी खऱ्या सुखांत जाण्याला अडथळा ठरला गेला आहे. श्रीउवा. २. ३४. ४३४

सर्व पापांत अभिमान हेंच अत्यंत महत्त्वाचें पाप मानलें जातें. श्रीउवा. २. १८. २६१

पुन्नाम नरक म्हणून एक निराळा नरक आहे असें नाहीं. तर पुरुषाभिमान व त्या अभिमानानें वागणें हेंच महापाप; हेंच पुन्नाम नरक. श्रीउवा. ४. २५. ३९२

पोकळ अभिमानाच्या मोठेपणांत जे पडले असतील, ते केव्हांही अभयंकर दुःखकारक अधोगतीची तयारी करतात असें होतें. श्रीउवा. ३. २१. ३२०

सर्व पापांत अभिमान हेंच महत्त्वाचें पाप मानलें जातें; व परमेश्वरप्राप्तीस अभिमानाचाच खरा अडथळा असतो. श्रीउवा. ३. १८. २६१

अभिमान सुटणें म्हणजे सर्व दुःखरूपांतून आपण मोकळें होणें. आतां अभिमान कसा सुटला जातो, तर दुःखरूपानें असलेलें प्रारब्ध जसजसें आपल्याला दुःख देत जातें तसतसें आपण सहनच करीत गेलों म्हणजे सहन करतां करतां ती करणी व तें प्रारब्ध मरून जातें; म्हणजे दुःखरूप अवस्थेंतून व सर्व प्रकारच्या अभिमानांतून आपण सुटतों. हाच अभिमान सुटण्याचा कर्मप्रारब्धक्षयाचा उपाय आहे. सहन करणें ही तर करणीच कीं नाहीं ? असें म्हणाल तर ती जी करणी आहे ती प्रारब्ध बनविण्यास कारण होत नाहीं. श्रीउवा. ३. ९. १४८

जोंपर्यंत फालतू विषयांचें हावडें आहे तोंपर्यंत जीतेपणा व अभिमान; जोंपर्यंत अभिमान आहे तोंपर्यंत सुखदुःखाच्या रूपानें आपणच असतों. श्रीउवा. ३. ९. १४८ *

## अहंकार

त्यांनीं इथें देवळाप्रीत्यर्थ चुना-माती उचलली, त्यांनीं त्रास सोसला' जीवनानें, मनानें, शरीरानें, द्रव्यानें ते झिजले, आणि देवाप्रीत्यर्थ अहंकार कमी करून टाकला. श्रीउवा. ३. १. १२६

मी अमुक अधिकारी आहें हा अभिमानच आपल्या स्वतःच्या पोटाच्या उद्योगाला किंवा परमेश्वरी सत्कृत्याला वळ असूनहि शरमेच्या रूपानें आडवा येत असतो. श्रीउवा. ३. ७. १२४

मी अमुक आहें, तमुक आहें, अशा रीतीचा जो कांहीं अहंकार, अभिमान हा गेला म्हणजे सर्व कांहीं करायला आपोआप बळ येतें. श्रीउवा. ३. ७. १२५

आणि परमेश्वरासाठींच हा अभिमान गेल्यामुळें परमेश्वराचे ठिकाणीं असलेलें जें स्वाभाविक सर्व प्रकारचें बळ तें आपोआप आपल्यांत प्रवेश करतें. श्रीउवा. ३. ७. १२६

आपल्या बाह्य शरीराला जसजसे लोक चांगलें म्हणतात, तसतसा त्या लोकांच्या मनाचा व लोकांनीं आपल्याला चांगलें म्हटल्याबद्दल उत्पन्न झालेल्या अभिमानाचा मळ आपल्याकडे येतो, आणि आपण अधिकच मूर्ख आणि पापी बनत राहातों. श्रीउवा. २. २९. ४९५

शरीराला पाहून लोकांनीं चांगलें म्हणावें, म्हणून बाह्य शरीराला नटविण्याची जसजशी आसक्ति वाढवावी, तसतसे निरनिराळ्या वासनेनें व मूर्खपणांच्या विचारानें मन व जीव अधिकाधिकच मूर्ख, पापिष्ट घाणेरडा बनतच राहतो; व मग आपण केवळ देहाभिमानी बनून मूर्ख ठरले जातों. श्रीउवा. २. २९. ४९४

मत्सराचा नाश होण्यास प्रथम अभिमानाचा नाश झाला पाहिजे. श्रीउवा. ४. ४. ५९

कारण अभिमानाचा नाश झाला म्हणजे मत्सराचा नाश होतो; व मग त्याला षड्रिपू रहात नाहींत. श्रीउवा. ४. ४. ६०

परंतु स्वतःचे ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेचें मोठेपण ईश्वराच्या इच्छेनें आलेलें नसून, कोणी कोणी केवळ पोकळ अभिमानानें मोठेपणा व पुढें पुढें करून घेण्याचा आव आणतात. श्रीउवा. ४. ५. ७३

हें प्रत्येक पुरुषाभिमानी मनुष्याजवळ आहेच. असा पुरुषाभिमान व त्याप्रमाणें दुष्ट वागणूक जोंपर्यंत आहे तोंपर्यंत जन्ममरणापासून मुक्ति, ब्रह्मसुख, स्वर्गसुख किंवा ऐहिक सुखाचीहि धड प्राप्ति होत नसते. षड्रिपूंचें मुख्य उत्पत्तीचें कारण कोणतें ? तर अज्ञानपणानें दुःस्वभाव, दुराग्रह ग्रहण करणारा अभिमानी अहंकार. श्रीउवा. ५. २१. ३३९

अभिमानानें शक्ति कमी होते असा नियमच आहे.

श्रीउवा. ५. १२. २२०

आपल्याहून दुसऱ्यास श्रेष्ठत्व देण्यास तो खूष नसतो. त्या प्रकृतीचा धर्मच तसा. शिवाय आपल्यापेक्षां कोणी श्रेष्ठ असावा असें वाटत होतें काय ? परंतु प्रसंगामुळें कोणास तरी श्रेष्ठत्व द्यावें लागतें म्हणून दत्तात्रयाकडे शंकर गेले. श्रीउवा. ४. ४. ५९

परंतु श्रेष्ठास शरण जाऊन फायदा होत नाहीं म्हणून आपल्यापेक्षां जो कमी असेल त्यास शरण गेलें पाहिजे; असा शंकरांनीं दत्तात्रेयाकडून बोध करून घेतला. श्रीउवा. ४. ४. ५९

दत्तात्रेय श्रेष्ठ म्हणून शंकर शरण गेले. श्रीउवा. ४. ४. ५९

अभिमान असला म्हणजे बळ असूनहि तें नाहींसें होतें.

श्रीउवा. ३. ७. १२४

*

## अव्यक्त शक्ति

त्याचप्रमाणें ज्या वेळीं अव्यक्त शरीर अव्यक्त पोषक द्रव्यानें सशक्त होतें आणि स्थूल शरीराला त्याचें पोषक द्रव्य न मिळाल्यामुळें तें अशक्त होतें, त्या वेळीं मग कुऱ्हाडीप्रमाणें त्या स्थूल देहाची योग्यता होऊन, त्या अव्यक्त शरीरांतील जीव, स्थूल देहाला त्या कुऱ्हाडीप्रमाणें घेऊन मोठमोठीं श्रमाचीं कामें करतो. श्रीउवा. ३. २७. ३७०

आणि तें अव्यक्त मानसिक शरीर केवळ बाह्य जें स्थूल शरीर त्याचा आधार घेऊन वाटेल त्या शक्तीचें काम करतें. श्रीउवा. ३. २७. ३६९

आपण अव्यक्त अवस्थेचा देखावा पाहण्याच्या योग्यतेचे जेव्हां होऊं, त्या वेळीं हा सगळा प्रकार अनुभवाला येतो. श्रीउवा. ३. २७. ३८१

हा अदृष्ट अवस्थेचा अनुभव येण्याची योग्यता ज्याला आली असेल त्याला कोणत्याहि प्राण्याच्या मरणानंतरच्या अवस्थेचा अनुभव दिसूं लागतो. श्रीउवा. ३. २७. ३७२

तर व्यक्त धान्य इत्यादि पोषक द्रव्यापासून जें पोषण होतें, व जी शक्ति येते, ती केवळ शरीरापुरतीच असते; व व्यक्त पोषक द्रव्य शरीराला जर न दिलें तर अव्यक्त जें काहीं अनंत शक्तीचें द्रव्य आहे, त्या अव्यक्त पोषक द्रव्याच्या योगानें आपल्या स्थूल शरीरामध्यें जें अव्यक्त मानसिक शरीर आहे तें मजबूत होतें. श्रीउवा. ३. २७. ३६९

ही शक्ति त्याच्या त्या अव्यक्त शरीरांतील आहे, असें इतरांच्या लक्षांत न येतां, ती शक्ति त्याच्या त्या स्थूल शरीराचीच आहे असें पाहणारे समजतात. श्रीउवा. ३. २७. ३७०

★

## आधिव्याधि

आपला पूर्ण भक्त जरी असला तरी जीवन्मुक्त अवस्था म्हणा किंवा विदेहमुक्तीची अवस्था म्हणा, सद्गुरूनें त्याला द्यावयाची असेल, तर आधिव्याधिरूप ज्या देवता त्यांच्याच द्वारानें सत्पुरुष त्याला मुक्त करितात. कसा जरी प्रसंग असला, अखंड सुखाची प्राप्ति का होईना, ती प्राप्ति जरी करून घेणे असेल, तरी प्रथमतः त्याच्याकडे आधिव्याधीच पाठवितात. मग अर्थातच, त्या आधिव्याधिरूप ज्या देवता आहेत त्या सत्पुरुषाचे म्हणा, किंवा जो कोणी साक्षात् परमेश्वर असेल, त्याचे ते दूतच आहेत. श्रीउवा. ३. २७. ३७४

सर्वांना व्याधिरूप देवताच अखेरीस आहेत. श्रीउवा. ३. २१. ३७३

*

## आत्मा

परमेश्वरी आत्मा व आपला आत्मा दोन्ही एकच. सुखदुःखात्मक गुणधर्मांचा अनुभव घेणाऱ्या आत्म्याचा नाश नाहीं. तर त्या गुणधर्मांचा मात्र नाश आहे. श्रीउवा. ४. १. १०

स्त्रिया, पुरुष कोणत्याहि जातीचे व कोणत्याहि धर्माचे मनुष्याचे आकार व इतर सर्व स्थिरचर आकार, या सर्वांत व विष्णूसारख्या ईश्वरी देवतेच्या आकारांतहि आत्मा एकच परंतु निरनिराळ्या आकाराला अनुसरून ज्या आकाराची व ज्या जातिधर्माची ईश्वरी संकेतानें पूर्वीपासूनच जशी मांडणी मांडली गेली असेल, त्या मांडणीप्रमाणें जसजसे गुणधर्म असतील, त्याला अनुसरून तो आत्मा सर्वांतर्यामीं एकच असूनहि भिन्न आकाराच्या योगें व भिन्न धर्माप्रमाणें जीवरूपाला येऊन, तसें त्या जीवालाच वागावें लागतें. श्रीउवा. २. २४. ४११

यालाच आत्मानात्म विचार म्हणतात. आत्मा म्हणजे सतत असणारा; व अनात्मा म्हणजे नेहमीं नसणारा. या रीतीचा अभ्यासहि उत्तम आहे.
श्रीउवा. ४. ९. १७९

*

## आत्मज्ञान

या अभ्यासाची पूर्णता झाली म्हणजे अखेर हें सर्व कांहीं दिसणार नाहीं; आणि ज्याच्यापासून हें सर्व स्थूल रूपांत आलेलें आहे, असें जें शुद्ध सच्चिदानंद तेंच अनुभवाला येईल. तेंच श्रीकृष्ण भगवंताचें स्थान; व परंपरेनें आपलेंहि स्थान तेंच. त्याचा अनुभव येतो त्यालाच म्हणावें आत्मज्ञान.
श्रीउवा. ४. ९ ११९

अशा रीतीनें केल्यावर अनायासेंच जीवाला व मनाला जी एक प्रकारची आंतल्या आंत शोभा प्रगट होते त्यायोगें बाह्य देखावा कसाहि जरी असला तरी त्या मनुष्याच्या मानसिक शक्तीचा शोभेचा परिणाम जगावर होतो; व तो स्वतः आपोआपच तेजस्वरूप दिसूं लागतो.
श्रीउवा. २. २९. ४९५

पण त्याच विषयांपैकीं तेच ईश्वर अवस्थेनें शुद्ध असलेले जे आपण, कांहीं विषय वस्तूंचें ग्रहण करूं लागलों व त्या वस्तूंचा आपल्याला उपयोग होऊं लागला, म्हणजे परमेश्वर आणि आपण एकरूपानीं शुद्ध अवस्थेंत जे होतों, ते विषयग्रहणाच्या योगें इतर धातूनें मिश्र सोन्याप्रमाणें अशुद्ध अवस्थेंत आपण आलों व शुद्ध व सर्वशक्तिमान असा शुद्ध आनंदरूप परमेश्वरी आत्मा हा स्वतंत्र अलग झाला.

*

## अधिकार

ज्या वेळेस, त्याचें अज्ञान घालविण्याचा, त्याचा मनुष्याचा अधिकार होईल, त्या वेळेला आपल्या सारिखे करतात. तत्काळ म्हणजे त्या वेळेला लागलीच दर्शन झाल्याबरोबर आपल्यासारखा करतात असें नाहीं.

श्रीउवा. २. १९. ३१९

काळ वेळ म्हणजे मृत्यूची, मरायची वेळ त्याला येत नाहीं, काळाला जिंकून पुनः जन्ममरणाचा प्रसंग त्याला येत नाहीं असा त्याचा अर्थ समजा. श्रीउवा २. १९. ३२१

*

## आसक्ति

दुःखाकरितां निराळ्या क्रिया नाहींत. आसक्त होऊन सुखोपभोग घेणें व त्याकरितां क्रिया करणें हेंच व्यवहारांत दुःखोत्पत्तीला कारण आहे.

श्रीउवा. २. २४. ४०३

मग या संसार प्रपंचाच्या बंधांतून सुटावयाचें झालें, तर कोठेंहि परमेश्वरबुद्धि धरून त्याच्याशीं बांधून घेतलें पाहिजे; म्हणजे संसार प्रपंचादिक भवबंधांतून प्राणी मुक्त होतो. श्रीउवा. ५. ३०. ४४७.

परमेश्वराचें पूर्णपणें प्रत्यक्ष अनुभवास येण्याचें बीजच आहे. वृक्षांचीं बीजें, मुळ्या वगैरे जसें जमिनींत पाणी वगैरे घालून त्यांची नियमाप्रमाणे जोपासना करावी लागते, व जमिनींतील द्रव्यें पाणी आणि बीज यांचें योग्य रीतीनें ऐक्यत्व झालें म्हणजे त्या बीजांत गुप्तपणें असलेला पूर्ण वृक्ष उदयास येतो व तें बीज नाहीसें होतें.

श्रीउवा. १. ७. १४३

सत्पुरुष ब्रह्मरूप, शिवरूप असतात. शिवरहितअवस्थेंत जो आहे, तो जीव. जीव व शिव एक केले पाहिजेत. तें केव्हां होईल ? जगाशीं असलेली लग्न अवस्था जेव्हां नष्ट होईल तेव्हां. श्रीउवा. १९. २७९

आपल्या शरीराचा, जीवाचा, मनाचा उपयोग देवाकरतां करीत जावा; असें झिजावें तेव्हां ईश्वराचें दर्शन होतें. श्रीउवा. २. २९. ४८८

दिवाना बननेके सिवा ईश्वरप्राप्ति नहीं होती.

श्रीउवा. ३. ३३. ४२९

अशा शुद्ध आत्म्याशीं देहाचें तादात्म्य झाल्यावर मग त्याला जीवन्मुक्त म्हणा, किंवा सच्चिदानंद परमात्मा किंवा परमेश्वर म्हणा; किंवा तो केवळ ज्ञानरूप किंवा पूर्ण योगी होऊन गेला असें म्हणा.

श्रीउवा. ३. ३२. ४२४

जगापैकीं कोणतेहि देखावे अनुभवास येईनासे झाले म्हणजे त्याची बरीच पुष्कळ तयारी झाली असें समजावें. श्रीउवा. २·१७·२९८

ईश्वर आपल्याला संभाळतो व तो आपल्याजवळ आहे.

श्रीउवा. २. १७. २८९

ज्याच्याजवळ जावयाचें असतें, तेथें मी जातोंच. जो मला जवळ करील, त्याच्याजवळ मी आहेंच व गांवांत असून देखील कित्येकांना दूर आहे. श्रीउवा. २. १७. २८८

मुख्य मनानें, स्मरणरूपानेंच पूजा, सहवास, सेवाधर्म विशेष महत्त्वाचें आणि खरें आहे. परंतु तसें साधण्यासाठीं प्रथम स्थूल शरीराच्या योगें पूजा वगैरे करण्याची जरूरी असते. .. श्रीउवा. ३. २२. ३३०

या मनुष्यपणाची पूर्ण ओळख झाल्याशिवाय ईश्वराची प्राप्ति नाहीं.

श्रीउवा. ५. ३१. ४५७

ईश्वरी गुणधर्म ईश्वरी आकाराचे ठिकाणीं कायम ठेवण्याची कामगिरी सर्वांचीच नसते. श्रीउवा. ५. २८. ४३५

याप्रमाणें सहनपणा व अभिमानरहितपणा या दोन अवस्था ज्याच्याजवळ आहेत, तोच खरा नारी व खरा नरवीर, व तोच खरा ईश्वरी अखंड सुखाचा अधिकारी समजावा. श्रीउवा. २. १. ४

अशी ही सर्व सुखसाधनाला कारणीभूत जी परमेश्वरी शक्ति ही कोणत्याहि लहानमोठ्या देवतेमध्यें असतेच. श्रीउवा. ५. २८. ४३४

आपला जीव परमेश्वराच्या ताब्यांत गेला पाहिजे, किंवा परमेश्वराचा जीव आपल्या ताब्यांत आला पाहिजे; याला उपाय म्हणजे बाह्य सहवासाप्रमाणें अंतर्यामीं सहवास करणें हा होय; वस्तूचा ध्यास लागणें, म्हणजे अंतर्यामीं सहवास होणें. श्रीउवा. २. १२. २१०

संसार प्रपंचांत जीवाला व मनाला अनेक प्रकारचे बरेवाईट संस्कार व अनेक संकल्पविकल्प होत असतात. ते आहेत तोंपर्यंत किंवा त्याचें फळ सुखदुःखाच्या रूपानें भोगण्याचा प्रसंग येतो, तोंपर्यंत खरें ईश्वरी सुख किंवा मुक्तिपद याचा लाभ होत नसतो. श्रीउवा. ४. २८. ४१६

*

## उपोषण

सर्व इंद्रियांद्वारें जीवास उपोषण करविलें पाहिजे. शांत बसावें, शांत बसलें तर श्वासहि प्रमाणांत चालतो. श्रीउवा. १. २१. ३२५

चहा घेऊनच कांहीं न खातां एकादशीचें उपोषण करूं, पण अशारीतीनें निराहाराचें फळ मिळणार नाहीं. कारण इंद्रियांची नेहमीची वहिवाट त्या दिवशीं बंद केली, तरच खरें उपोषण घडेल. श्रीउवा. १. २१. ३२७

इंद्रियांना निराहारी ठेविलें म्हणजे पाप उत्पन्न करणारे सर्व विषय नाहींसे होतात. श्रीउवा. १. २१. ३२५

याचप्रमाणें आपण गुपचूप राहून, सत्पुरुषास उघड तोंडानें उपदेश

बोलून न दाखवतां, गुप्तपणें आंतून महाकारणांत किंवा सूक्ष्म शरीरांत जो उपदेश करतात तो झाडाच्या मुळाला पाणी घातल्यासारखा समजावा.
श्रीउवा. २. ८. १४१

मग यावरून सत्पुरुषाला बोलावयाला लावून व आपणहि बोलत बसून तेवढ्यापुरती गोडी घेण्यापेक्षां मौनव्रतानें गुपचूप राहून गुप्तपणें सत्पुरुषा-कडून येणारा खरा टिकाऊ आनंद देणाऱ्या अशा उपदेशाचीच अपेक्षा ठेवावी, हें उत्तम.
श्रीउवा. २. ८. १४२

एखादा म्हणतो, आज बाबा बोलत नाहींत, पण माझें काम गुप्तपणें चालूच असतें.
श्रीउवा. २. ८. १४२

परंतु ज्याला खरा आनंद पाहिजे असेल, त्यानें जनसंग सोडला पाहिजे.
श्रीउवा. ४. ५. ७५

एकांतांत त्रास देण्यासारखे कोणी नसल्यामुळें सहन करण्याचा प्रसंगच नसतो.
श्रीउवा. २. १. ११

असें गुप्तपण येण्यासाठीं बाह्य शरीरानें फालतू व्यंवहार न करतां एकांतांत बाह्य गोष्टींचा विसर पडण्याचा प्रयत्न करावा म्हणजे हळूहळू मनालाही एकांताची संवय लागते.
श्रीउवा. ४. १८. ३२३

ज्यांच्याजवळ पुण्यसंग्रह पुष्कळ त्यांना कोणत्याहि ऐहिक सुखाच्या बाजूंत नेहमी भरभराट चालूच असते, व नेहमीं सुखोत्पत्ति व्हावी यासाठीं बुद्धीची अनुकूलताहि तशीच होऊन, कोणत्याहि कार्यांत सुखकारक बुद्धि प्रगट होत रहाते.
श्रीउवा. ५. १३. २३५

पुण्यसंग्रह हें सर्व द्रव्यसंग्रहाचें अदृष्ट पूर्व स्वरूप आहे. प्रत्यक्ष अनुभवास येणारा स्थूल द्रव्यसंग्रह हा त्या पुण्याचें उपभोग घेण्यालायक स्थूल रूप आहे. यावरून सुखसाधनाला पुण्याची किती अवश्य जरूरी आहे हें पाहून घ्या. म्हणजे सुखसाधन हें जें स्थूल द्रव्य त्याचें पुण्य हें

बीजच आहे; आणि या पुण्याचें आद्य बीज परमेश्वरी सत्कर्म.

श्रीउवा. ५. १३. २३६

## कृति

आम्ही म्हणतों ऐकल्यासारखी कृति करा, त्याशिवाय ऐकण्याचा व वाचण्याचा कांहीं उपयोग नाहीं. श्रीउवा. १. २६. ४०९

करणीवर सर्व आहे. नुसत्या वाचण्यांत किंवा ऐकण्यांत कांहीं नाहीं. म्हणून सांगतों, बाबांनो, येथें येऊन स्वस्थ बसाल, विनाकारण काळ घालवाल तर नदीवर धुणें घेऊन जाऊन न धुतां संध्याकाळीं परत घराला येण्यासारखें आहे.

श्रीउवा. १. २६. ४११

देवाचा कृपा-आशीर्वाद मिळण्याकरतां देवासंबंधीं कोणतेहि कष्ट करावे लागतात. त्याचा आशीर्वाद पहिल्यापासून असतोच, परंतु त्याचा अनुभव घेण्यासाठीं करणी करावी लागते. श्रीउवा. २. २९. ४९१

जरी डॉक्टरी मताप्रमाणें एकवीस दिवसांचे उपवासानें मनुष्य मरून जाईल असें आहे; तरी ईश्वरी कृपेनें तो मरणार नाहीं.

श्रीउवा. १. २१. ३२१

त्यांपैकीं नामस्मरण करीत टाळ घेऊन उभ्यानें भजन करणें किंवा प्रदक्षिणा करणें वगैरे अशी शारीरिक दृष्टाची देवाची सेवा पुष्कळ प्रकारची आहे. त्यायोगें शरीर, मन व जीव यांनीं झिजल्यासारखें होतें. ईश्वरासंबंधीं कांहींहि शारीरिक कामें, तीं कोणतींहि व कशींहि असोत, तीं करीत जावींत.

श्रीउवा. १. २६. ४०८

**कळणे**

'कळणें' म्हणजेच परब्रह्म, आणि तेंच सच्चिदानंद रूपानें खरें सुखाचें स्थान. 'न कळण्यालाच माया, जगाची आद्य प्रकृति, आदिशक्ति म्हणतात. श्रीउवा. ४. १२. २५१

तर 'न कळण्या' च्या द्वारें दुःखाचा परिहार व कोणत्याहि सुखाची प्राप्ति. श्रीउवा. ४. ११. २२६

तर तें 'कळणें' शरीराच्या आधारानें आहे. 'कळण्या' च्याच आधारानें शरीर बनलें आहे व त्या शरीराच्या व 'कळण्या' च्या आधारानें वाटेल ते आकार तुम्हांला कळून घेतां येतात.

श्रीउवा. ४. १६. २१९.

योगी लोक दरम्यान असलेल्या विषय वस्तूकडे दुर्लक्ष करतात. म्हणून अखंड आनंद घेत अजरामर स्थितींत असतात. श्रीउवा. ४. ११. २२१

'कळण्या'चा अनुभव येण्यासाठीं आकाराची जरुरी आहे व आकार देखील 'कळण्या' चाच बनला आहे असें समजा.

श्रीउवा. ४. ११. २१८

अशांचें मन केव्हांच शांत नसतें. त्यांना सुखाची प्राप्ति होऊं शकत नाहीं. तेच जर कांहीं काल सर्व विचार सोडून स्वस्थ एका बाजूस जगाच्या 'न कळण्या' च्या अवस्थेंत असलेल्या एखाद्या सत्पुरुषासंबंधीं विचार करीत राहिले, तर कांहीं दिवसांनीं त्या व्यवहाराचे विचार म्हणजे त्या बाजूचें 'कळणें' हें जेव्हां पुष्कळसें कमी होऊन जाईल, म्हणजे जगाच्या विचाराकडे दुर्लक्ष होईल, म्हणजे जगापैकीं 'न कळणें' याची वाढ होईल, तेव्हां त्याचें डोकें शांत होत जाऊन सुखाचा रस्ता आपोआप हृदयांत सुचूं लागतो. श्रीउवा. ४. ११. २२५

*

## कर्मबीज

या जन्मांत जितकीं कर्मबीजें आपल्याकडून पेरलीं गेलीं असतील, तितक्याहि वृक्षांचीं फळें या जन्माच्या पुढच्या जन्मांत भोगिलीं जातात असें कोणी समजूं नये. तर त्या कर्मबीजाच्या गुणधर्माप्रमाणें त्याची वाढ होण्याला किंवा फळें येण्याला जितकी कालमर्यादा पाहिजे असते व ती परिपक्व होऊन, उपभोग घेण्याच्या योग्यतेचें शरीररूप साधन घेऊन त्यावेळीं जन्म घेतला जातो. श्रीउवा. ३. २९. ४०१

तथापि पूर्वजन्माच्याच कर्मापैकीं जीं अपक्व कर्मफळें होतीं तीं जर परिपक्व झालेलीं असतील, तर त्यांचा भोग भोगण्याकरितांहि पुन्हा तीं फळें भोगण्याच्या योग्यतेचें शरीर घेणें भाग पडतें.

श्रीउवा. ३. २९. ३९७

कर्मफळ भोग पुरा संपला म्हणजे आयुष्य ही व्याख्याहि संपते.

श्रीउवा. ३. २९. ३९६

मुळांत आयुष्य ही वस्तूच नाहीं. श्रीउवा. ३. २९. ३९५

पूर्वजन्मार्जित फलाचा उपभोग शरीराच्या साधनाशिवाय होत नाहीं. जन्म झाल्यापासून पूर्वफळांचा उपभोग घेणें सुरू होतें.

★

## कंटाळा

खऱ्या परमेश्वरी प्राप्तीकरितां आपल्या जीवाचा व संसाराचा कंटाळा आला पाहिजे; पण आपण कंटाळत नाहीं म्हणून परमेश्वर बळें होऊन कंटाळा येईल अशी परिस्थिती उत्पन्न करतो. श्रीउवा. २. २९. ४८९

असें वारंवार होऊन ते खरोखरीच संसाराला कंटाळले. मग म्हणतात,

' देवा नको हा संसार, नको हें लेकरांबाळांचें जंजाळ." नवराहि कंटाळतो व म्हणतो, " नको ही बायको सदा रोगी व निरुपयोगी." तसेंच बायकोहि प्रसंगानें नवऱ्याचा व पोरांचा कंटाळा करते. अशी कंटाळ्याची पूर्ण स्थिती झाली म्हणजे त्या पुरुषाचें म्हणा का स्त्रीचें म्हणा उलटतें. नंतर तीं परमेश्वराचा मार्ग धरतात व त्यायोगेंच परमेश्वर त्यांच्यावर कृपा करून त्यांना आपल्याजवळ घेऊन जातो.

श्रीउवा. २. २९. ४९

*

## कुत्रा

कुत्र्याची योग्यता फार मोठी आहे, म्हणून कांहीं साधु लोक त्याला जवळ बाळगतात. प्रत्यक्ष दत्तात्रेयांनींहि चार कुत्रे पाळले होते; चार वेदच चार कुत्र्यांच्या रूपानें त्यांच्याजवळ होते, असें त्या कुत्र्यांचें वर्णन आहे. कुत्र्याला भूतभविष्य समजत असतें. सत्पुरुष तरी वाईटापासून संरक्षण करतात, म्हणून तेहि कुत्र्यासारखेच असतात.

श्रीउवा. २. १३. २२२

*

## कृपा

कृपा म्हणजे काय व कशी असते, त्याची ओळख प्रथम करून घ्या.

श्रीउवा. १. २०. ३३३

सत्पुरुषाजवळून कृपा किंवा अवकृपा संपादन करून सांठविण्यास व त्याचा फायदा करून घेण्यास तुम्हा सर्वांजवळच काय, कोणाहि मनुष्या-

जवळ, लहानमोठीं अशीं पात्रें आहेतच. परंतु कृपा ठेवण्याकरितां बहुतेक सर्व कशाकशानी तरी भरलेलींच असतात. त्यामुळें सत्पुरुषाकडून कृपा जरी मिळत असली तरी तुमच्याजवळ ठेवण्यास पात्र रिकामें नसल्यामुळें, ती मिळत असूनहि न मिळाल्याचाच तुम्हांला अनुभव येतो.

श्रीउवा. १. २०. ३३७

त्याचप्रमाणें सत्पुरुषाकडून कृपा मिळत असूनहि आपल्याजवळ ती घेण्यास पात्र रिकामें नसतें. अनेक प्रकारच्या इतर घाणेरड्या वस्तूंनीं भरलेलें असतें.

श्रीउवा. १.२०. ३३८

आपली स्वतःची तयारी नसते, चित्तशुद्धि नसते, त्यायोगें आपले ठिकाणीं पात्रता आलेली नसते. अनेक विषयवस्तूंनीं मन भरलेलें असून सत्पुरुषाजवळ जातात आणि म्हणतात, आमच्यावर कृपा करा. तर ते जरी कृपा करायला तयार असले तरी तुमची तयारी कोठें असते ?

श्रीउवा. १. २०. ३४१

"कृपा" सर्वत्रांसच पाहिजे. परंतु कोणत्याहि सत्पुरुषाची कृपा संपादन करण्याकरितां त्याची सेवा करून, आपणांस "कृपापात्र" होण्याची जरुरी आहे.

श्रीउवा. १. २०. ३३३

सत्पुरुषाजवळ किंवा परमेश्वराजवळ कृपा आशीर्वाद मागण्यापेक्षां सत्कर्मे, भजन, पूजन हें विधियुक्त कसें करावें याचीच मागणी मागून घ्यावी हें उत्तम; आणि त्याप्रमाणें करीत राहिलें म्हणजे निराळा कृपा-आशीर्वाद मागावा लागत नाहीं. तर कृपाआशीर्वाद त्याच्याबरोबरच असतो. सत्कर्म, भजन, पूजन, नामस्मरण म्हणजेच कृपा आणि आशीर्वाद.

तसेंच आपलें मन, बुद्धि हें पात्र कृपा ठेवण्यायोग्य स्वच्छ झाल्या-शिवाय, कृपा ग्रहण करण्यास आपण पात्र आहोंत, असें समजूं नये.

श्रीउवा. १. २०. ३४०

जोंपर्यंत आपलें मन, बुद्धि अनेक विषयवस्तूंच्या योगें घाणेरडे आहेत

तोंपर्यंत कृपा मिळाल्याचा अनुभव संभवनीय नाहीं.

श्रीउवा. १. २०.३४०

चित्तशुद्धि पूर्ण होणें म्हणजेच आपण कृपापात्र म्हणजे सद्गुरूची कृपा ठेवण्यास आपलेजवळ पात्र तयार झालें असें समजावें.

श्रीउवा. १. २०. ३४०

मग सत्पुरुषाकडून कृपा मिळते व आपल्या शुद्ध झालेल्या मन-बुद्धि पात्रांत ग्रहण केली जाते. मग त्याचा अनुभवहि लागलीच येतो. याला म्हणतात आपली स्वतःची तयारी. श्रीउवा. १. २०. ३४१

गुरुकृपेनें रिकाम्या झालेल्या गाडग्यांचा स्वभाव असा असतो कीं, तेथील सर्व हरण झालेलें असून जें पुनः येईल तेंहि ठरूं नये. अशी त्या गाडग्यांची अवस्था झालेली असते. अशा रीतीनें जें गाडगें झालें, त्यावर गुरुकृपा झाली असें समजावें. गुरुकृपा म्हणजे कांहींच शिल्लक नाहीं, असें समजावें. श्रीउवा. १. २०. ३४९

*

## खरेंखोटें

सर्व जगाचा अनुभव घेऊन जग रूपानें आपणच नटलों आहोंत हें समजून घेऊन त्या अनुभवावरून आपली स्वतःची ओळख करून घ्यावी; व ज्यापेक्षां माझ्यापासूनच सर्व जगाची उत्पत्ति व त्या जगाचा देखावा द्वैतावर व तें द्वैत तर खोटें आहें, त्यापेक्षां मीहि खोटाच आहें. असलों पाहिजे. खरें आणि खोटें दोन्ही माझ्यांतच आहेत, असें त्यानें समजून घेतलें असें समजा. श्रीउवा. ४. १२. २५३

*

## गणपति

गणपतीची पार्थिव पूजा केली म्हणजे सर्वांची पूजा केल्यासारखी होते ती. परंतु अनंत चतुर्दशीपर्यंत खास पूजेसाठीं रोज मातीचा गणपति करून पूजा करावी व विसर्जन न करतां तसाच ठेवावा.

श्रीउवा. ५. ७. १२९

त्याचपैकीं गणपति हें जगाच्या कल्याणाचें एक साधन आहे. तर खऱ्या कल्याणाला वेडेवांकडें घाणेरडें अशाच साधनाची गरज आहे, म्हणून ईश्वरी इच्छेनें स्वतः भगवानच जगाच्या खऱ्या कल्याणासाठीं सत्पुरुषाच्या रूपानें; किंवा अवताररूपानें वेडेंवांकडें, घाणेरडें, कंटाळवाणें असें रूप घेऊन येतो. श्रीउवा. ४. १६. २०३

*

## आपण कोण आहोंत ?

कोणालाही ऐहिक सुखाचा किंवा ब्रह्मसुखाचा अनुभव, चमत्कार पाहिजेच असेल त्यानें मनाचा व्यवहार कमी करावा व नमस् क्रियेचा व्यवहार वाढवावा; म्हणजे सर्व बेत बसतो. श्रीउवा. ३. २३. ३४७

हा ज्ञानदिवा आला कोठून ? याचें मूळ स्वरूप कसें आहे ? स्वतः आपण कोण आहोंत, किंवा आपण कशासाठीं उत्पन्न झालों आहोंत.

श्रीउवा ३. १८. २५९

तुमचे डोळे जें बाहेरचें वेडेंवांकडें, घाणेरडें आहे तें पाहण्यांत गुंतलेले. मग ईश्वर दिसणार कसा ? तुम्ही उघडे आहांत, उघड्या वतूंचा उपयोग करतां. जर परमेश्वर पाहिजे असेल तर गुप्त व्हा. श्रीउवा. ३. १६. २३६

पैसा वगैरे बाह्य विषय, सुखानुभव हें सुखवृक्षाचें वरील फळ व

खऱ्या परमेश्वरी ब्रह्मसुखाचा अनुभव हें जमिनींतील कंदासारखें गुप्तफळ; व तें सर्व बाह्य वासनारहित अशा गुप्तमनानेंच मिळवावें लागतें.
श्रीउवा. १. १. १६

कारण सर्वच व्यवहार रीतीनें चालणारे असतांत; व व्यावहारिक मन, बुद्धि, अहंकार, जीव व शरीर हे ईश्वरी बाजूंत उपयोगी पडत नाहींत.
श्रीउवा. ५. २८. ४३५

*

## गुरु

दूध जसें तापवावें लागतें, त्याप्रमाणें शरीरासहि परमेश्वरी सत्कर्मांत व स्वधर्माचरणांत चांगलें तापवावें लागतें. चांगला ताप लागला म्हणजे विरजण घालावें; दुधांत ताक दहीं कांहीं तरी आंबट विरजण घालतात. तसें आपल्याला विरजायला सद्गुरु, सत्पुरुष कोणी महात्मा असला तर त्याचा स्पर्श किंवा त्याचा सदुपदेश, हें आपल्या तापलेल्या जीवाला विरजण समजावें. तो सदुपदेश जीवामध्यें विरजण घालून चांगलें विरजलें गेलें, म्हणजे तो सदुपदेश आपल्या हृदयांत ठसला गेला, म्हणजे दह्याप्रमाणें त्या जीवाची स्थिति झाली म्हणून समजावी.

मग दहीं जसें चांगलें घुसळून गेलें म्हणजे त्याचें दहींपण मोडून जाऊन, शुद्ध लोण्याप्रमाणें शुद्ध आत्मा आपल्या हृदयांतल्या हृदयांत प्रगट होतो.
श्रीउवा. ३. १४. २०९

मग तो लोण्याप्रमाणें जो आपला शुद्ध आत्मा त्याच्यासाठीं हरी जो श्रीकृष्ण परमात्मा तो धांवतो; आणि लोण्यासारख्या शुद्ध आत्म्याच्या लालसेनें त्या हृदयांत येऊन बसतो.
श्रीउवा. ३. १४. २०९

ह्याप्रमाणें मनुष्यपण निघून जाऊन परमेश्वरपण हातीं येण्यास सद्-

गुरूच्या द्वारेंच तें मनुष्यपण काढून घ्यावें लागतें. श्रीउवा. ५. ३१. ४६२

परंतु सद्गुरूचें अंतरंग पूर्ण सात्त्विक व सद्रूप असल्याकारणानें दया, माया, क्षमा व शांति हे त्यांच्या अंतःकरणांत स्वभावतःच असतें.

श्रीउवा. ५. ३१. ४६०

डॉक्टर लोकांना मनुष्यशरीराचें व इतर कोणत्याहि प्राण्याच्या शरीराचें पृथक्करण करून आंतबाहेर ओळख करून घेतां येते. परंतु मनुष्यपण व मनुष्यजीवन हें काय आहे व याचें आंत-बाहेर स्वरूप कसें आहे व या मनुष्यपणाचा खरा उपयोग काय याची ओळख कोणाला एकाएकीं होऊं शकत नाहीं. याला सद्गुरू किंवा ईश्वरी कृपाच असावी लागते.

श्रीउवा. ५. ३१. ४६०

संसारांत राहून परमार्थ साधण्याचा हाच उपाय आहे. वाटेल त्याप्रमाणें संसार करावा, पैसे मिळवावे, बायका कराव्या, सर्व कांहीं करावें, परंतु मोरीच्या पाण्यासारखें सद्गुरूशीं संबंध जोडला पाहिजे म्हणजे आपण शुद्धच आहोंत.

रामपदांत सद्रूप अवस्थेंत असलेला जो शिवाजी त्याला त्याच्या स्वतःच्या आत्म्याची जाणीव आहेच. यावरून सद्रूप अवस्थेंतील अखंड स्वानंद-साम्राज्य तेंहि शिवाजी-रामदासांचेंच व पृथ्वीवरील सार्वभौम जें युरोपियन लोकांच्या द्वारें चाललेलें आहे; तेंहि शिवाजी-रामदासाचेंच.

श्रीउवा. ४. ३५. ५०१

आपल्याला जगापैकीं कोणताहि संबंध नसून आपण केवळ नुसते आहोंत असा अनुभव येऊं लागला म्हणजेच खऱ्या आनंदाचा अनुभव येतो. अशा रीतीनें जे समाधान अवस्थेत गेले तेच पूर्ण.

श्रीउवा. ४. ३५. ४१९

सद्गुरुपरंपरेनें जें ज्ञान प्राप्त होतें तें हठयोगापेक्षा श्रेष्ठ आहे. जें कांहीं तें मीच आहें, जें कांहीं होतें तें बरोबरच आहे. त्यांत कोणत्याही प्रकारचा

फेरफार न करणेंच योग्य आहे. तें आपल्यापासून अलग व आपण त्यापासून अलग हें अनुभवास येणें व पुन्हा ऐक्यत्व होणें वगैरेंच्या योगें त्या गुरुकृपेचा अनुभव येतो. अशी ज्ञानप्राप्ति सद्गुरूकडून होते.
श्रीउवा. ४. ३५. ४८६.

गुरुपरंपरेच्या पद्धतीनें समजून घेणाऱ्यांनीं समजून घ्यावें व समजून देणाऱ्या गुरूनें समजावून द्यावें. समजावून देणें व समजून घेणें हें तीन प्रकारचें आहे. श्रीउवा. १. ६. ९२

गुरु केलाच तर शिष्यपणाची व गुरुपणाची अशा दोन्ही बाजू त्याच्या त्यानेंच संभाळाव्या लागतात. श्रीउवा. ४. २५. ३८६

पूर्वकर्मानुसार सद्गुरूची पूर्ण कृपा होऊन, ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झालेला असतो, तो ब्रह्मावस्थेंत असतांना त्याच्या जें अनुभवास येतें, तें तो लोकांत सांगत राहतो, किंवा बडबडत राहतो, व उघड उघडहि कांहीं गोष्टी समजावून देतो. श्रीउवा. १. ६. ९२

ज्याच्याजवळ ज्या रीतीचें पुण्यकर्म असेल, त्याला अनुसरूनच योग-मार्ग दाखवणारा गुरु भेटतो; किंवा पूर्वकर्माच्या अभ्यासाच्या योगें स्वतःचे ठिकाणीं उपजतच योगविद्येची माहिती होऊं लागते.
श्रीउवा. १. २. ३६

त्याचे अंतःकरणांत सद्गुरु गुप्त प्रयोग करून आपलें मनच त्याच्या मनाशीं चिकटून देतात; म्हणजे त्यांचें मन जें ब्रह्मरूप असतें तेंच त्याचें बनतें मग बाह्य रीतीनें समजून घेण्याचें कांहींच कारण न राहतां आपो-आपच हृदयांतलें हृदयांतचें सर्व कळूं लागतें. श्रीउवा. ४. ८. ९७

असे तो प्रवासी व तो वाटाड्या म्हणजे गुरुशिष्य एकच होऊन गेले.
श्रीउवा. ५. २४. ३८३

शिष्य कितीहि लांब असो, किंवा गुरु कितीहि लांब असो, ते परस्पर एकमेकांचा आनंदानुभव घेतात; कारण तो ब्रह्मानंद मापलेला थोडाच

आहे. तुम्ही लोक मापलेल्या आकाराच्या आधारानें जो आनंद घेतां, तो आनंदहि तितक्याच प्रमाणाचा मापलेलाच येणार.

श्रीउवा. ४. १०. १९३

आपने अपनेहि सब इंद्रियोंमें गुरु करनेकू लगे तो साक्षात् भगवान परमेश्वर ओहि अपने हृदयमें आकर गुरु बन जाता है, और ओहि सब अपनेकू सच्चा ग्यान देता है. श्रीउवा. २. २७. ४७७

*

## चढ-उतार

व्यवहारांतील चढउतार फार लवकर होत असतो; आणि तो सोपाहि जातो. श्रीउवा. ४. २३. ३६४

आणि जरा कांहीं कोणी थोडाफार अपमान केला कीं लागलेच वाईट वाटून तोंड उतरल्यासारखें होतें व संतापानें दुःख करीत बसतो. अशा रीतीचा जो हा व्यवहारांतील चढउतार तो व्यवहारांत घसरण्याला व दुःखाला कारणीभूत होतो. श्रीउवा. ४. २३. ३६६

बिचाऱ्या मनुष्यानें व्यवहारांतील ह्या चढउताराकडे पूर्ण दुर्लक्ष केलें, तर त्याच्या परमार्थाचा चढउतार सुरू होतो. परंतु तो भराभर होत नाहीं.

श्रीउवा. ४. २३. ३६६

लोकांचे हजारो श्वासोच्छ्वासांतील निरनिराळे कीटक एकमेकांचे हृदयांत जाऊन जसजसे पुष्ट होत जातात, तसतसे त्या मनुष्यांच्या हृदयांतील विचार क्षणोक्षणीं बदलत जातात. त्यामुळें त्यांचीं मनें नेहमीं चंचल अस्वस्थ वृत्तींत राहातात. कोणी म्हणतात कीं, शेंकडों विचार आमच्या मनांत येऊन मन अस्थिर, चंचल अवस्थेंत आहे. परंतु मानसिक विचार जसजसे वाढत जातील, तसतसे त्या सूक्ष्म आकारांतच प्रण

ते अगदीं ताजेतवाने व सशक्त असतात. त्यांचाहि सशक्तपणा जसजसा वाढत जातो तसतशी लोकांच्या मनाची धांवहि वाढत जाऊन निरनिराळ्या वासनांचें व दुष्ट विचारांचें काहूर मनांत वाढतच जातें, व मन अधिकच चंचल होत जातें. श्रीउवा. ३. १५. २१६

*

## चमत्कार

जे केवळ चमत्कारावर अवलंबून असतात, त्यांची कोठेंच श्रद्धा बसत नाहीं. त्यांचें चित्त नेहमीं संशयाविष्ट असतें; व त्यांना इह आणि पर दोन्हीहि नाहीं. श्रीउवा. ३. २३. ३३६

कोणाहि ब्रह्मरूप झालेल्या सत्पुरुषाचा फायदा कसा करून घ्यावा. हें ऐहिक कामनिक लोकांना माहीत नसल्यामुळें सत्पुरुषाचे ठिकाणीं आपोआप कांहीं अघटित चमत्कार दिसून येतात कीं नाहीं हें पाहण्याकडे त्यांची दृष्टि असते. श्रीउवा. ३. ३४. ४४०

सिद्धीच्या तावडींत न जातां पुढें जाणारे जे असतात, त्यांच्याकडून अनायासें कांहीं चमत्कार होतात; पण ते होऊन स्वतः कांहीं करीत नाहींत व ते त्या सिद्धींच्या पुढें निघून गेले म्हणजे कांहीं चमत्कारहि दिसून येत नाहींत. श्रीउवा. ५. ३. ३३

*

## चित्तशुद्धि

तथापि एखाद्या चांगल्या शहाण्या कोणाहि वडील पूज्य माणसाचा आश्रय घेऊन किंवा एखादा सत्पुरुष भेटल्यास त्याच्या आश्रयानें हाच

उपाय करीत राहिलें असतां, चित्तशुद्धीचें कार्य लवकर होईल. किंवा कोणत्याहि वृक्ष-पाषाणाचे ठिकाणीं परमेश्वरी दृढ पूज्यभाव ठेवून तेथें नित्य नियमानें यथाशक्ति पूजा व प्रदक्षिणा नेहमीं करीत राहावें. शिवाय आपल्या स्थितीला अनुसरून होत असल्यास कोणतेंहि सत्कर्म करीत असावें; ह्यायोगेंहि चित्तशुद्धि होते. श्रीउवा. ३. २५. ३५६

आपल्याला जो जो जलद जलद किंवा उशिरा वस्तु कळूं लागते, तें तरी केव्हां ? तर वस्तूचे ठिकाणीं असलेलें अदृष्ट चैतन्य व मनाचे ठिकाणीं असलेलें चैतन्य यांचें जेव्हां ऐक्य होतें म्हणजे मनच जेव्हां आपल्या चैतन्याच्या योगें त्या वस्तूच्या आकाराला ग्रहण करिते किंवा वस्तूंचे ठिकाणीं असलेलें अदृष्ट चैतन्य तें जेव्हां मनाला आकर्षण करितें व मन वस्तुरूप जेव्हां बनतें तेव्हांच. श्रीउवा. १. ६. ११०.

*

## चैतन्य

मनुष्येंहि देहाच्या आकारापासून ते थेट मन, बुद्धि, चित्त, अहंकारादिक सूक्ष्म गुणधर्मांनीं तें शुद्ध चैतन्यच बनलेलें आहे.

श्रीउवा. १. ६. १११

केव्हांहि कोणत्याहि वस्तूचे आंतील, बाहेरील पूर्ण ज्ञान होण्याला त्या वस्तूंतील चैतन्यानेंच मनांतील चैतन्याशीं ऐक्यत्व झालें पाहिजे म्हणजे मनच त्याप्रमाणें पूर्णपणें बनलें गेलें पाहिजे. म्हणजेंच आपल्याला त्या वस्तूंचा पूर्णपणें बोध झाला असें होतें. श्रीउवा. १. ६. ११२

जोंपर्यंत आपले ठिकाणीं शुद्ध चैतन्याचा बोध होऊन परमेश्वरी फळ मिळत नाहीं, तोंपर्यंत आपले ठिकाणीं परमेश्वरीरूप असूनहि निष्फळ म्हणजे फळरहित अशी आपली स्थिति आहे. श्रीउवा. १. ६. ९. ११४.

शरीरका चैतन्य हृदयमें पकडी हुवे मूर्तिमें आयेविना वो मूर्ति चैतन्य-रूप जींदे आदमीके माफक नहीं बनते; वो जड मूर्तिका जडपण वो ध्यास करनेवालेके शरीरमें आयेविना उसका शरीर स्थिर होकर उसका चैतन्य मूर्तिमें नहीं आता. श्रीउवा. ४. ३१. ४४२

माझ्याकडून वरचे तिळगुळ घेण्याच्या नादीं लागू नका.
श्रीउवा. २. ४. ७१

वारपांगी तिळगुळ द्या व आंतलेंहि द्या. श्रीउवा. २. ४. ७१.

★

## जग

हें एक यंत्र आहे, सगळें जग जें आहे, तें व त्याचे सर्व व्यवहार या उलटसुलट बाजूच्या यंत्रांतच होतात, सुखदुःख जें आहे, तें मुळांतील प्रकृतीच्या या ज्या दोन अवस्था आहेत, त्यांचें कार्य व परिणाम आहे, असें हें अनादिकालापासून चालू आहे. 'असें आणि तसें' (उलट सुलट) जें आहे, त्याला कारणीभूत जो मूळ प्रकृति तिचा नाश कधींच होत नाहीं. श्रीउवा. ४. १. ५

जग हें बहुतेक माराच्या म्हणजे अभिमान व वासना यांच्या पाशांत गुरफटलेलें असतें. श्रीउवा. ५. २९. ४४२.

मी जगाच्या हद्दीच्या बाहेर पडलों खरा, त्यामुळें तुम्हा जगांतील लोकांना जें अनुभवास येत नाहीं व त्यांत काय बरें-वाईट आहे याची तुम्हांला कल्पना नाहीं असें जें जगाच्या बाहेरील तें अनायासेंच मला सांपडून गेलें व त्याचा उपभोक्ता मी झालों म्हणून पूर्वी मी जो जग-व्यवहारांत होतों त्यांतलें विसरलों थोडाच. श्रीउवा. ५. ३. ३७.

ज्या ज्या बऱ्यावाईट किंवा लहानमोठ्या गोष्टी उदयाला येत असतील

त्या सर्व गोष्टींबद्दल मी जगाच्या बाहेरील स्थितीमध्यें असल्यामुळें तटस्थ-वृत्तीनें दृष्टमात्र आहे. श्रीउवा. ५. ३. ३८.

आमच्यासारख्या लोकांच्या मागें येण्याची पूर्वींपासून प्रवृत्ति आहे, त्यापेक्षां तुम्ही लोकहि पूर्वीं परमेश्वराच्या कांहींतरी थोडेफार वाटे गेला असाल म्हणून तो परमेश्वर तुम्हांलाहि माझ्याबरोबर जगाच्या बाहेर हद्दपारींत टाकण्याची योजना करीत आहे आणि त्याकरतां मलाहि तुम्हांस जगाच्या बाहेर घेऊन जाण्याची एक कामगिरी करावी लागते.

श्रीउवा. ५. ३. ४८.

★

## जप

जप म्हणजे काय ? कीं हजारों वेळ त्या शब्दांचा पुनः पुनः उच्चार करावयाचा, त्यांचा मुख्य हेतु हजारों वेळ म्हणतां म्हणतां त्या शब्दोच्चारांचे मनाशीं अत्यंत ऐक्यत्व होऊन जावें. श्रीउवा. १. ४४. ६२

अंधश्रद्धेनें मनाची चांचल्यता होत नसून लवकर कार्य साधतें. कोठें कोठें नुसता ॐकाराचाच जप करावयास सांगितलें. या ॐकाराचा अर्थ करावा, अर्थ पहावा व मग जप करीत बसावें, तरच जपाचें फळ आहे असें कांहीं नाहीं. अहो, जप करतां करतां आपोआपच त्यांत असलेलें ब्रह्मस्वरूप प्रगट होऊन सर्व दुनियेचा अर्थ कळूं लागतो.

श्रीउवा. १. ६. १०६

या भगवंताच्या ॐ आकारासारख्या व गायत्रीमंत्रासारख्या कोणत्याहि वेदमंत्राक्षरांचें व रामकृष्णादिक कोणत्याहि परमेश्वरी देवतानामाक्षरांचें व देवताआकाराचें स्मरण, ध्यान, धारणा, जपजाप्यांदिकांच्या योगें मनाशीं

तादात्म्य करणें, हाच खरा नाम जप किंवा मंत्र जप.

श्रीउवा. १. ६. १०७

भगवान् म्हणतात, ' अशा रीतीचा जप हाच खरा यज्ञ व सर्व यज्ञांत अशा रीतीचा जपयज्ञच माझें खरें स्वरूप आहे. तशा जपांतच मी प्रत्यक्ष स्वतः सिद्ध प्रगट होऊन, जप करणाऱ्यांच्या हृदयांत कायम राहतों. श्रीउवा. १. ६. १०७

*

## जन्म

पापाशिवाय जन्म येत नाहीं. श्रीउवा. १. २६. ४१५

केवळ विषयवासना तृप्त करणारे जे असतील, ते केवळ जन्म-मरणाच्या अधोगतीला कारणीभूत आहेत. श्रीउवा. १. २४. ४००

जन्म म्हणजेच मरण. लोक जन्माचा उत्सव करितात. अरे, जी वस्तु जन्मास आली तिला मरण जर ठरलें आहे, तर त्या जन्मास मरण कां म्हणूं नये ! श्रीउवा. १. २८. ४४१

तसें एकदांच असें मरावें कीं, पुनः मरण्याचें काम पडूं नये. तसेंच एकदांच असें जन्मावें कीं पुनः जन्मण्याचें काम पडूं नये.

श्रीउवा. २. ८. १४६

जितकी जीवदशा कमी तितकी ईश्वरी अवस्था अधिक व दुःखाचा अनुभव कमी. श्रीउवा. ५. ३०. ४५५

म्हणून सर्व जग जीवरूपानें असून क्षणोक्षणीं त्यांत फेरबदल होत रहातो व आपण वासनाबद्ध अशा जीवरूपानें असल्यामुळें आपण जीव-रहित नाहीं. श्रीउवा. ५. २२. ३४६

जगामध्यें शुद्ध जीवनरहित अवस्था असूनहि जीव अवस्थेनें ती आच्छादित झाल्यामुळें निर्जीवाचे ठिकाणीं असलेल्या परमेश्वराचा अनुभव येत नाहीं. श्रीउवा. ५. २२. ३४७

परमेश्वरासाठीं होणारा त्रास, कोणतींहि संकटें आनंदानें भोगणें, गुप्तपणें होत असलेला मार सोसणें इत्यादि प्रथम होणारा त्रास सोसून शरीर जितें ठेवून मरून जाण्याची मात्र कोणाची तयारी नसते. एकदां जीवानें पक्कें मेलें, म्हणजे अमरपण आलेंच. श्रीउवा. ४. २२. ३६२

सारांश जितेपणीं मरणें म्हणजे शरीर कायम राहून जीवानें मरून जाणें ही अवस्था सर्वांत फार श्रेष्ठ आहे. याच योगें शुद्ध सच्चिदानंद परमेश्वरी अवस्थेचा लाभ होत असतो. याकरतांच मोठमोठे योगी, तपस्वी, तत्त्ववेत्ते वासना जाळून जीव मारण्याची खटपट करतात व सद्गुरूंच्या सत्पुरुषांच्या सहवासानें ही अवस्था मिळवितात.

श्रीउवा. ४. २२. ३६२

माझ्या कर्मप्रारब्धानें, ईश्वरी संकेतानें किंवा सद्गुरुकृपेनें वासनाबद्ध जिवाचा नाश होऊन, शिवरूप अवस्था येण्याची माझ्या ठिकाणीं पाळी आली असेल, म्हणूनच मला त्या गांवांत जाऊन त्या म्हातारीच्या झोंपडींत सोटग्यांनीं मार खाऊन ‘ जीवानें मेला ’ असें म्हणून घेण्याची पाळी आली. श्रीउवा. ४. २२. ३५८

सद्गुरूला ज्याच्यावर कृपा करावयाची असेल, त्याचें सर्वस्व हरण करून शरीर मात्र कायम ठेवून आंतील जीवाचा नाश करून त्याला शुद्ध शिव सच्चिदानंदरूप बनवून टाकतात.

श्रीउवा ४. २२. ३५२

परमेश्वराच्या संकेतानें किंवा सद्गुरूच्या इच्छेनें ज्याला जिवाचें मरण आलें असेल त्याच्या शरीराचा नाश होऊं न देतां, वासनात्मक बनलेला जीव तोच पुरतेपणीं मरून जावा यासाठीं त्या जीवाला

शरीराच्या आंतल्या आंतच मारणारे सोटगे घेऊन यथेच्छ मारतात. श्रीउवा. ४. २२. ३५१

तशीच आमची गति पुष्कळ संकटें भोगतां भोगतां आतां सहन होत नाहीं असें पाहून माझा जीव मेला; शरीर मेलें नाहीं. श्रीउवा. ४. २२. ३४६

जीवानें मेलेल्या गांवांत एकदां गेलें म्हणजे पूर्ण अद्वैतानंदाची प्राप्ति होते. व्यवहारांत काहीं शहाणे लोक आपल्या सोईपुरतें अद्वैत करूं पाहातात. श्रीउवा. ४. २२. ३६२

म्हणून कोणीहि मतलबाची अद्वैत अवस्था आणण्याचा प्रयत्न करूं नये. श्रीउवा. ४. २२. ३६३

कारण, तो जीव त्या अवयवांना ज्या रीतीनें वागवावयाचें त्यारीतीनें वागवीत नाहीं. पद्धतशीर खाऊं घालीत नाहीं. श्रीउवा. २. २७. ४५७

तसेंच कांहीं शरीराचे अवयव जवळ चिकटलेले असून संप करतात, व त्यांचा मालक जो ' जीव ' त्यांचें ते काम करीत नाहींत. श्रीउवा. २. २१. ४५१

उस माफक तुम आनंदरूप परमात्मा हो, तुमको आनंदरूपका अनुभव होनेके लिये, और देनेके लिए हमारी आवश्यकता है। श्रीउवा. २.२७.४७१

देहपात झाल्यानंतर देहांत असलेला तो जीवात्मा शुद्ध सच्चिदानंद आत्म्यांत आपोआप मिसळत असेल अशी जर कोणाची कल्पना असेल, तर असें होत नसतें; कारण देहांत असतांना तो जीवात्मा बऱ्यावाईट क्रियाकर्तृत्व व्यवहाराच्या योगें दूषित संस्कारयुक्त झालेला असतो. श्रीउवा. २. १८. ३१४

शरीरासह किंवा शरीरच आपण आहोंत अशी शेकडों जन्मांची दृढ भावना होऊन बसल्यामुळें, शरीर आपल्यापासून व शरीरापासून आपण भिन्न असूनहि, त्या शरीरापासून आपण अलग असल्याचा म्हणजे

देहातीतपणाचा अनुभव सर्वांना येत नाहीं, ज्याला येतो तो जीवन्मुक्त म्हटला जातो. श्रीउवा. २. १८. ३१२

यावरून निकाल काय लागला तर, आपल्या जीवाचा उपभोग किंवा आपल्या जीवाची सेवा किंवा आपल्या जीवाचें ग्रहण ईश्वराकडून किंवा सत्पुरुषाकडून केलें गेलें पाहिजे; व अशा रीतीनें त्यांचेकडून आपल्या जीवाला पूर्णपणें खाऊन जीवाचें जीवपण मोडून गेल्याशिवाय शुद्ध खऱ्या आनंदाचा अनुभव आपल्याला घेतां येत नाहीं.

श्रीउवा. १. २३. ३४२

आपल्या जीवास बरें तर सगळें बरें. जीवास बरें नसलें, तर कांहींहि नकोसें होतें. श्रीउवा. १. २८. ४३९

क्षणिक सुख आणि पुनः दुःख. दुःख पुष्कळ आणि सुख थोडें, व तेंहि नाहींसें होणारें असें आहे व जीवाला तर आपलें अस्तित्व व शरीराचें अस्तित्व राहण्याचें हांवडे असणारच. श्रीउवा. १. २. २९

पण विषयाच्या मिश्रणानें शिव अवस्था जाऊन जीव अवस्था जेव्हां आली, तेव्हां हें मनुष्य-शरीर शिवाचें असूनहि जीवाचें होऊन बसलें.

श्रीउवा. १. २. ३१

तसेंच जीव मन व शरीराचे अवयव तरी आपण म्हणून जे कोणी आहोंत त्या आपल्यापासूनच झालेली आहेत; म्हणून त्यांचीहि आपल्याला काळजी घेतली पाहिजे. श्रीउवा. २. २९. ४३७

जगाच्या स्वभावदोषांच्या आचरणांचा दूषित परिणाम त्या शुद्ध आत्म्यावर जोपर्यंत होत आहेत; तोंपर्यंत त्या आत्म्याला जीवात्मा असें म्हटलें आहे.

श्रीउवा. १. १. ७

स्थूल शरीराच्या द्वारें तो जीव बाह्य विषयवस्तूंशीं योगाभ्यास नेहमीं करीत राहतो. त्यायोगें सूक्ष्म शरीराच्या द्वारें परमेश्वराशीं होणारा योगाभ्यास आपोआपच बंद पडत जातो. श्रीउवा. १. २. ३५

इस तरह मनके साथ सब इंद्रियरूपी नोकर लोग पास रहेकर भी अपने मालक जो जीवात्मा, उसकू कोइ प्रकारसे त्रास न हो, इस तरह नजीक होकर भी नहीं है इस माफक तटस्थ रीतसे रहते हैं न ओ जीवात्माका कुछ काम करते, न जीवात्माभी उनसे काम लेता. ऐसी जब जीवात्मेकी और उनके नोकररूप इंद्रियोंकी हालत हो जाती, तो उस वख्त ओ इंद्रियें न नौकर रहे, और ओ जीवात्माभी, न किसीका मालक रहा. श्रीउवा. २. २७. ४६९

तो उनका जीव ये नाम चला गया. खाली शुद्ध आत्मा ये नाम रहे क्या ओहि शुद्ध आत्मा जब मनके साथ इंद्रियोंके तावे हो जाता है, तब उसकू जीव या जीवात्मा बोला जाता है. श्रीउवा. २. २७. ४६९

और मनके साथ सब इंद्रियें पास रहकर उनसे अलग याने देहातीत जब हो जाता है, तब उसकू शुद्ध स्वस्वरूप, शुद्ध आत्मानंद रूप जीवन्मुख कह जाता है. श्रीउवा. २. २७. ४६९

नौकर तो अपने को होने चाहिये, उनके सिवाय काम नहीं चलता, मगर हुषारीसे रहकर नोकरोंको किस तरहसे रखना जिस तरीकेसे अपने उसके तावेमें न जायेंगे, अपनी मालकी कायम रहेगी, और नोकरकी अवस्था कायम रहेगी, तो आनंद आता है. अपना जीव एक अमीर है. श्रीउवा. २. २७. ४७०

इस लिये अपने जीवात्मे और दिलके साथ सब इंद्रियों के आपसमें परस्पर गुरु होकर अपने नोकरों को ( दिलके साथ इंद्रियों को ) अच्छा अच्छा ईश्वरका ग्यान सिखलाते जाना, और आपभी उनके मदतसे उनके साथ ईश्वरका ग्यान सीखते जाना. श्रीउवा. २. २७.४७५

ऐसा शुद्ध जीवात्मा और शुद्ध दिलके साथ सब इंद्रियोंका संवाद है. श्रीउवा. २. २७. ४७५

अपने इंद्रिय, अपने जीवके नोकर है, अच्छे जीवके अच्छे इंद्रियरूपी नोकर अपने अच्छे मालककू ( जीवात्माकू ) कहेते है, तुम आनंदरूप हो, त्रिभुवनके मालक तुम हो, हम तुम्हारा गुप्त विश्वसनीय काम करनेवाले है; हम नोकरे हैं. श्रीउवा. २. २७. ४७१

ऐसे ये इंद्रियरूपी नोकर लोगोंने अपना मालिक जो जीवात्मा उसकू सच्चा ईश्वरी सुखके रस्तेके तरफ न जाने देकर, अपने तरफ खेंचकर आपने में मिला लेते. श्रीउवा. २. २७. ४६३

मग अशा जीवदशेच्या म्हणजे जगाच्या हद्दीच्या बाहेर गेलेला जो कोण असतो, त्याचा जीव जरी मरून गेलेला असतो तथापि त्याचें स्थूल शरीर जें आहे, तें जितें असल्याकारणानें जीवरहित असा जो शुद्ध आत्मा तो त्या शरीराच्या आधारानें असतो. त्या स्थूल शरीरानें पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि असतो, कोठेंहि फिरतो, कोठेंहि रहातो, कसाहि वागतो; प्रसंगानें जगाच्या पद्धतीच्या मनुष्याप्रमाणें वागतो; किंवा त्याच्या उलट पद्धतीनें वागतो, तो कसाहि असतो व कसाहि नसतो. तो जगांत असूनहि, प्रसंगीं जगाच्या रीतीप्रमाणें व्यवहार करीत असूनहि जगाच्या बाहेरील शुद्ध सच्चिदानंद आत्म्याच्या अवस्थेंतून केव्हांहि च्युत होत नाहीं अशालाच जीवन्मुक्त महायोगी, महासत्पुरुष म्हटलें जातें.

श्रीउवा. ५. ३. ५७

शरीर हें क्रिया-कर्तृत्व व्यवहारासाठीं आहे, परंतु सर्व प्रकारचे व्यवहार करून सवरून त्या क्रियेचे किंवा त्यासंबंधीं आसक्ति, वासना किंवा अहंकार हे ज्या ठिकाणी असूं शकत नाहीं, किंवा शिल्लक रहात नाहींत अशी ज्याची अवस्था झाली असेल तोच खरा पूर्ण जीवन्मुक्त.

श्रीउवा. ४. ३४. ४७०

तो तवा अग्नीशीं निकट झाला म्हणून अनेक प्रकारें पदार्थ बनविण्यास अहंकारी झाला. अग्नि कोणत्याहि प्रकारें पदार्थ बनवीतहि नाहीं व अहंकार

धारण करीत नाहीं. तो सर्व प्रकारें निरहंकारी असून त्या तव्यापासून होणाऱ्या सर्व व्यवहारापासून अलग तो अलगच. श्रीउवा. ५. ३. ५५

अशा या पूर्ण जीवरहित अवस्थेंत जाऊन पोहोंचणारा तोच स्वतः प्रथम संपूर्ण जीवरहित होतो. श्रीउवा. ५. २२. ३४६

जगस्वभावाच्या दोषांचें आवरण तोडून बाहेर पडला म्हणजे त्याल मुक्ति म्हणतात. मग तो देहानें मरो अथवा न मरो. श्रीउवा. १. १. १०

लोकांच्या दृष्टीनें शरीर दिसतें. आंत नग्न झालें म्हणजे तें शरीर असूनहि नाहीं असेंच वाटतें.

अंतकाळीं सत्पुरुषाचा बाह्य आकार जरा आठवला, तरीहि सदवस्थाच प्राप्त होते. अंतर्यामीं सहवासानें, त्याला देह असून " जीवन्मुक्त " अवस्थेचा अनुभव येईल. श्रीउवा. २. १२. २१६

तसें हें शरीर आहे तोंपर्यंत तें मन कामापुरतें घ्यावें व कार्य झालें कीं द्यावें सोडून, अशी स्थिति होते त्याला " जीवन्मुक्त " म्हणतात. तेथें सर्व गोष्टींचा निकाल लागला म्हणून सहवास कशाकरितां, त्याचें महत्त्व काय व कसा करावा हें थोडक्यांत सांगितलें. श्रीउवा. २. १२. २१६

याकरितां जीवन्मुक्त अवस्था येण्यासाठीं कोणीहि प्रथम स्वधर्माचरण व सत्कर्माच्या योगें चित्तशुद्धि करून स्वतःचे ठिकाणीं शक्य तितका सात्त्विक गुण वाढवावा आणि मग कोणाहि सत्पुरुषाचा किंवा सद्गुरूचा सहवास, सेवाधर्म आपल्या शक्यतेप्रमाणें करावा लागतो. मग त्यांना आपोआपच जीवन्मुक्त अवस्था येते. जीवन्मुक्त अवस्था ही सर्वांत श्रेष्ठ आहे. श्रीउवा. ३. १. १७

सर्व जग आपणच आहोंत; किंवा जग मुळींच नाहीं असें समजून जगाच्या बाहेर आपण आहोंत असा अनुभव नेहमीं घेत असतात. हींच जीवन्मुक्तांचीं लक्षणें आहेत. श्रीउवा. ३. १. १७

*

## जुने

आपण जुने आहोंत व जुन्या पद्धतीनें वागूनच आपल्यास जुन्यांत जावयाचें आहे. जुनें म्हणजे पुराणपुरुषाची म्हणजे परमेश्वराची जागा.

श्रीउवा. ४. ७. ४०४

*

## जसें असेल तसें

ज्या स्त्रिया पोराचा गू काढावयाला कोणतेंहि साधन घेत नाहींत, तर हातानेंच गू काढतात व कोणत्याहि प्रकारची मनाला चिळस येऊन तोंडाचा आकार बदलत नाहींत; अशांचें मन व अवयव थोडी फार पवित्र असल्याची खूण समजावी. श्रीउवा. १०. १५१

ज्या स्त्रिया आपल्या पोराप्रमाणें दुसऱ्या कोणाच्या मुलाचा गू मनाला चिळस वाटूं न देतां; कांहीं साधनाशिवाय हातांनीं भरून काढून टाकतात व कोणत्याहि बऱ्यावाईटाचा विचार मनांत आणीत नाहींत, "जसें असेल तसें' या स्थितींत समाधान मानणाऱ्या अशा स्त्रियांनीं हस्तस्पर्शादिकांनीं केलेली सेवा परमेश्वराला अधिक प्रिय आहे. श्रीउवा. १०. १५१

त्या वृद्ध रोग्यांची योग्य शुश्रूषा करून त्याची काळजी घेतात व कोणत्याहि बऱ्यावाईटाचा विचार मनांत आणीत नाहींत. तर जसें असेल तशा स्थितींत समाधान वृत्तींत राहतात, अशा त्या सेवेकरी स्त्री-पुरुषांचीं मनें व बाह्य अवयवें अधिक श्रेष्ठ पवित्र समजावीं. अशांच्या हृदयांत भगवंताची वस्ती असते. श्रीउवा. १०. १५६

*

## ज्ञानी

कलियुगांत हठयोगाचा प्रकार सर्वांना साधणें शक्य नाहीं. याकरतां गुरुपरंपरेच्या ज्ञानमार्गाची महति जास्त आहे. श्रीउवा. ४.३५.४८५

सद्‌गुरुपरंपरेनें जें ज्ञान प्राप्त होतें, तें हठयोगापेक्षां श्रेष्ठ आहे. जें कांहीं आहे तें मीच आहे, जें काहीं होत आहे, तें बरोबरच आहे; त्यांत कोणत्याहि प्रकारचा फेरफार न करणेंच योग्य आहे. तें आपल्यापासून अलग व आपण त्यापासून अलग हें अनुभवास येणें व पुन्हा ऐक्यत्व होणें...त्यास गुरुकृपेचा अनुभव येतो.

अशी ज्ञानप्राप्ति सद्‌गुरूकडून होते. जो ज्ञानमार्गानें गेला आहे, तोच पूर्ण ज्ञानी. श्रीउवा. ४. ३५. ४८६

★

## तादात्म्यता

अखेर आपलें मन सत्पुरुषाशीं तादात्म्य होऊन सत्पुरुषच जर झालें, तर त्यांचा अधिकार जसा जगांत व जगाच्या बाहेर त्यांची व्याप्ति असून खऱ्या अखंड सुखोपभोगास योग्य असतो. तसाच अधिकार आपणालाहि येतो. श्रीउवा. २. २५. ४३१

त्या ग्रंथाचा मुख्य मुद्दा काय तर त्यांच्याशीं आपला आत्मा किंवा आपण तादात्म्य व्हावें म्हणजे तेच आपण बनून जावें हा आहे. श्रीउवा. ४. ६३

पूर्वींचें खरें मारुतीचें रूप आपल्याला माहिती नाहीं, म्हणून दगडाची बनविलेली मारुतीची मूर्तीच हृदयांत धरावी; म्हणजे तिच्या ध्यासानें मन मारुतीच्या आकाराशीं तद्रूप होतें. श्रीउवा. २. २५. ४२०

आणि मारुतीला रामाचा ध्यास असल्यामुळें त्याचें मन रामरूप असून

मारुतीला निरंतर रामाचें दर्शन होऊं लागतें. श्रीउवा. २. २५. ४२१

पाषाणादिक मूर्तीचे ठिकाणीं असलेली स्थिरता, शांतता, निर्विकारपणा, सौन्यपणा वगैरे त्या पाषाण मूर्तींत असलेले सात्त्विक गुण; त्या गुणाशीं आपल्या मनबुद्धीच्या सहाय्यानें आपल्याशींच संबंध जोडून घ्यावा. श्रीउवा. १. २. ३८

हा अभ्यास करतांना शक्य तितके जवळ कोणी नसावें. आपण एकटेंच असावें व हा अभ्यास गांवाच्या बाहेर निवांत असलेल्या देवळांतील मूर्तीसमोर केलेला विशेष उत्तम. श्रीउवा. १. २. ३८

★

## तीर्थोदक

जर थोडें पाणी जवळ ठेवून त्याला हाताचा स्पर्श ठेवून हा अध्याय नित्य पठण केला तर त्या पाण्यांत ब्रह्मशक्ति प्रकट होऊन त्या तीर्थोदकाचा कोणत्याहि प्रसंगीं उत्तम उपयोग होईल. श्रीउवा. २. २९.५०१

भक्तिश्रद्धेनें त्या तीर्थोदकाचा उपयोग केला असतां, आपला आत्मा व मन पवित्र झाल्याचा व पवित्रपणाच्या योगें होणाऱ्या आनंदाचा अनुभव येतो, व शारीरिक रोग वगैरे बरे होऊन मानसिक शक्तीहि वाढते. श्रीउवा. २. २९. ४९४

★

## दारिद्र्य

सत्पुरुष किंवा परमेश्वरी अवस्थेंत जाण्यासाठीं किंवा ती अवस्था

येण्यासाठीं जगांतील बाह्य विषयवस्तूंच्या योगें पूर्ण दारिद्र्य अवस्था यावयास पाहिजे असते. श्रीउवा. ५. ५. ७८

त्यामुळें निर्वासनेच्या योगें सुस्वरूप सद्वस्तूंचें जें फळ तें आपल्या देशांत पूर्वीं जें होतें तें हल्लीं मिळेनासें झालें. श्रीउवा. ५. ५. ७८

आणि बाह्य वस्तूंची तुम्हांला अधिकाधिक उणीव पडून दारिद्र्य अवस्था येत चालली. श्रीउवा. ५. ५. ७८

कोठेंहि सत्पुरुष किंवा सत्या साध्व्या या पूर्ण अवस्थेंत असोत किंवा अभ्यासासाठीं साधक अवस्थेंत असोत, त्यांच्याकडे कोणत्याहि प्रकारें सांसारिक, प्रापंचिक, व्यावहारिक रीतीची कोणतीही कामना धरून जाऊं नये. श्रीउवा. ५. ४. ७२

पूर्ण सत्पुरुष बनण्यास जर कांहीं विशेष कारण किंवा मुख्य साधन असेल तर तें पूर्ण दारिद्र्य. श्रीउवा. ५. ५. ७६

केवळ पैसे नसणें म्हणजे दारिद्र्य नाहीं; तर बाह्य सुखोपभोगासाठीं ठरलेल्या विषयवस्तु त्या सर्वांचा पूर्ण अभाव, म्हणजेहि बाह्य दारिद्र्यावस्था झाली. श्रीउवा. ५. ५. ७६

*

## दान

प्रिय वस्तूचा ईश्वरासाठीं वियोग करणें म्हणजे दान

श्रीउवा. १. १८. २६२

आतां " नारायण स्वरूपिणे वराय " असा त्या मुलावर आरोप करून ज्यापेक्षां कन्यादान केलें आहे, त्यापेक्षां त्या वरानेंहि त्याप्रमाणें विचार करून परमेश्वर जो नारायण त्याचे गुणधर्म स्वीकारून जर तो तसा वागेल

तरच त्या कन्येच्या आईबापाला खरें कन्यादानाचें फळ मिळून ते सर्वच परमेश्वर रूप होऊन जातील. श्रीउवा. १. १८.२६५

पहिल्याप्रतीचें शरीर दान व मधल्या प्रतीचें कन्यादान आहे. आपल्या शरीरापासून झालेली कन्यां ती दान करून देणें. म्हणजे आपलें स्वतःचें दान करणें होय. श्रीउवा. १. १८.२६४

जगापैकीं सर्वांत श्रेष्ठ जें शरीर व मन, तेंच दानरूपांनीं दिलें गेल्यावर केवळ राहिलेलें आपण त्या आपणाचा नाश नाहीं, म्हणून ते अविनाशी जे आपण त्याकरितां येणारें शरीर तेंहि अविनाशीच मिळतें, आणि तें अविनाशी शरीर मिळण्यासाठींच नाशवंत जगापैकीं जें आपलें शरीर व मन त्याचें परमेश्वराप्रीत्यर्थ दान करण्याची जरूरी असते. तें शरीर व मन दान कसें केलें जातें? तर परमेश्वराप्रीत्यर्थ भजन, पूजन, अनुष्ठानें, सत्कर्मे वगैरे पुण्याकरितां शरीराचा व मनाचा उपयोग करू लागलें. म्हणजेच परमेश्वराला तें शरीर व मन दान केल्यासारखें होतें.

श्रीउवा. १. १८.२६३

अन्नदान श्रीमंतास करा किंवा कोणासहि करा त्यांत कोणताहि हेतु नसेल, व तें परमेश्वर बुद्धीनें केलें असेल, तर निराहाराचें पुण्य मिळतें.

श्रीउवा. २. २८.४८७

कोणीहि उपोषित, गोरगरीब, अनाथ कोणच्याहि स्थितींतील मग ते ब्राह्मण असोत किंवा कोणत्याहि जातीचे असोत, परंतु ते सर्व परमेश्वरच आहेत अशा बुद्धीनें व कोणत्याहि प्रकारें फलाची आशा न धरतां, केवळ ईश्वराप्रीत्यर्थ कोणाहि हजारांना जेवू घातलें म्हणजे सहस्र भोजनाचें पुण्य पदरीं येतें.

श्रीउवा. १. २७.४२९

*

## देवाची ओळख

इतरांच्या ओळखीचा लाभ आपण घेऊं लागलों, तर देवाच्या ओळखीचा लाभ अंतरतो. श्रीउवा. १७. २९२

देवाजवळ जावयाचें कशासाठीं? आपली अक्कल सोडावी व देवाची घ्यावी म्हणून. श्रीउवा. १७. २९१

म्हणून देवाच्या घरीं त्याची ओळख करण्याकरितां आला असाल, तर कोठेंतरी खावें, कोठेंतरी रहावें, सर्व विसरावें, म्हणजेच देवाची ओळख होऊन जाते. श्रीउवा. १७. २९३

वस्तुतः द्वैत किंवा अनेकत्व हें आपल्यास नाहीं. आपलें जें हें मनुष्य-आकाराचें शरीर आहे, तें आरंभापासून जीवाचें नाहीं, तर शिवरूप परमेश्वराचेंच आहे. श्रीउवा. १. २. ३१

शुद्ध ईश्वरी शिवात्मा आणि मनुष्याचा अशुद्ध जीवात्मा हे अगदीं नजीक नजीकच आहेत. परंतु त्या तेलाप्रमाणें जोंपर्यंत जीवदशा आहे तोंपर्यंत तो जीवात्मा आणि शिवात्मा एक होऊं शकत नाहीं. श्रीउवा. १. २. ३३

चांगल्या सोन्यांत हिणकस सोनें मिसळावयाचें असल्यास त्याचा हिणकसपणा काढावा लागतो. श्रीउवा. १. २. ३३

तसेच खास परमेश्वर तोहि जीवदशेंतून सुटलेल्या आपल्या आत्म्यास मिसळून घेण्यायोग्य झाला कीं नाहीं त्याची पूर्ण कसोटी पाहून कसोटींत उतरला व परमेश्वरी आत्म्याच्या योग्यतेचा झाला म्हणजेच त्यास परमेश्वर आपल्या आत्म्यांत मिसळून घेतो. म्हणजेच जीवावस्था जाऊन शिवावस्था आली. श्रीउवा. १. २. ३४

जगाच्या स्वभावदोषांमुळें त्या जीवात्म्याला खरें काय तें कळू नये; असाच त्या जीवात्म्याचा स्वभाव होऊन बसतो. श्रीउवा. १. १. ७

## दुराचार

आपल्या शुद्ध ज्ञानरूप व आनंदरूप आत्म्यावर व सद्‌बुद्धीवर दुराचारामुळें जें जन्मोजन्माचें पापरूप गुप्त वस्तूच्या योगें आच्छादन झालेलें असतें त्यामुळें चांगले विचार, खऱ्या सुखाची अक्कल व खरी समाधान-अवस्था वगैरे सुखाची बाजू आपल्यामध्यें असूनहि ती उदयास येत नाहीं.

श्रीउवा. १. १०. १७७

खरोखरच दुःखाचे बरोबर चटके ज्याला पूर्णपणें अनुभवले जातात असे लोक पुनः जगांत दुःख वाढविण्याचे धंदे करीतच नाहींत, तर मूळ दुःख उत्पन्न होण्याला आदिकारण काय आहे, त्याचीच त्याला चट्‌दिशी जाणीव उत्पन्न होत असते. श्रीउवा. १. १०. १७४

बेअक्कल मूर्ख पोरांनीं गंमत म्हणून एखाद्या गवतास किंवा कापसाच्या गंजीस काडी ओढून लावून दिली म्हणजे जो अनर्थ होतो, तसेंच हल्लींच्या या मूर्खपणाच्या बाजारांत पोरकट अक्कलवाले दुःखाचीच दुकानें घालतात आणि दुःखाचीच देवघेव करतात.

श्रीउवा. १. १०. १७३

परंतु या दुःखाची पूर्ण सहनशीलता झाली तर यानेंहि सत्‌प्रमाणें खऱ्या आनंदाची प्राप्ति होते. श्रीउवा. १. १०. १६१

सत् अवस्थेंत जसा आनंद आहे, तसें असत् अवस्थेंत दुःख आहे. दुनियेंतील दुःखरूप जें कांहीं तें सर्व असत्, त्या संबंधांत जो प्रियवस्तु वियोग होईल, तर त्यायोगें सर्व दुःखच उत्पन्न होणार.

श्रीउवा. १. ९. १६१

★

## दुश्मन

तर विषयवस्तूंचा आपण वारंवार फालतू उपभोग घेण्याची संवय लावल्यामुळें जी अंतःकरणावर जन्मोजन्मींची घाण सांचलेली असते त्या घाणीपासूनच त्या दुश्मनाची उत्पत्ति. श्रीउवा. ५. १८. २९७

प्रथम अदृष्ट अवस्थेंतच पापपुरुष आपल्याच मळापासून उत्पन्न झालेले असतात. तेच त्या दुश्मनांच्या हृदयांत प्रवेश करून त्रास देतात.
श्रीउवा. ५. १८. २९७

म्हणून आपणांस शरम उत्पन्न होऊन दुष्मनरूपानें असलेल्या त्या परमेश्वराला आपण शरण गेलें पाहिजे. आणि आपल्यासाठीं त्याला जो त्रास झाला व होत आहे त्याबद्दल आपण त्याच्याशीं अत्यंत प्रेमानें व सौम्यपणानें वागलें पाहिजे. श्रीउवा. ५. १८. ३०२

आतां त्या शत्रूचे ठिकाणीं शत्रुपणा प्रकट होत आहे असा भास पडल्याबरोबर, त्या मनुष्याला शत्रु समजून त्याचा द्वेष न करतां शत्रुपणाचीं जीं कारणें असतील त्यांच्यासंबंधीं द्वेष धरून त्या कारणांचा नाश करून टाकावा. हा प्रकार श्रेष्ठ आहे. श्रीउवा. ५. २१. ३३८

त्यालाच सद्गुरु परमेश्वर समजून, त्याप्रमाणें त्याच्याशीं वर्तन ठेवलें पाहिजे; आपल्याला शत्रु आहेच कोठें? शत्रु म्हणून ज्यांना आपण समजतों, ते आपलें चांगलेंच करीत असतात, शत्रुत्व, मित्रत्व हा भावच असूं नये. श्रीउवा. ५. १८. ३०२

म्हणून आपल्या शत्रूचा आपण द्वेष करणें म्हणजेच कामक्रोधादिकांचे गुणधर्म वाढविणेंच होय. म्हणजे आपणच आपला द्वेष करतों असें होतें.
श्रीउवा. ५. २१. ३३८

अनायासें आपण कोणत्यःहि प्रकारें निमित्त न होतां आपोआप जर कोणी दुष्मन होत असेल, तर त्याला होऊं द्यावें आणि त्याच्यापासून

होणारा त्रास सहन करीत जावा. श्रीउवा. ५. १८. ३००

म्हणून दुष्मनाकडून आपल्याला होत असलेला जो जो उपद्रव तो कांहीं काल जीव मुठींत धरून सहन करीत राहिलें, म्हणजेच ती घाण एकदम एकाएकीं नाहींशी होऊन तो ईश्वरपदास जाण्यास तयार होतो. श्रीउवा. ५. १८. २९८

## द्वैत-अद्वैत

ते त्यांच्या त्यांच्या धर्माप्रमाणें जर पूर्णपणें खऱ्या रीतीनें वागतील, ब्राह्मणहि स्वधर्माला अनुसरून साकार सगुण उपासना जर करीत राहतील, तर त्या दोघांकडून आपापल्या रीतीप्रमाणें जें पुण्य सांचतें त्या पुण्याची अदलाबदल होऊन, मुसलमानी शरीरांत असलेला पुण्यरूप जीव तो ब्राह्मणाच्या शरीराच्या द्वारें ब्रह्मरूप होऊन जातो; आणि ब्राह्मण शरीरांतला जो पुण्यरूप जीव तो यवन साई मौलाच्या द्वारें निराकार अशा ब्रह्मरूप अवस्थेंत जातो. पुढें दोन्हीहि ऐक्यत्वाला पावून अखंड अद्वैत अवस्थेच्या पलीकडे जातात. श्रीउवा. ३. ७. १२२

म्हणजे एकच आत्मा ब्राह्मण आणि यवन अशीं दोन शरीरें धारण करून यवन शरीराच्या द्वारें यवनधर्माप्रमाणें पूर्णपणें वागतो; आणि ब्राह्मण शरीरांत राहून ब्राह्मणधर्माप्रमाणें पूर्णपणें वागतो. त्या त्या धर्माप्रमाणें वागून त्या त्या धर्माची पूर्णता झाल्यावर पुनः दोन्ही धर्मापासून उत्पन्न झालेल्या पुण्याची अदलाबदल होऊन ते जीव ऐक्यत्वाला पावून अद्वैत अवस्थेंत जातात. श्रीउवा. ३. ७. १२३

मग तो पूर्वींचाच आत्मा दोन शरीरांच्या आधारें दीनपणानें जो वागत होता, तो द्वैतभाव मोडल्यामुळें कोणत्याहि शरीरांत राहून अद्वैत

अवस्थेंत ब्रह्मानंदांत निरंतर निमग्न असतो; व सर्वशक्तिमान् तो असतो.
श्रीउवा. ३. ७. १२३

खऱ्या आनंदाच्या प्राप्तीसाठीं प्रथम धर्माच्या योगें द्वैतावस्थेची गरज असते; द्वैत हें धर्माच्याच योगें झालेलें आहे, नाहींतर द्वैत होण्याचें कांहीं कारण नाहीं. श्रीउवा. ३. ७. १२३

ज्यापेक्षां माझ्यापासूनच सर्व जगाची उत्पत्ति व त्या जगाचा देखावा द्वैतावर व तें द्वैत तर खोटें आहे, त्यापेक्षां मीहि खोटाच असलों पाहिजे श्रीउवा. १२. २५३

परंतु त्याचा अनुभव कसा यावा ? तर द्वैताचा अनुभव घेऊन कळून घेणारा जो बनला आहे, त्यानें आपण स्वतः कोण आहोंत हें पाहिलें पाहिजे.

द्वैताचा अनुभव पूर्ण घेऊन जेव्हां कंटाळला, तेव्हां पुढें विचार करतां करतां असें लक्षांत आलें कीं, ज्यापेक्षां याचा कंटाळा येतो, त्यापेक्षां ज्याचा कंटाळा येत नाहीं असें सुख, आनंद अविनाशी .अशा प्रकारचें यापेक्षां कांहीं तरी निराळें असलें पाहिजे.

अशा अद्वैत्याजवळ कोणत्याहि धर्मवाल्यांना व कोणत्याहि जातिवाल्यांना खरें हित साधून घेतां येतें.

सर्व प्रकारच्या अभिमानांनीं पूर्णपणें रहित झाल्याशिवाय अद्वैतावस्था येत नाहीं व द्वंद्वातीत होतां येत नाहीं, हा सिद्धांत समजावा.

*

## धर्म

असें एकदां नाहीं, पुष्कळ वेळां मी सांगत आलेलों आहे. जे स्त्रिया किंवा पुरुष येथें येणारे असून सद्धर्मानें पूर्णपणें वागणारे आहेत, त्यांच्या

खऱ्या कल्याणाचा जिम्मा आमच्यावर.। श्रीउवा. १. ३. ५२

त्या वेदरूप एकच वस्तूपासून अर्थाच्या भानगडींत पडून, वासनाबद्ध होऊन प्रजोत्पत्ति वाढूं लागली, तर ब्रह्मदेवाचें कार्य अनायासें होत आहे आणि केवळ अर्थाच्या भानगडींत न पडतां वासनारहित राहून केवळ पठण करीत राहिले, तर ती ब्रह्मसुखांत जातो हेंहि त्या वेदाचें फळ आहे. श्रीउवा. १. ६. १२३

जो ज्या अवस्थेंत आहे त्या अवस्थेंतच त्याला ठेवलें तरच त्याचें महत्त्व राहून महत्त्वाचा उपयोग जगाला होतो. श्रीउवा. १. ६. ११९

कोणत्याच जातिवाल्याचे धर्म हल्लीं सशास्त्र राहिले नाहींत.

श्रीउवा. १. ३. ५१

आतां कोर्टांत विचारलें कीं, तुमचा धर्म कोणता ? तर दुःखी धर्म असें सांगत जा. श्रीउवा. १. ३. ५१

दुःखी धर्माचीं लक्षणें काय ? असें कोणीं विचारलें तर वाटेल त्यानें वाटेल तसें वागावें आणि वाटेल त्यानें वाटेल त्याला कारणांनीं किंवा विनाकारण उपद्रव द्यावा आणि उपद्रवी प्रजा उत्पन्न करावी.

श्रीउवा. १. ३. ५१

देशसुधारणेला सद्धर्माशिवाय दुसरे कोणतेहि उपायच नाहींत.

श्रीउवा. १. ३. ४६

ऐहिक सुखाच्या प्राप्तीला विशेष मनाची किंवा शरीराची खटपट किंवा धडपड करावी लागत नाहीं. श्रीउवा. १. ३. ४७

सोनें मातींत गेलें, गुवांत पडलें, उकिरड्यांत राहिलें तरी त्याला भंग नाहीं; तसें आपलें झालें पाहिजे. आपल्यास कोणी शिव्या देवो, रागें भरो, आपण जसें असेल तसें राहावें. वृत्तींत भेद होऊं देऊं नये.

श्रीउवा. २. १४. २३४

पुढें, होतां होतां त्यांची शरीराची व मनाची वृत्ति, त्या दगडासारखी

सर्व सहन होण्यायोग्य कठीण व सर्व सहन करण्यायोग्य पाण्यासारखा अत्यंत मृदू असा तो बनून गेला. श्रीउवा. २. १२. २०८

मनुष्यांमध्ये जरूर असलेल्या सर्व गुणांमध्यें धैर्यगुण हा अत्यंत महत्त्वाचा आहे. श्रीउवा. ५. १२. २१८

या धैर्यगुणाची उत्पत्ति सहनाच्यायोगें होते. दुःखाच्या वेळीं आणि अभ्युदयाच्या वेळीं सहनाची फार जरूरी असते. श्रीउवा. ५. १२. २१८

*

## ध्यास

ध्यास लागला असतां, एखाद्या बाईला मुलगा होत नसेल तर तें मन दुसऱ्याचीं मुलें पाहून त्यांचा ध्यास करतें व त्या बाईला मुलगा केव्हां होईल, असा ध्यास लागतो व त्यामुळें मन पोररूप होतें, मनाला पोराच आकार येतो. श्रीउवा. २. २५. ४२३

ध्यास पूर्ण झाला, म्हणजे झोपेंत तें मन पोररूपानें दिसतें.

श्रीउवा. २. २५. ४२३

पण ज्याला ज्या देवतेची आवड असेल, त्याचाच मनाला ध्यास धरावा. श्रीउवा. २. २५. ४२५

पुष्कळ काळपर्यंत जास्त आवड उत्पन्न झाल्यामुळें निरंतर आठवण होणें याचें नांव ध्यास किंवा ध्यान. श्रीउवा. २. २५. २१२

ध्यासालाच ध्यान, धारणा, निदिध्यास म्हणतात. वारंवार स्मरण करणें; आठवण करणें, म्हणजे ध्यान. तेंच स्मरण म्हणजे ध्यान इतर कोणताहि विचार न येतां पुष्कळ वेळ सारखें टिकून राहिलें म्हणजे धारणा.

श्रीउवा. २. २५. ४२६

## धारणा

ध्यासाचा परिणाम धारणा.

आणि सारखा ध्यास लागणें, मनांतून काढून टाकूं लागलें तर तें निघत नाहीं, अशा रीतीची स्थिति येऊं लागली म्हणजे निदिध्यास.

श्रीउवा. २. २५. ४२५

आणि ज्याचा ध्यास धरला गेला असेल त्याच्याशिवाय सर्व विसरून जाणें, आपल्या देहाचासुद्धां विसर पडणें त्याचें नांव समाधि.

श्रीउवा. २. २५. ४२५

कोणत्याहि वस्तूचा निदिध्यास मनानें घेतला, म्हणजे मन त्यासारखें होऊन बसतें. श्रीउवा. २. २४. ४०५

॥ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं जागृति स्वप्नीं पांडुरंग. ॥

श्रीउवा. २. २४. ४२४

त्याप्रमाणें सत्पुरुष हाच परमेश्वर असा सिद्धांत करून, सत्पुरुषाचा आकार पाहून त्याचा आपल्या हृदयांत ध्यास करीत जावा.

श्रीउवा २. १२. २११

तो ध्यास काढून टाका असें जरीं कोणी सांगितलें व त्याप्रमाणें करण्याचाहि प्रयत्न केला, तरी तो जात नाहीं; तेव्हां त्याचें नांव धारणा.

श्रीउवा. २. १२. २१२

परमेश्वराचा ध्यास सत्पुरुषरूपानें पूर्णपणें वाढत गेला, म्हणजे त्याची सत्पुरुष धारणा पूर्ण होते. श्रीउवा. २. १२. २१२

जसजशी ती पूर्ण होऊं लागेल तसतसा सत्पुरुष समागम होत आहे असें समजावें. श्रीउवा. २. १२. २१२

सत्पुरुष रूपानें जो परमेश्वर असतो, त्याच्या अनंत प्रेमाचा लाभ सहवासानें होतो. बाह्य सहवास झाला, म्हणजे आपण घरीं गेलों तरी

तोच ध्यास सुरू होतो. श्रीउवा. २. १२. २१३

सद्‌गुरूची कृपा होऊं लागली म्हणजे सद्‌गुरूच्या ध्यासाची व धारणेची पूर्णता होते. श्रीउवा. २. १२. २१४

म्हणजे ती मूर्ति हृदयांतून काढून टाकण्याचा प्रयत्न केला, तरी ती जात नाहीं, व स्वतःच्या देहाचा विसर पडूं लागतो.

श्रीउवा. २. १२. २१४

देहाचा विसर पडूं लागला म्हणजे सत्पुरुषअवस्था, परमेश्वराचे गुण-धर्म जे, ते त्या ध्यास करणाऱ्यांत प्रगट होतात. श्रीउवा. २. १२. २१४

त्या ध्यासाचा व धारणाशक्तीचा उपयोग असा होतो कीं, तो ध्यास करणारा स्वतःस विसरून जाऊन, स्वतः तोच आपल्याला सत्पुरुष समजू लागतो. व देहभानावर जरी आला तरी तो सत्पुरुष अवस्थेचा घेतलेला अनुभव विसरत नाहीं. श्रीउवा. २. १२. २१४

*

## नामस्मरण

नामस्मरण म्हणजे तोंडानें बडबड नव्हे. स्मरण म्हणजे आठवण.

श्रीउवा. २. ८. १४४

स्मरण ही मनाची क्रिया आहे, म्हणून राम, कृष्ण, दत्त वगैरे जीं नांवें घेतात त्यांचें रूप, गुणधर्म सर्व लक्षांत आले पाहिजेत

श्रीउवा. २. ८. १४५

या अभ्यासासाठीं, शुचिर्भूत होऊन, एकांतांत बसून, इष्ट देवतेचें नामस्मरण करीत करीत जे स्थूलरूपानें मनांत विचार येऊं लागतील त्याचा मनानेंच नाश करीत जावा. श्रीउवा. २. ९. १८०

ज्या नामोच्चारणाचीं ज्याला संवय असते, त्याच्या अगदीं नजीक

असलेली जी जड वस्तु त्यांतूनहि त्याचेच प्रमाणें नामोच्चार ध्वनि होतो.
श्रीउवा. ५. २०. ३२४

जसें जनाबाईच्या गवऱ्या विठ्ठल विठ्ठल, म्हणत होत्या अशी कथा आहे. भजन करणाऱ्या भक्तांचे नामोच्चार त्याच्या सहवासांत असलेल्या जड वस्तूंतून बाहेर पडूं लागले म्हणजे ती त्याच्या पूर्णतेची खूणच समजावी.
श्रीउवा. ५. २०. ३२४

त्याप्रमाणें परमेश्वराचें एकदांच असें स्मरण करावें कीं, पुनः स्मरण करण्याचें काम पडूं नये.
श्रीउवा २. ८. १४६

तोंडानें वाटेल त्या इष्टदेवतेचें नांव घ्यावें व जो सत्पुरुष आपण पाहिला आहे, ज्यावर आपली पूर्ण श्रद्धा आहे. त्यांचा आकार मनांत आणावा.
श्रीउवा.२. ८. १४७

मग आपण पाहिलेले सत्पुरुष, हेच आपले वाडवडील किंवा इष्टदेवता आहेत, असें समजावें.
श्रीउवा. २. १४७

मी जरी असा वेडावांकडा असलों, तरी हा आकार मनांत आणावा.
श्रीउवा. २. ८. १४७

तोंडानें वाटेल त्याचें नांव घ्यावें; स्थूलदेही जीवाला आठवण करण्यासाठीं स्थूल आकारच लागतो; मग हा आकार दिसतो.
श्रीउवा. २. ८. १४७

त्याचेच ठिकाणीं आपले वाडवडीलच आहेत अशी पूर्ण भावना करावी.
श्रीउवा. २. ८. १४७

वाडवडिलांना सद्गति देणें, हेंच आपलें कर्तव्य आहे.
श्रीउवा. २. ८. १४८

मग सत्पुरुषांना त्यांचेप्रमाणें लेखून वागाल, तर वाडवडिल याच रूपाचे होतील. ते झाले कीं, तुम्ही कसे राहाल ? तुम्हीहि होणारच. मग सर्वांची अवस्था सारखीच.
श्रीउवा. २. ८. १४८

इतकेंहि करून कुठल्या देवाचा किंवा सत्पुरुषाचा आकार स्मरणांत घेण्यास शक्य नसेल, तर आपण ज्या देवाचें नांव घेत असूं त्या नांवाचीं जीं अक्षरें असतील तीं तर आपल्या ओळखीचीं असतात, तींच अक्षरें हृदयांत आठवीत जावींत व तोंडानें नांव घेत जावें. निदान हा शेवटचा उपाय केला तरी चालेल. श्रीउवा. २. ८. १४९

म्हणूनच तुम्हांला जर कोणाकडून त्रास होऊं लागला तर तो विंच-वाच्या दंशाप्रमाणेंच समजून, सोसून परमेश्वराचें नामस्मरण करीत वेळ काढीत जा. म्हणजे त्याच योगें पुढें सुखाचीहि वेळ लवकरच येईल.
श्रीउवा. ३. २१. ३१९

परमेश्वराचें नामोच्चारण जरी औषधच आहे तरी यथायोग्य सेवन केलें पाहिजे, त्याचे नियम पाळले पाहिजेत. श्रीउवा. ३. ३. ६३

व्यावहारिक रोगाचें औषध तुमचे शारीरिक रोग बरे करील, परंतु भवरोग बरा करणार नाहीं; परंतु नामोच्चारण औषध घेऊन पथ्य सांभाळलें, तर शारीरिक, मानसिक व भवरोगहि चालले जातील.
श्रीउवा. ३. ३. ६२

पथ्याशिवाय व्यावहारिक रोगहि बरा होणार नाहीं व भवरोगहि बरा होणार नाहीं. श्रीउवा. ३. ३. ६२

जसें वैद्याचें औषध घेऊन पथ्य सांभाळलें नाहीं तर गुण येत नाहीं; तसें इकडेहि पथ्य नाहीं सांभाळलें तर गुण येणार नाहीं.
श्रीउवा. ३. ३. ६२

नुसतें नामस्मरण केलें व पथ्य नाहीं सांभाळलें तर उपयोग होणार नाहीं. श्रीउवा. ३. ३. ६२

तसेंच परमेश्वराच्या नामाचें औषध त्यालाहि कांहीं पथ्यपाणी असेलच. श्रीउवा. ३. ३. ६१

पथ्यपाणी नीट सांभाळून राहिलें, तर कोणत्याहि औषधाचा गुण येतो.
श्रीउवा. ३. ३. ६१

नामस्मरणाचें औषध जो देत असेल तो गुरु व तोच वैद्य.
श्रीउवा. ३. ३. ६१

दुसऱ्या औषधाचा विचार करूं नये. याच्याच योगानें सर्व रोगांचा परिहार होतो; परंतु एकनिष्ठेनें असावें. श्रीउवा. ३. ३. ६१

परमात्म्याचें नामस्मरण जें आहे हेंच औषध आहे.
श्रीउवा. ३. ३. ६१

देवाच्या द्वारीं आल्यावर कशाचें औषध आणि कशाचें पाणी, जें कांहीं होईल तें होऊं द्यावें; दुसरें साधन नाहीं. श्रीउवा. ३. ३. ६०

शरीर वाईट असतें. मोडतोड झालेल्या घराप्रमाणें आहे. पडझड शेंकरावी लागते; हें ताबुतांसारखें आहे. श्रीउवा. ३. ७. ११६

अशा स्मरण, ध्यानधारणेसाठीं सत्पुरुष गुरुकृपेनें स्वतः सिद्ध झालेला असो, किंवा आपल्या गरजेसाठीं कोणाहि मनुष्यास सत्पुरुष किंवा पूज्य ठरवलेला असो. निष्काम बुद्धीनें त्यांच्या स्मरणाची पूर्णता झाली म्हणजे दोन्हींचें फळ एकच. श्रीउवा. २. २५. ४३१

आपण एकवार आपल्या मनानें ज्याला सत्पुरुष किंवा पूज्य ठरवला असेल, त्या सत्पुरुषाची देहप्रारब्धामुळें बरीवाईट कांहींहि लीला असली किंवा त्यांचा घाणेरडा, वेडावाकडा, कसाहि आकार असला, तरी त्याचे ठिकाणीं आपला असलेला पूज्यभाव यत्किंचितहि ढळूं न दिला, म्हणजे त्यांच्या लीलेचें व त्यांच्या आकाराचें सहज स्मरण होत असतें. तेंच स्मरण आपण होऊन अधिक वाढविलें किंवा आपोआप वाढत गेलें, तर कार्य लवकर होण्याची ती एक खूणच आहे. श्रीउवा. २. २५. ४२८

स्मरण झाल्याशिवाय मनाला तद्रूपता येत नाहीं.
श्रीउवा. २. २५. ४२९

पण त्यांत एवढेंच आहे कीं, मुलगा देव म्हणतो म्हणून आईबापांनीं आपले ठिकाणीं मनुष्याचे गुणधर्म विशेष न ठेवतां देवाचे गुणधर्म वाढविण्याची काळजी घेतली पाहिजे. श्रीउवा. ५. ९. १६३

आपल्या वाडवडिलांच्या उद्धारगतीसाठींच आपल्या प्रत्यक्ष आईबापांची पूजा व त्यांच्या पश्चात धातूच्या किंवा पाषाणाच्या मूर्तीची पूजा करणें अत्यंत आवश्यक आहे. श्रीउवा. ५. ९. १६३

अशा रीतीनें चोपड्या पैशाप्रमाणें परमेश्वरी सन्मार्गाच्या बाजूनें निरुपयोगी झालेल्या वृद्ध आजोबा आजीबाईंना इतर कोणत्याहि उठाठेवी न करतां केवळ घरांतल्या घरांत नामस्मरण करीत बसण्यापलीकडे दुसरें काय सांगावें ? श्रीउवा. ५. ७. १४१

कोणा कोणा भक्तांना, आपल्या घरांत सत्पुरुष आल्याचें व घरांत फिरल्याचें व कांहीं केल्याचें दिसतात व गुप्त होतात. हा पूर्ण स्मरणाच्या परिसीमेचा परिणाम. श्रीउवा. २. २५. ४३०

जितकें तुम्हीं अंधेऱ्यांत किंवा साध्या स्थितींत देवाचें भजन, पूजन, भक्तिमार्ग करीत रहाल तितका देव लवकर पावेल.

श्रीउवा. ५. ११. १९५

अशा रीतीनें बाह्य डोळे जर आंधळे होत चालले, तर आंतल्या ज्ञानचक्षूच्या तर पुऱ्या खांचाच झाल्या असल्या पाहिजेत.

श्रीउवा. ५. ११. १९३

मनुष्य जन्माला येतो, तो आपल्या आपल्या कर्मानें येतो. जिवंत असतांना तें कर्मफळ भोगीत रहातो व तें भोगीत असतां पुन्हां पुढच्या जन्मासाठीं कर्में करीतच राहातो. श्रीउवा. ५. ८. १४७

बाह्य कृत्रिम साधनांचा उपयोग केलाच नाहीं, तर आपोआपच स्वयमेव प्रकाशच काय, सर्वच कांहीं आपल्या समोर येतच राहातें;

आणि तें नेहमींचेंच असतें. जगांतील बाह्य कृतीच नेहमीं नाश पावते.
श्रीउवा. ५. ११. १९१

## निश्चय

त्याचा निश्चयच त्याच्या सर्व] सुखसाधनास कारणीभूत होऊन बसतो. परंतु तो निश्चय पक्का होण्यास उलट बाजूनें कोणी विरुद्ध उत्पन्न व्हावें लागतें.
श्रीउवा. ५. २२. ३५३

हा जसा त्या मनुष्याचा झोके घेण्याचा कृतसंकल्प होऊन त्यानें अखेर शेंडीचा झोला केला, तसाच ईश्वरप्राप्तीकरतां कृतसंकल्प झाला पाहिजे. ' देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ ' हा निश्चय असल्याशिवाय व्यर्थ आहे.
श्रीउवा. ५. २२. ३५६

मग सगळा गांव मामाचा आणि एक नाहीं कामाचा.
श्रीउवा. ५. २२. ३५४

मलाहि सोडून देईल. पहिलें सुटलें. दुसरें सुटलें. ठिकाण सुटावयास पुष्कळ उपाय असतात. पहिलें सुटलें तर दुसरेंहि सुटलें म्हणजे अर्थातच त्याची निश्चय अवस्था कायम राहात नाहीं. मग शेंकडों देव पाहात बसावयाचें.
श्रीउवा. ५. २२. ३५४

पण कितीहि विरुद्ध समोर येऊ लागलें तरी त्या विरुद्धाला टाळून आपण आपली स्थिति कायमच ठेवली, तर तो खरा निश्चय.
श्रीउवा. ५. २२. ३५३

जो एखादा सद्गुरु म्हणा कीं पूज्य स्थान म्हणा किंवा परमेश्वर म्हणून जेथें मानलें गेलें असेल, मग तो दगड असो, वृक्ष असो, किंवा पशु असो, तेथें एकवार जो निश्चय केला आहे व बरें-वाईट झालें तरी

हा माझा परमेश्वरच आहे, कांहीं झालें तरी निश्चय ढळावयाचा नाहीं. किंवा सुख झालें तरी ढळावयाचा नाहीं. श्रीउवा. ५. २२. ३५३

विनाकारण म्हणजे 'निष्काम' त्यांत कोणताहि हेतु किंवा वासना नसली पाहिजे. त्या ईश्वरी कर्मास विनाकारण म्हणा.का निष्काम म्हणा.

श्रीउवा. ३. ७. १२९

विनाकारण किंवा निष्काम कर्माचें महत्त्व फार मोठें आहे.

श्रीउवा. ३. ७. १२९

*

## निंदा

कारण निंदा करणें, वाईट बोलणें, म्हणजे त्यांचें पाप बाहेर पडतें असें समजावें. तें पाप ऐकणाराच्या हृदयांत प्रवेश करून ऐकणाऱ्याचें पुण्य नाहींसें होतें. म्हणून कोणाची निंदा ऐकूं नये.

श्रीउवा. ३. ३४. ४४२

परंतु सत्पुरुषाची किंवा कोणाची कोणी निंदा करूं लागला तर त्याच्या वाईट गोष्टी ऐकत बसूं नये. श्रीउवा. ३. ३४. ४४२

कोणत्याहि कारणानें किंवा निंदा वगैरेच्या योगें जितकी आपली अब्रू जाईल व मानहानी होईल तितकी आपण सोशीतच गेल्यास तितकी ईश्वरप्राप्ति लवकर होते. श्रीउवा. ३. १८. २६२

*

## निराहार

सर्व इंद्रियांना निराहार ठेवणें; मनानें सुद्धां विचार करावयाचा नाहीं.

डोळ्यानें पाहाणें, पायानें चालणें, तोंडानें बोलणें, कानानें ऐकणें, हातानें काम करणें, मनानें विचार करीत राहाणें असे त्या त्या इंद्रियाचे व्यवहार बंद ठेवणें, किंवा बंद ठेवण्याचा अभ्यास ठेवणें, म्हणजेच खरी सुटी; खरा निराहार, खरें मौन. श्रीउवा. ५. २६. ४०४

*

## निष्ठा

ज्याची निष्ठा आणि सबुरी कायम आहे, त्याचा मी आहें व त्याचा अल्ला मालिक आहे. श्रीउवा. ४. ५. ८७

*

## नुसतेपणा

तशाच रीतीने 'नुसता' जो मी त्या माझ्या ठिकाणी त्या लहान मुलांप्रमाणें तुम्ही जर सत्पुरुषपणाची भावना दृढ करीत गेलांत, म्हणजे कांहीं काळानें मायाही काय आहे तिची ओळख होऊन माझा 'नुसतेपणा' जो आहे हा तुमच्या अनुभवास येऊन, माझ्यावर लादलेला सत्पुरुषपणा किंवा ईश्वरपणा हा तुमचे ठिकाणीं असल्याचा अनुभवास येईल, असा त्याचा सिद्धांत आहे. श्रीउवा. ३. १. १६

परंतु मध्यें कांचेचा प्रतिबंध असल्याकारणानें तें तेथें आपलेंच तोंड असून जसें त्या पोराला घेतां येत नाहीं; तसेंच तुमचेंच आनंद रूप माझ्या नुसत्यांत आलेलें असून काचेप्रमाणें मध्यें मायेच्या पडद्याचा प्रतिबंध असल्यामुळें तुम्हांला घेतां येत नाहीं. श्रीउवा. ३. १. १५

माझे ठिकाणी आरशाप्रमाणें 'नुसतें' पणं आहे. कशावरून ? तर

तुमच्या सत्पुरुषपणाचा अनुभव तुम्ही माझ्यापासून घेतां म्हणून.

श्रीउवा. ३. १. १३

जर तुमच्यायोगें मलाच सत्पुरुषपण, परमेश्वरपण आल्यासारखें होत असेल, तर कोणी मला सत्पुरुष म्हणत असाल तर म्हणा. सत्पुरुषपण, परमेश्वरपण हें तुमचेच ठिकाणीं आहे. श्रीउवा. ३. १. १३

मी ‘नुसता’ पोकळीप्रमाणें मोकळा आहें. श्रीउवा. ३. १. १३

म्हणून तुम्हांला मी जरी देहरूपानें दिसतों, तरी तुम्हीं मला सत्पुरुष, देव, किंवा मनुष्य इत्यादि जणांपैकीं आकारवान् मला समजूंच नका.

श्रीउवा. ३. १. १३

तर तें सत्पुरुषपण, परमेश्वरपण तुमचें तुम्ही ओळखून घ्या, अनुभवांत आणून घ्या. श्रीउवा. ३. १. १२

तसेंच तुमचे ठिकाणीं अंतर्यामीं असलेल्या सत्पुरुषपणाचा व ईश्वरपणाचा तुम्हांला अनुभव नाहीं, म्हणून तो माझ्या आरशाप्रमाणें असलेल्या ‘नुसतें’ पणा समोर तुम्हीं आल्याबरोबर तुमचें सत्पुरुषपण माझ्या ‘नुसते’ पणांत प्रतिबिंबित होऊन तुम्ही सत्पुरुष परमेश्वर म्हणूं लागलात.

श्रीउवा. ३. १. ११

मी केवल ‘नुसता’ आरशासारखा. तुमच्या तोंडाचा अनुभव तुम्हांला येत नाहीं, म्हणून नुसतेपणाचा प्रतिनिधी जो आरसा त्याच्यासमोर जाऊन तुम्ही आपल्या चेहऱ्यांचा अनुभव घेतां तसेंच तुमचे आंतले सुष्टदुष्ट जसें असेल तसें तुम्हांला माझ्या ‘नुसतेपणाच्या’ योगें दिसेल. श्रीउवा. ३. १ ११

तर तुमचे जे आंतले न दिसणारे सुष्टदुष्ट स्वभाव गुणधर्म ते माझ्या नुसतेपणांत येऊन, ज्याचें जसें असेल तसेंच त्याचें त्याला अंतर्यामीं असलेल्या आत्म्याला दिसणार. दुसरें काय दिसणार ?

श्रीउवा. ३. १. ९

जर मी 'नुसताच' आहें तर माझ्या ठिकाणीं तुम्हांला काय दिसणार ? श्रीउवा. ३. १. ९

परंतु तुम्हीच सत्पुरुष, परमेश्वर, पूर्ण परब्रह्म आहांत अशी तुमची तुम्हांला मी खात्री करून देतों- श्रीउवा. ३. १. ९

मी साचाचें व ठसा उमटून घेण्याचें साधन आहे. श्रीउवा. ३. १. ९

तशाच रीतीनें मी साच्यासारखा असून तुम्हीं लोक ज्या बऱ्यावाईट भावनेचा रस माझ्या ठिकाणीं कायम कराल तसा ठसा तुमचा स्वतःच बनेल, माझें काय होणार ? श्रीउवा. ३. १. ८

ज्या आकाराचा साचा बनवून त्यांत कोणताहि धातूचा रस ओतल तशाच तऱ्हेचा ठसा पुढें निघेल. श्रीउवा. ३. १. ८

मी एक ठसा उमटवून घेण्याकरतां साच्यासारखा आहें.

श्रीउवा. ३. १. ७

कारण ज्या ज्या देवता तुम्हीं माझ्या ठिकाणीं ठरवाल त्या सर्व देवता मीच आहें व त्या त्या भक्तांना त्यांच्या त्यांच्या प्राप्तीसाठीं त्याच देवता केवळ माझ्या रूपांनीं साधनीभूत होऊन बसल्या आहेत.

श्रीउवा. ३. १. ५

माझ्यावर ज्या रीतीचें तुमच्याकडून निश्चित ठरलें जाईल तशा रीतीची गति तुम्हांस मिळेल. श्रीउवा. ३. १. ५

नुसत्याचा कोणी कांहींहि उपयोग करूं शकतो. श्रीउवा. ३. १. ३

त्या मडक्यांत कोणीं दूध ठेवलें दूध ठेवणाराला दुधाचाच अनुभव येईल; तें दूध निघून गेलें व कोणी गोमूत्र ठेवलें तर त्याचा अनुभव येईल. तें निघून गेल्यावर कोणी सुगंधित पदार्थ ठेवला तर तसा अनुभव येईल. कोणी दुर्गंधी पदार्थ ठेवला तर तसा अनुभव येईल. कोणी कांहीं, द्रव्य, सोनें, दागिने इत्यादि वस्तु ठेवल्या तर त्यांतून तसें दिसू लागेल. तसें हें माझें गाडगें रिकामें 'नुसतें' आहे. श्रीउवा. ३. १. २

केवळ माझ्या ठिकाणीं काहीं नाहीं, मी आपला ' केवळ नुसता ' आहें, जसें एखादें नुसनेंच रिकामें मडकें असतें व ज्याच्याकडून त्यांत जें कांहीं ठेवलें जाईल, तसाच त्या मडक्यांतून त्याला अनुभव येईल.

श्रीउवा. ३. १. २

*

## परमेश्वरी अवस्था

ज्याच्या त्याच्या परिस्थितीप्रमाणें न वागूं दिलें, तर अनवस्था होईल.

श्रीउवा. २. ४. ७४

जरी प्रेम सारखें आहे, तरी बाह्य परिस्थितीप्रमाणें नाहीं वागलें, तर त्याची अवस्था तशी नसल्यामुळें उपयोग होत नाहीं. तसेंच परमेश्वराजवळ आहे. एखाद्यास शिवी दिली पाहिजे, व एखाद्यास हांकलून लाविलें पाहिजे, कोणाचें फेकून दिलें पाहिजे व कोणाचें स्वीकारलें पाहिजे.

श्रीउवा. २. ४. ७४

देवापाशीं सर्व सारखेंच असतें. परंतु समाजाची परिस्थिति भिन्न भिन्न असल्यामुळें त्याच्या योग्यतेप्रमाणें पद्धतशीर वागविणें म्हणजेच परमेश्वराल सर्व सारखें असल्याचें समजावें. श्रीउवा. २. ४. ७६.

असें होत असतां परमेश्वरी रीतीचेच मधून मधून साक्षात्कार होत असतात. श्रीउवा. ५. २१. ३४१

म्हणजे अर्थातच तशा त्या शरीरांत असणारा आपला जीवहि मनुष्याच्या स्थितीप्रमाणें दुःखभोगी न रहातां ईश्वरी रीतीचाच तो जीव होऊन ईश्वरी सुख भोगूं लागतो. श्रीउवा. ५. २१. ३४१

आणि आपल्या चालू जन्मातच अखेर अखेर याचा अनुभव येतो.

श्रीउवा. ५. २१. ३४१

असा हा परमेश्वरी सत्कर्म करण्याचा फार विलक्षण प्रभाव आहे.
श्रीउवा. ५. २१. ३४१

स्वातंत्र्य स्वीकारून त्या आपल्या स्वातंत्र्याचा बळें होऊन सत्कर्म करण्याकडे उपयोग करून शरीराला, जीवाला व मनाला परमेश्वरी घडण किंवा वळण देण्याचा प्रयत्न करावा. नवीन होतकरू प्रजाजनांनाही असत्, क्रियेचें इतर फालतू वळण देण्यापेक्षां त्यांच्याहि शरीर, जीव व बुद्धीला परमेश्वरी सत्कर्माचेंच वळण वाढत जाईल. श्रीउवा. ५. २१. ३४२

पण प्रेतापेक्षां अधिक निर्जीवाचा बोध जोंपर्यंत झाला नाहीं तोंपर्यंत ज्यांच्या दृष्टीनें प्रेत ही वस्तु निर्जीव असें ठरलें तर तिथेंच परमेश्वर समजावें. श्रीउवा. ५. २२. ३४४

जगांत परमेश्वर कोठें पहावा याची ही युक्ति आहे. श्रीउवा. ५.२२.३४४

सत्पुरुषाचा जो आकार तो परमेश्वराचा आकार असा सिद्धांत आहे.
श्रीउवा. २. १२. २११

खास अत्यंत निविड जो अंधकार तेंच खरें परमेश्वराचें अगदीं आरंभींचें स्वरूप, त्या अंधकाराशींच त्याचें मन तादात्म्य पावतें, त्यांनाच त्या अंधकारांत स्वयंप्रकाश ज्ञानरूप अशा भगवंताचें दर्शन होतें.
श्रीउवा. ३. ७. ११०

परमेश्वराची भेट करूं इच्छिणारे पुण्यवान स्त्रीपुरुष एकांतांत अंधेऱ्यात वसून शिवाय डोळे मिटून आंतल्याआंत असणाऱ्या अंधेरामध्येंच परमेश्वराची ध्यान धारणा करीत राहतात, व त्या अंधेरांत जगापैकीं कोणतेहि विचार न आले म्हणजे त्या अंधेऱ्यांतच खास परमेश्वराचें दर्शन होतें.
श्रीउवा ३. ७. ११०

म्हणजे त्याचें ईश्वर सर्व पाहून घेतो. आपलें जर ईश्वरावर लक्ष आहे. तर ईश्वरहि आपल्याला दूर करणार नाहीं. श्रीउवा. ३. ६. १०७

हा अगदीं सोपा उपाय परमेश्वरप्राप्तीचा आहे, कीं त्याची जी अवस्था

आहे त्याप्रमाणें वागावें. परमेश्वराच्या ठिकाणीं परमेश्वर पण आहे, त्याचे गुणधर्म आपल्यांत यावे असें वाटत असेल तर त्याचें होऊन बसावें, व परमेश्वराचे गुणधर्म आपल्यांत येतील असें वागावें. श्रीउवा. ३. ५. ९५

तसें आपण इमानेंइतबारें मनापासून परमेश्वराचे झाल्यावर त्याचें जें असेल तें आपलें होऊन बसतें. तुम्हीं वाऱ्यावर वरात, भुईवरील सारवणासारखें येतां म्हणून मी म्हणतों येतां या, जातां जा, राहतां राहा, घरचे होऊन जाण्याच्या कोटींतले तुम्ही दिसत नाहीं. श्रीउवा. ३. ५. ९६

याप्रमाणें स्थिरचर वस्तूंपैकीं कोणत्याहि एका वस्तूवर परमेश्वराचा आरोप पूर्ण करून प्रत्यक्ष परमेश्वराचा अनुभव येऊन जाणीव होऊं लागली, तर इतर कोणत्याहि वस्तूंच्या ठिकाणीं परमेश्वराचीच विभूति अनुभवास येऊं लागते; व परमेश्वरी आनंदाचाहि लाभ होऊं लागतो.
श्रीउवा. ३. ५. ८९

हेंच पूर्ण आरोप केल्यामुळें व पूर्ण दृढभावना ठेवल्यामुळें परमेश्वरपणाचा प्रकटपणाचा साक्षीपुरावा समजावा. श्रीउवा. ३. ५. ८९

तर परमेश्वराचा आरोप करणारा जो कोणी त्याच्याकडून पुष्कळ कालपर्यंत पूजा, सेवा वगैरेंच्या योगें आरोपाची पूर्णता होत गेली म्हणजे त्याची पूर्वीं असलेली अव्यवस्थित मनाची वृत्ति नाहींशी होऊन मन शांत होतें; मनास समाधान वाटतें; आनंद उत्पन्न होतो; काळजी चिंता नाहींशा होतात; कांहीं दुःख, संकटें असतील तीं नाहींशीं झाल्याचा अनुभव येतो.
श्रीउवा. ३. ५. ८८

ज्याच्या घरीं जावें त्याच्यासारखें व्हावें. श्रीउवा. ३. ५. ९५

परमेश्वराच्या घरीं त्याच्यासारखें होऊन गेलें तर त्याची जी अवस्था ती आपली. श्रीउवा. ३. ५. ९५

कोणत्याहि स्थिरचर वस्तूच्या ठिकाणीं परमेश्वरासंबंधीं आरोप पूर्णपणें झाल्याबद्दल तेथें साक्षीपुरावा कोणता ? श्रीउवा. ३. ५. ८८

मग तो आरोप करतां करतां तो आरोप पूर्ण होण्याला जितका काल पाहिजे तितका कालपर्यंत पद्धतशीर यथाशास्त्र म्हणजे, ज्यायोगें तो आरोप नाहींसा होणार नाहीं असा आरोप करावा. श्रीउवा. ३. ५. ८८

म्हणूनच अनादिकालापासून आपल्या ठिकाणीं परमेश्वरपण असल्याची पूर्ण जाणीव होण्यासाठीं तत्त्ववेत्त्यानीं पूर्ण विचार करून असा सिद्धांत करून ठेवला आहे कीं, आपल्या ठिकाणच्या परमेश्वरपणाची जाणीव होण्यासाठीं बाह्य वस्तूवर जरी परमेश्वरपणाचा बोध होत नाहीं, तरी जबरदस्तीनें परमेश्वरपणाचा आरोप त्या वस्तूवर करावा.

श्रीउवा. ३. ५. ८८

वस्तुतः जगांतील सर्व वस्तु परमेश्वरच आहेत, परंतु त्याची जाणीव होण्याइतकी आपली बुद्धि नाहीं; त्या बुद्धीस प्रगल्भता येण्यासाठीं, म्हणजे सर्व ठिकाणीं परमेश्वर आहे ही जाणीव येण्यासाठीं, आपण जबरदस्तीनें कोणत्याहि वस्तूवर परमेश्वरपणाचा आरोप नेहमीं करून पूजाअर्चा करून प्रेमभाव ठेवला पाहिजे. श्रीउवा. ३. ५. ८७

त्याचप्रमाणें परमेश्वर जरी सर्वच स्थिरचर वस्तूंत भरलेला आहे, व त्याच्या प्राप्तीसाठीं कोठेंहि जरी त्याच्या रीतीचा प्रयत्न केला तर तो प्रगट होतोच परंतु जशी ज्याची मनाच्या साधनाची तयारी असेल, व त्या साधनाची अवस्था ज्रशी असेल, तशा रीतीनें परमेश्वर लवकर किंवा उशीरा त्या ठिकाणीं प्रगट होईल. श्रीउवा. ३. ५. ८७

तसेंच सत्पुरुष किंवा परमेश्वर हे पहिल्यापासून असतातच; परंतु आपण जेव्हा त्यांच्या दर्शनास जाऊं आणि आपल्या स्वतःच्या कल्याणासाठीं एखाद्या सत्पुरुषाला जे दिवशीं मनापासून सद्गुरु ठरवून घेऊं, तेव्हां आपण आंब्याच्या वृक्षाचें बीज किंवा रोप लावल्याप्रमाणें सद्गुरुरूपी किंवा परमेश्वररूपी कल्पवृक्षाचें बीज किंवा रोप लावलें असें समजून घ्यावें. श्रीउवा. ३. ५. ८४

नाशवंताचे रक्षण करणें हें अज्ञान आहे. तथापि शरीर चांगलें व्हावें याकरितां करणी करणें असेल, तर परमेश्वराचें शरीर आहे असें समजून करावी. साक्षात् परमेश्वर त्यांत वास करून राहिला, तर आपण परमेश्वर-रूप झालों. श्रीउवा. ३. ३. ६४

तर परमेश्वराचे गुणधर्म नेहमीं लक्षांत ठेवणें; त्या गुणधर्मांपैकीच, तो सर्वसाक्षी व त्याला निरंतर दिसत असतें, हें परमेश्वर मानतांना केव्हांहि विसरूं नये व तो जर सर्वसाक्षी आहे, तर त्याला सांगण्याचें किंवा मागण्याचें काय काम ! व जर तुम्ही मागत असाल, किंवा सांगत असाल तर सत्पुरुषाच्या ठिकाणी किंवा कोठेंहि परमेश्वर मानणें तुमचें पक्कें नाहीं असें होतें. श्रीउवा. ३. २४. ३५०

भक्त आणि परमेश्वराची कशासाठीं जरुरी आहे, कीं स्वतः जो परमेश्वर आहे त्याला आत्मस्वरूपाचा व अघटित शक्तीचा अनुभव यावा, यासाठीं तो होऊनच प्रकृतिद्वारें, भक्तरूपानें प्रगट होऊन आपण स्वतः स्वतःच्या अनुभव व अघटित शक्तीचा अनुभव भक्तरूपानें घेतो. भक्त जो आहे तोहि खास परमेश्वराचा अनुभव घेतो.

श्रीउवा. २. २५. ४२६

म्हणजे तो कृत्रिम मनुष्य चक्रांतून सुटून स्वयंभू स्वतः सिद्ध अशा परमेश्वरी चक्रांत आलो, असें समजावें. मग त्याचें तें मनुष्यशरीर असूनहि तें कृत्रिम न समजतां अकृत्रिम समजावें. श्रीउवा. २. १७. २८६

खास परमेश्वराचे जे अनंत आकार आहेत त्यांत शेवटचा आकार मनुष्यरूपानेंच आहे. पण ज्याचेकडून पुनः कृतीच्या पोरांच्या रूपानें मनुष्य उत्पन्न केला जाणार नाहीं तर, कोणताहि अभिमान नसला तर त्याच मनुष्याचा जीव परमेश्वर होऊन बसतो व त्याचें शरीरहि परमेश्वरी गुणधर्माचें होऊन बसतें. श्रीउवा. २. १७. २८६

म्हणजे मनुष्याचा आकार हा मनुष्यरूपच आहे. परंतु नवीन कृतीनें पुनः पोरांच्या रूपांनी मनुष्य उत्पन्न करणें, निरनिराळे अभिमान स्वीकारणें याला व्यवहारांत मनुष्य म्हटलें जातें. या दोन्ही गोष्टींनीं रहित जो असतो, तो मनुष्याच्या आकारांतच परमेश्वर म्हटला जातो. त्याचे ठिकाणीं पूर्वीचें असलेलें कृत्रिम मनुष्यपण जाऊन स्वयंभू स्वतः सिद्ध असें परमेश्वरपण प्रगट होतें. श्रीउवा. २. १७. २८६

मनुष्याच्या स्थूल शरीराशिवाय सूक्ष्म शरीरांत शुद्ध आत्म्याचा प्रवेश होऊन, सूक्ष्म शरीराची ओळख व त्यायोगें परमेश्वरी पूर्ण अनुभव येत नाही. श्रीउवा. १. २. ३४

आनंदरूप परमेश्वर व आपण एकच असून विषयाच्या मिश्रणानें आपण निराळे होऊन, आपल्याला जीव हें नांव आलें; व शुद्ध आनंद-रूप परमेश्वर हा आपल्याहून निराळा, असें होऊन बसलें.

श्रीउवा. १. १. २५

एकहि भगवानके और और नाम और बहोत अवतार हैं.

श्रीउवा. २. २६. ४३६

परमेश्वरास आपलें शरीर, जीव, मन हेच मुख्य द्यावयास पाहिजे. तें प्रत्यक्ष दिलें जात नाहीं. म्हणून शरीर, जीवाच्या उत्पत्तीला व संरक्षण करण्याला साधनीभूत (कारणीभूत) ज्या अन्नवस्त्रादिक वस्तू, त्याच परमेश्वरी बुद्धीनें कोणालाहि दिल्यावर शरीर, जीव, मन हेंच परमेश्वराला दिल्यासारखें होतें. श्रीउवा. २. २८. ४८७

याकरतां एक सुलभ उपाय आहे, पण त्यांत एक अट आहे; ती अट ही आहे कीं जें कांहीं कराल तें तुम्हीं आपल्या अंगावर घेऊं नका. सुख भोगा, चैन करा, परंतु त्याचा संबंध माझ्याशीं किंवा परमेश्वराशीं जोडा.
श्रीउवा. २. २९. ४९८

मला तर तुम्हीं सर्वच परमेश्वर दिसतां, सर्व जगहि परमेश्वरच दिसतें. तर परमेश्वर बुद्धीनें तुम्हीं कोठेंहि पूज्यभाव ठेवला तरी तो परमेश्वराशीं संबंध जोडल्यासारखा होतो. श्रीउवा. २. २९. ५००

येथें यावयाचें कशासाठीं ? तर मनुष्यपणाचे वेडेवाकडे गुणधर्म निघून जावे व ईश्वराच्या गुणधर्मांशीं आपला आत्मा जोडला जावा यासाठींच येथें यावयाचें असतें. श्रीउवा. १. २८. ४४५

परमेश्वरच आपल्याला खाऊं घालतो हा निश्चय समजून, आपण कोणालाहि परमेश्वर समजूनच खाऊं घातल्यास, परमेश्वर आपल्यास अधिक अधिक देत राहतो. श्रीउवा. १. २७. ४३६

पूर्ण दरिद्रीपण म्हणजेच परमेश्वरपण. श्रीउवा. २. २८. ४८६

संसारांत येऊन स्वधर्माला अनुसरून सत्कर्में करीत संसार व ऐहिक सुखाचा व्यवहार करावा व असें करतांना जे कष्ट येतील ते सोसावे, किंवा संसारांत पडून कशींहि दुःखें व संकटें आलीं तरी प्रल्हादाप्रमाणें किंवा पांडवांप्रमाणें सोसून परमेश्वराला किंवा परमेश्वरासारख्या सद्गुरूला शेवटपर्यंत सोडूं नये. श्रीउवा. २. २४. ४००

परमेश्वराला हृदयांत सांठविल्यावर परमेश्वराचे ठिकाणीं असलेला जो आनंद त्याचा अनुभव आपल्या शरीरांत असलेला सूक्ष्मजीवात्मा तो घेतो. श्रीउवा. २. २३. ३८१

शाश्वत जो परमेश्वर याचीच मनाला संवय ठेवली, तर आपलें मन व शरीरादिक सर्व सुखसाधनेंहि शाश्वत होऊन बसतात. श्रीउवा. २. २५. ४१९.

सर्व जग हें तरी मनाचेंच रूपांतर आणि मन हें आपण म्हणून जे आहोंत, त्या आपलें रूपांतर; आणि आपण म्हणून जे आहोंत ते तरी साक्षात् सच्चिदानंद परमात्मा जो परमेश्वर त्याचेंच रूपांतर आहोंत. श्रीउवा. २. २४. ४०६

अहो, जर तुम्हांला राज्य, स्वराज्य मिळवून राजा होण्याचें हांवरें असेल तर प्रथम तुम्हांला किंवा तुमच्या बायकोला पुरुषोत्तम, परमपुरुष अवस्था हीच यावयास पाहिजे. श्रीउवा. १. १४. २१३.

जो परमपुरुष पुरुषोत्तम अवस्थेंत गेलेला असतो त्यालाच आपल्या अंशरूपानें पृथ्वीवरचा राजा व्हावें लागतें आणि तोच राजा होत असतो.
श्रीउवा. १. १४. २१३

विषयवस्तु पूर्ण सुटल्या म्हणजे पूर्ण आनंदरूप तोच परमेश्वर अनुभवाला येतो. श्रीउवा. १. ९. १६३

जसजशी गुप्तपणें परमेश्वरी अवस्था प्रगट होत राहते, तसतशी सहनशक्तीहि वाढत जाते; आणि अधिकाधिक मानसिक सहनशक्ति वाढत जाणें ही परमेश्वरी अवस्था अधिकाधिक प्रगट होण्याची तर खूणच आहे. श्रीउवा. १. ९. १५८

शुद्ध आत्मा तोच परमेश्वर तीच तर दोघांच्या संयोगांत उत्पन्न झालेली तिसरी परमेश्वर वस्तु समजावी; व त्या शुद्ध चैतन्याचे ठिकाणींच परमेश्वरी अघटित शक्तिप्रभाव व खऱ्या अखंड सुखाचा उगम हें त्या कलमी आंब्याच्या फळाप्रमाणें समजावें व मनुष्यरूप हें परमेश्वराचें शरीर समजावें. श्रीउवा. १. ९. १५४

शुद्ध शूद्र, शुद्ध कुलीन स्त्रिया आणि शुद्ध स्वधर्माचारी ब्राह्मण ह्या तिघांच्या ठिकाणीं प्रारब्धरहित अवस्था असल्यामुळें, तिघांमध्येंहि परमेश्वरी अवस्था असते. श्रीउवा. १. ८. १५०

शूद्र लोकांच्या रूपांनीं साक्षात् परमेश्वरच जगांत प्रथमावस्थेंत आलेला आहे. शूद्र शब्दांत मुख्य तीन वर्ण आहेत. त्याचा उघड अर्थ करूं लागलें तर शूद्र शब्दाचा साक्षात् परमेश्वर असाच अर्थ आहे.
श्रीउवा. १. ८. १४७

परमेश्वरी पद्धतीचें द्वैत कोणतें ? तर स्वधर्माचरण. निरनिराळें स्वधर्माचरण व निरनिराळीं परमेश्वरी सत्कर्मे यालाच म्हणावें परमेश्वरी रीतीचें द्वैत. श्रीउवा. ४. १.९

ते महापुरुष किंवा रामकृष्णादि परमेश्वर प्रत्यक्ष उदयास येतात व बीजरूपांनीं असलेली जी त्यांची वस्तु ती दिसेनाशी होते व ज्यांनीं त्यांचें बीज आपल्या हृदयांत पेरलें असेल, त्यालाच त्याचा अनुभव येतो.
श्रीउवा. १. ७. १२६

तसेंच साक्षात् परमात्मा परमेश्वरहि या सर्व जगांतच भरलेला आहे, परंतु जगाच्या रीतीचें जें जें कांहीं आहे तें सर्व आणि जगाची समज देणारी जी मन, बुद्धि हें शुद्ध मनानें बाजूस सारल्यासारखें केलें, म्हणजे तेथेंच परमेश्वराचा अनुभव येतो. श्रीउवा. ४. ३. ५२

जगाच्या कल्याणाकरतां व आपापल्या घराण्यांतहि सर्व सुख समाधानासाटीं सर्वत्र ईश्वरी शक्ति प्रत्येकाच्या घराण्यांत पाहिजे.
श्रीउवा. ५. २८. ४२९

ज्या ठिकाणीं पूर्ण ज्ञान तेथें सहनशक्ति; व जेथें पूर्ण सहनशक्ति तेथेंच पूर्ण ज्ञान. जेथें हे दोन्ही आहेत तेथेंच परमेश्वराची वस्ती.
श्रीउवा. ४. १९. ३२८

परमेश्वर होण्याची नुसती हौस, परंतु परमेश्वराचे, जड वस्तूंचे गुणधर्म मात्र तुम्हाला घ्यावयाला नकोत. मग परमेश्वर होण्याची हौस कशी पूर्ण होईल ? श्रीउवा. ४. १९. ३२९

एकदां साळपण निघून शुद्ध तांदूळ झाल्यावर तो तांदूळ जसा पुन्हा जन्ममरणाच्या प्रसंगांत येत नाहीं, तसेंच एकवार मनुष्याचें मनुष्यपण काढलें जाऊन शुद्ध ईश्वरीपणाचा अनुभव आला म्हणजे तोहि पुन्हा जन्ममरणांत येत नाहीं. श्रीउवा. ५. ३१. ४६१

तसेंच मनुष्यपण काढलें जाऊन शुद्ध ईश्वरी अवस्था प्राप्त झाल्यावर जन्ममरणाच्या रीतीचा पुन्हा ये–जा नाहीं. श्रीउवा. ५. ३१. ४६२

जगांतील सर्व जागा परमेश्वराचे अवयव आहेत.

श्रीउवा. १. १८. २४७

परमेश्वराचे ठिकाणीं असलेले अघटित मानसिक शक्ति वाढविणारे व सर्व प्रकारें सुख उत्पन्न करणारे असे परमेश्वरी गुणधर्म ग्रहण करणें म्हणजेच परमेश्वराचें सेवन केलें असें होतें किंवा सेवा केली असें होतें.

श्रीउवा. १. १५. २१७

कोणत्याहि वस्तूवर परमेश्वरी गुणधर्माचा पूर्ण आरोप करून त्याची पूर्णतां केली म्हणजे त्याच वस्तूचे ठिकाणीं साक्षात् परमेश्वर प्रगट होतो.

श्रीउवा. १. २२. ३३६

स्त्रिया व पुरुष, यांना आपल्या स्वतःचें आत्मज्ञान म्हणजे परमेश्वरी ज्ञान होण्यासाठीं शरीरप्रकृति ही असून नसल्यासारखी करण्याचा अभ्यास झाला पाहिजे. श्रीउवा. २. १८. ३१

परमेश्वरका और भक्तका जब ऐक्यभाव हो जाता है तब परमेश्वरका परमेश्वरपण, और भक्तका भक्तपण पूरा हो गया ऐसा समझना. यांत संसार प्रपंच बळेंच होऊन सोडलाच पाहिजे असें नाहीं. घरदार, संसार, प्रपंच खुशाल करा. परंतु त्यांत जसें तुम्ही काळजी करून मुद्दाम होऊन बांधून घेण्याची खटपट करतां, त्याबरोबरच परमेश्वरी सत्कर्मांतहि हटकून निश्चयानें बांधले जाल असे प्रयत्न ठेवा. श्रीउवा. ५. ३०. ४४८

परमेश्वरास आपल्या हृदयांत बांधून घ्यावें, किंवा आपण तरी त्याच्या· संबंधीं पुण्यकारक सत्कर्में करण्याच्या योगें बांधलें जावें.

श्रीउवा. ५. ३०. ४४८

परमेश्वराचें नेहमीं स्मरण व सेवाधर्म करीत जा. मनुष्यजन्मांत केव्हां

केव्हां आपल्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडतात. त्यावेळीं हर्ष मानूं नये. व केव्हां केव्हां इच्छेविरुद्ध गोष्टी होतात त्याबद्दल खेद मानूं नये.

श्रीउवा. ५. ३०. ४४७

सत्पात्र व स्वधर्मनिष्ठ सत्क्रिया करणाऱ्या विद्वान ब्राह्मणांच्यायोगे यथाशास्त्र पद्धतीनें त्या मूर्तींत किंवा आकारांत, किंवा कोठेंहि जड चैतन्य वस्तूचे ठिकाणीं वेदशास्त्रोक्त मंत्रद्वारा प्राणप्रतिष्ठादि विधीच्या योगें परमेश्वरी गुणधर्म आणले जातात व परमेश्वरी संस्कार नेहमीं करीत असल्याकारणानें त्या ठिकाणीं अदृष्ट ईश्वरपण व ईश्वरी शक्ति प्रगट होतच असते. श्रीउवा. ५. २८. ४३२.

त्यांना आपण शरण गेलों व आपली मनुष्य अवस्था व शरीर कायम राहून केवळ नुसतें जगव्यवहाराप्रमाणें असलेलें मनुष्यपण तेंच काढून टाकण्याची व मनुष्यपणांतच असलेल्या शुद्ध परमेश्वराची प्राप्ति व्हावी अशी जर दृढ इच्छा असली तर सद्‌गुरु ज्या रीतीनें वागवतील त्या रीतीच्या वागणुकींत आपण असणें म्हणजेच चरफडणें, भरडणें व मनुष्याचें मनुष्यपण कांडलें जात असून काढलें जात आहे असें होतें.

श्रीउवा. ५. ३१. ४५९

असें त्या सद्‌गुरूच्या सहवासांत असून मनुष्याला मधून मधून सद्‌गुरूकडून कांडल्यासारखा जो थोडा फार त्रास होतो त्याचयोगें मनुष्यपण काढलें जातें. मग अर्थात् साळीचें साळपण निघून गेल्यावर शुद्ध तांदळासारख्या त्या शुद्ध आत्म्याची व परमेश्वराची पूर्ण प्राप्ति होऊन जाते.

श्रीउवा. ५. ३१. ४६०

ज्यानें परमेश्वरास आपलें रूप म्हणजे आकार-शरीर व मन दिलें आहे, त्याला रुपये देण्याची जरूरी राहिली नाहीं. श्रीउवा. ५. २३. ३५८

जो कोणत्याहि ठिकाणीं अडत नाहीं तो परमेश्वरप्राप्तीस योग्य समजावा. श्रीउवा. १. १८. २४७

सत्पुरुषाचे सहवासानें अधिक अधिक सात्त्विक गुण वाढत जाऊन त्याचे ठिकाणीं परमेश्वरी अवस्था पूर्ण येत गेली, म्हणजे वरून माणसासारखा पण आंतून परमेश्वरासारखा बनून जातो व अंतकालीं तोच मनुष्याच्या देहापासून अलग झाला म्हणजे सत्पुरुषाच्या ध्यासानें परमेश्वरासारखा बनलेला जीव तो परमेश्वरासारखाच सर्वशक्तिमान असा कोठेंहि त्याच्या इच्छेस वाटेल तेथें प्रगट होतो, यालाच म्हणतात उद्धारगति.

श्रीउवा.१. १७. २४०

मनुष्यासह सर्व जग हें त्या निराकार अशा परमेश्वराचेंच साकार रूप आहे. श्रीउवा. २. १०. १६३

मग म्हातारपणीं इंग्रजी शिकण्याप्रमाणेंच देवधर्म, परमेश्वराचें चिंतन हेंहि कठीण जातें. श्रीउवा. ५. २५. ३९७

जे लहानपणापासून व्यवहार झाले असतील, त्याची जितें मन जितेपणीं उजळणी करतें म्हणून अंतकाळीं ते संस्कार पक्के झाल्यामुळें तेंच पुढें येतें. श्रीउवा. ५. २५. ३९७

यावरून पहा कीं, परमेश्वरी संस्कार केव्हां करून घ्यावे ते. बाल्यावस्थेपासूनच करून घेणें अत्यंत जरूर आहे.

श्रीउवा. ५. २५. ३९६

बाल्यावस्थेपासूनच खोटेनाटे संस्कार झालेले नसून, केवळ परमेश्वरी संबंधानेंच उत्तम प्रकारचे संस्कार झाले असून त्या रीतीचा पाया उत्तम रचला गेला असला तर त्या पायाच्या आधारावर मधला काहीं का व्यवहार होईना; तरी मुख्य जो परमेश्वरी पाया त्याचप्रमाणें सुखकारक असें त्याचें आयुष्य जाऊन अखेर अंतःकाळींहि त्याच परमेश्वरी पायाला अनुसरूनच अखेर गति मिळणार हा सिद्धांत समजावा.

श्रीउवा. ५. २५. ३९४

भक्तांनीं ईश्वरास मागत बसण्याची आवश्यकता नाहीं, त्यांनी आपलें कुल, शील ध्यानांत ठेवून, धर्मानें व नीतीनें वागून, ईश्वरसान्निध्यांत सत्कर्म करीत राहिलें व त्यांत जो त्रास होईल तो सोशीतच राहिलें म्हणजे त्यांचें कर्तव्य झालें व हे सर्व देवाला दिसतच असतें. पुढील कर्तव्य ज्याचें तो पाहून घेईलच. त्याच्या उण्या गोष्टी सद्गुरूस दिसत असतात व त्याच्या पूर्णतेची कामगिरी त्यांची आहे. ते ती करतीलच. आपण जर परमेश्वर मानिलें असेल तर मानणें म्हणजे काय ?

श्रीउवा. ३. २४. ३५०

आमचें जसेंच्या तसेंच होतें, पण आपोआप स्थितीनें जसें व्हायचें तसें झालें. श्रीउवा. ३. ३४. ४३७

म्हणजे कोणत्याहि प्रकारें जगाच्या व्यवहारांत आपलें शरीर, मन, बुद्धि निरुपयोगी ठरविलीं गेलीं पाहिजेत. श्रीउवा. ३. ३०. ४०९

असें ज्या स्त्री पुरुषांचें शरीर, मन, बुद्धि निरुपयोगी झाले असतील, अशांच्या शरीरांत साक्षात् परमेश्वर वस्ती करण्यास येतो.

मनुष्याचें मन जगव्यवहाररहित होऊन एकदां तेथें परमेश्वराची वस्ती प्रगट झाली, म्हणजे मग तो मनुष्य कांहींहि जगव्यवहार करील तरी त्याचें परमेश्वरपण मोडत नसून, ते व्यवहार जगाच्या कल्याणासाठीं असतात. श्रीउवा. ३. ३०. ४१०

असे व्याधिग्रस्त लोक जगव्यवहारांत मनुष्यपद्धतीनें शरीरानें निरुपयोगी ठरलेले असतात. म्हणून ते ईश्वररूप समजावे.

श्रीउवा. ३. ३०. ४१३

तो परमेश्वर अनंत असल्यामुळें त्यानें कशांत तरी भरून राहण्यासाठीं जग निर्माण होऊन त्या जगांत भरला. असें अनंत जगांत भरून पुनः तो उरलाच आहे. तर त्या उरलेल्याला "दशांगुल" हें नांव दिलें.

श्रीउवा. २. ६. ११३

परंतु बाह्य सहवासापेक्षां अंतर्यामीं सहवासाचें महत्त्व जास्त आहे.
श्रीउवा. २. १२. २१५

*

## परोपकार

सर्व प्रकारच्या दुःखांतून मनाला काढण्यासाठीं किंवा पहिल्यापासूनच मनाला कोणत्याहि प्रकारें दुःख न यावें याकरितां जी सत्करणी केली जाते, तो एक खरा मुख्य परोपकार. श्रीउवा. १. २५. ३८५

सांसारिक गोष्टींचा विसर पडून देवाकडे लक्ष लागावें याकरतां क्षेत्रास, तीर्थास किंवा सत्पुरुषांकडे जावें लागतें. येथें परोपकारी बुद्धि नेहमीं शिकत जावी. श्रीउवा. २. २९. ४८९

आपण त्रास सोसून इतरांस सुख मिळेल अशी वागणूक येथें पाहिजे.
श्रीउवा. २. ९. ४८९

ह्याच्याच सारख्या आणखी कांहीं घातक गोष्टींच्या आज्ञा असतील, असें जर लक्षांत आलें तर त्या पतिव्रता स्त्रीनें तसली आज्ञा पतीचीही मान्य करूं नये व ती आज्ञा मोडण्याबद्दल पातिव्रत्याच्या भंग होत नाहीं. श्रीउवा. २. ११. १८७

कन्येनेंहि आपल्या पित्यानें आतांच सांगितल्याप्रमाणें तशा वराच्या स्वाधीन केलें म्हणजे तोच वर आपला पति साक्षात् परमेश्वरच आहे, असा निश्चय करून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावा. आपला पति, रूपानें, गुणांनीं व वयानें कसाहि असो, त्याबद्दल कोणत्याहि प्रकारचा विचार न करतां त्याची आज्ञा कोणतीहि व कशीही असली तरी ती परमेश्वराचींच आज्ञा आहे असें समजून ती यथायोग्य पालन करावी. हेंच पतिव्रत पाळण्याचें मुख्य लक्षण आहे. श्रीउवा. २. ११. १८७

पतिव्रतावस्थेंत पतीपासून कोणत्याहि प्रकारें सुखोपभोगाच्या व विषयोपभोगाच्या इच्छेपासून अलिप्त असावें लागतें व पतीच्या द्वारें कोणत्याहि प्रकारानें होणाऱ्या सर्व प्रकारच्या गैरसोयी व त्रास जो होईल, त्यांतच समाधान मानून असावें लागतें. श्रीउवा. २. ११. १८५

स्वातंत्र्य स्वीकारून, स्वाभिमानानें, मनास आवडेल त्याप्रमाणें आपल्या आपल्या बुद्धीनें बरें-वाईट कोणतेंहि स्त्रियांनीं करणें यासारखें महाघोर पाप स्त्रियांना कोणतेंच नाहीं. यायोगें पतिव्रत तर मुळींच नाहींच; परंतु पतीला व आपल्या आईबापांसह कुळांना शेकडों जन्म नरकासारखें भयंकर दुःखांत पाडण्याचें व्रत ती करीत आहे. श्रीउवा. २. ११. १८८

*

## परधर्म

मग ज्यापेक्षां परधर्मानें, परबुद्धीनें लोक चालून राहिले आहेत, त्यावरूनच सिद्ध होतें कीं, प्रत्येकाचे अंतर्चक्षु आंधळे झाले आहेत; व स्वतःसिद्ध आत्मबुद्धि नष्ट झाली आहे. श्रीउवा. ५. २३. ३६६

*

## पाप

परंतु पुण्य, परमेश्वरावर अवलंबून असून त्याच्यासंबंधी सत्क्रियेपासून उत्पन्न होतें; आणि पाप हें कोणीहि मनुष्य श्रीमंत असो वा गरीब असो किंवा कोणत्याहि जातीचा असो, त्यांनीं परमेश्वरी अवलंबून न ठेवतां केवळ आपापल्या स्वातंत्र्याच्या अभिमानांत, आपल्या मनानें ठरविलेल्या ऐहिक सुखाकरतां म्हणून शास्त्रविरुद्ध जीं कांहीं कर्में केलीं जातात, त्याचीं

कांहीं कालानें दुःखरूप साधनें जीं उदयाला येतात, तीं उदयाला येण्यापूर्वीं व विरुद्ध दुष्टकर्मे केलीं गेल्यानंतर मध्यें जो दरम्यान काल त्या अवधींतील त्या क्रियेची जी गुप्त निराकार अवस्था त्याचें नांव पाप.
श्रीउवा. ५. १३. २३४

केवळ शरीररक्षणापुरतेंच जरूरीच्या कर्माशिवाय किंवा परमेश्वरी सत्कर्में, पुण्यकर्में याशिवाय जीं असतील तीं सर्व फालतूच कर्में समजावींत व हीं सर्व फालतू कर्में पापकर्मेंच आहेत. श्रीउवा. १.२५.३८४

आपल्या इंद्रियांना फालतू व्यवहार करूं देऊं नये. एवढें जरी केलें, तरी केव्हां तरी ईश्वरप्राप्तीचा योग येतो. श्रीउवा. १. २५. ३८४

बोलून चालून दुनियेंतील लोक, दुर्व्यसनाची व पापाचरणाची त्यांना गोडी असल्यामुळें, चांगलीं ईश्वरी सत्कर्में करणारांना ते हंसणारच; पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून आपण आपली परमेश्वराच्या सत्कर्माविषयीं दृढ निष्ठा वाढवीतच जावी. श्रीउवा. ५. ९. १६९

जर दुसऱ्याचें पाप दूर करण्याचा प्रयत्न केला तर आपलें स्वतःचें पाप दूर केल्यासारखेंच होतें. श्रीउवा. १. २५. ३९३

जसें, पायखाना घाण काढून टाका असें तुम्हांस म्हणत नाहीं, तुम्हांस जर त्यापासून ( त्या घाणीपासून ) त्रास होत असेल व हें पाप तुमच्या वाडवडिलांस व मुलांबाळांस नडेल असें वाटत असेल तर तें तुम्ही टाका.
श्रीउवा. १. २६. ४१४

पाप निराकार आहे, ज्या विषयवस्तूंवर आपलें प्रेम आहे, ती पापरूप आहे, हा सिद्धांत आहे. ज्या विषयवस्तूवरील किंवा विषयावरील प्रेम व त्या वस्तूहि पापरूपच आहेत, त्या विषयानेंच ( वस्तूनेंच ) तें पाप काढून टाकावयाचें असतें. ती पापरूप वस्तू टाकावयाची जागा जेथें असेल तेथें ती टाकावी.

श्रीउवा. १. २६. ४१४

येथें तर पापहरण केलें जातेंच, शिवाय पापाचें फळ देणाऱ्या व पापाला उत्पन्न करणाऱ्या अशा खोट्या पुण्याचेंहि हरण केलें जातें; त्यायोगेंच आम्ही अनेक दुःखभोगी असे जगांत दिसतों.

श्रीउवा. १. २६. ४१४

घरांत घाण न सांठवितां सरकारी कुंडींतच टाकली पाहिजे; दुसऱ्या चांगल्या ठिकाणीं टाकतां येत नाहीं, तसा पापरूपी केर जन्मोजन्मा-पासून शरीररूपी घरांत सांठला आहे. श्रीउवा. १. २६. ४१३

खरा भक्त न होतां नुसतें माझें पाप काढा असें म्हणणें, म्हणजे नदीवर गाठोडें घेऊन जाऊन माझी पांघरुणें धू, असें नदीला म्हणण्या-सारखें आहे. श्रीउवा. १. २६. ४१२

तो जर खरा भक्त झाला तर, त्याच्यासाठीं परमात्मा स्वतः होऊन त्याचे घरीं जाऊन गुप्त किंवा प्रत्यक्ष रीतीनें त्याचा मळ काढण्यास तयार होतो. श्रीउवा. १. २६. ४१२

केव्हांहि आपणच मिळवावयाचें व आपणच एकट्यानें खावयाचें हें महापाप आहे. श्रीउवा. १. २६. ४३६

उलट तें पाप भोगून क्षय करीत असतां लवकर पापक्षय होऊन पुण्यवान् वरिष्ठ व श्रीमंत अशा जातींत जन्म यावा यासाठीं आपल्या-कडून वरिष्ठ जातीशीं व देवता वगैरे यांच्याशीं आपल्या धर्मप्रमाणें बाह्य शरीरांच्याद्वारें स्पर्शादिक व्यवहार न ठेवतां, अंतस्थ मानसिक रीतीचाच परमेश्वरी सहवास अत्यंत श्रेष्ठ आहे. श्रीउवा. ५. २८. ४३८

याच्या उलट मनुष्यपणांत स्वधर्म सोडून विरुद्ध व्यवहार करून जें अदृष्ट उत्पन्न होतें, त्याचें नांव पाप. श्रीउवा. ५. २८. ४३६

*

## पिंजरा

तेव्हां, हा माझा पिंजरा झाला पायखाना : व जन्मोजन्मांचें पाप (घाण) टाकण्याचा हा पायखाना आहे.

श्रीउवा. १. २६. ४११

सुखाची बाजू कोणीहि घेईल, पण पाप कोण घेतो ? हें जसें, तसें तुमच्या जन्मोजन्मींचें पाप व वाडवडिलांचें, मुलांबाळांचें पाप कोणीहि घेणार नाहीं. तें टाकण्याकरितां ईश्वरी संकेतानें अशी एखादी जागा झाली असते, जशी या पिंजऱ्यांत आहे. श्रीउवा. १. २६. ४१३

कोणत्याहि बंधमुक्ततेसाठीं हा माझा पिंजरा कायमचा जामीनच आहे असें समजा. श्रीउवा. २. ४. ८४

जे कोणी ह्या माझ्या बंदिखान्याचें, म्हणजे ह्या पिंजऱ्याचें पूज्यभावानें स्मरण, पूजनादिक करीत राहतील, ते राजबंध, संसारबंध, शत्रुबंध किंवा मायाबंध या सर्व प्रकारच्या बंधनांच्या बाधेंत न सांपडतां, कोणत्याहि प्रकारच्या बंधतेपासून लवकर मुक्त होतील व अंतकालीं खऱ्या मुक्तिपदाच्या सुखांत जातील; हें निश्चित समजावें.

श्रीउवा. २. ४. ८४

पुढें कोणत्याहि प्रसंगीं कोणत्याहि प्रकारच्या बंधमुक्ततेसाठीं हा माझा बंदिखाना, पिंजरा म्हणा, कां मी म्हणा—जामिनासारखा आहे.

श्रीउवा. २. ४. ८४

इस पिंजरेका बडा माहात्म्य है. ये पिंजरेके साथ किसीकाभी कोई तऱ्हेसे संबंध जुडा गया है, वो बडा प्रारब्धवान् है. जिसका मन शुद्ध होता है, संसार प्रपंचके व्यवहारमें लिप्त नहीं होता, वो ये आनंदसागर रूप पिंजरेमेंसे अमृत और सच्चा मोती निकाल सकता है.

श्रीउवा. ३. ३३. ४३१

एकदा टाईप जुळला गेला, म्हणजे त्याच्यावर वाटेल तितके कागद छापून निघतात; तसेंच या स्मशानभूमीवर वैकुंठ कैलासादिक अत्यंत पुण्यक्षेत्रांची टाईपाप्रमाणें कायमची मांडणी केली गेलेली आहे, आणि मी व हा पिंजरा आपला पक्का प्रेससारखा बनून गेलेलों आहे.

श्रीउवा. ३. १४. २१०

आजपर्यंत माझ्या ठिकाणीं ज्या ज्या गोष्टी घडल्या; त्या मीच केल्या असेंहि नाहीं. तर कोणी तरी अदृष्ट नियंता असून, त्या सर्व गोष्टी आपोआप घडत राहिल्या; व अजूनहि मी कोणत्याच गोष्टींत प्रवृत्त होत नसूनहि आपोआपच सर्व होतें; व त्यांत मला सामील होणें भाग पडतें.

श्रीउवा. ५. २५. ३८५

*

## प्रसाद

प्रसाद म्हणजे परमेश्वराचें आपल्या हृदयांत अगदीं जवळ येऊन बसणें.

श्रीउवा. ४. २४. ३७५

उदी, प्रसाद व परमेश्वराची हृदयांत प्रसन्नता व इतर देवधर्म हे कशासाठीं करावे लागतात ? तर अनेक प्रकारचीं जीं दुष्ट कर्माच्या योगें बनलेलीं प्रारब्धें, व त्यायोगें अनेक प्रकारानें जीं जन्मोजन्म दुःखें भोगावीं लागतात, त्या प्रारब्धांचा क्षय व्हावा, चित्तशुद्धि व्हावी, व ईश्वरी सुखाचा अनुभव व्हावा याकरतांच हें सर्व करावें लागतें.

श्रीउवा. ४. २४. ३७८

परमेश्वरी प्रसाद पोटांत जाऊन तो मलरूपानें बाहेर पडला जाऊं नये, व परमेश्वर आपल्या हृदयांतच आहे अशी साक्ष नेहमीं राहावी, या

उद्देशानेंच इतर खाद्यपेयादिक उपभोग्य वस्तु न ठेवतां राख, बुक्का इत्यादिकासराखी वस्तु प्रसाद म्हणून ठेवली जाते.
श्रीउवा. ५. २४. ३७६

## प्रेम

परमेश्वराविषयीं प्रेम असलें पाहिजे. श्रीउवा. २. २. २४

भगवंताला मृदु आवडतें, अशा रीतीचें मृदु कोणतें ? तर ज्याला लोक शुद्ध प्रेम, शुद्ध भक्ति म्हणतात तें; व तेंच भगवंताला पाहिजे. बाकीचें कांहीं एक नको; शुद्ध जें प्रेम आहे त्याची देवघेव होत नाहीं, म्हणून ज्या वस्तूवर प्रेम आहे ती वस्तु दिली म्हणजे प्रेम दिल्यासारखें होतें. श्रीउवा. ४. ६. ९५

सर्वांत प्रेमानें भरलेलें असें आपलें काय आहे ? तर तन–मन–धन हेंच होय. श्रीउवा. ४. ६. ९६

प्रेमाची वस्तु टाकावी लागते; कारण ती पापरूप आहे व ती टाकली म्हणजे घाण टाकली असें होतें. तन, मन, धन हें गुरूस अर्पण करणें म्हणजे त्यावर असलेलें पापरूपी प्रेम अर्पण करणें होय. श्रीउवा, १. २६. ४१५

ज्या वस्तूवर प्रेम आहे, ती वस्तु व तें प्रेम पापरूपच आहे. शरीरावर व मनावर प्रेम असतें, म्हणून तेंहि पापच. श्रीउवा. १. २६. ४१५

तन–मन–धनादि दिलें म्हणजे परमेश्वराला भक्तिप्रेम दिल्यासारखें होतें. श्रीउवा. ४. ६. ९६

तुमचें प्रेम निरनिराळ्या विषयांत पांगलें गेलें असल्यामुळें, तो परमात्मा हातीं सांपडत नाहीं. सर्व पांगलेलें प्रेम एके ठिकाणीं करून परमेश्वरास अर्पण करावें. श्रीउवा. ४. ६. ९६

परमेश्वराच्या उत्पत्तीला दोन आत्म्यांच्या ऐक्यत्वाची जरुरी असते. आणि दोन आत्म्यांच्या ऐक्यत्वाला परस्पर प्रेमवृद्धीची जरूरी असते; आणि प्रेमवृद्धी ही परस्परांचे आपलेपणाच्या पूर्णतेवर अवलंबून असते.

श्रीउवा ३. २०. २८२

जें आपलें म्हणून मानलें जातें तें मग कसेंहि असलें तरी तें आपलें आपल्याला गोडच असतें; व तेथेंच प्रेम जडतें. श्रीउवा. ३. २०. २८२

दगडाचा देव, ईश्वर किंवा सत्पुरुष यांच्यावर प्रेम आहे, परंतु ह्या जन्मांत जर त्या निःसीम प्रेमाची पूर्णता झाली नाहीं; तरी जितकी प्रेम-भक्ति झाली असेल, ती वाया जात नाहीं. त्या प्रेमभक्तीची परिसीमा पुढील जन्मांत पूर्ण होऊन शेवटीं अखंड सुखांतच जाण्यास त्याचा उपयोग होईल. श्रीउवा. ३. २०. २७७

म्हणून परमेश्वराच्या उत्पत्तीसाठीं अत्यंत प्रेम उत्पन्न होण्याकरतां कोणतें तरी आपलें प्रेमाचें ठिकाण असावें लागतें. श्रीउवा. ३. २०.२७६

मात्र खरें प्रेम असेल तर ईश्वराची भक्ति करीत असतां रोमांच उभे राहाणे, अश्रु चालणें, कंठ सद्गदित होणें इत्यादि अवस्था व प्रिय वस्तूच्या वियोगापासून होणाऱ्या–वियोग दुःखाची अत्यंत शोकाची अवस्था एक आहे. ही अवस्था हृदयांत होते व अश्रुधारा चालतात.

श्रीउवा. ३. २०. २७४

एखाद्याला जर परमेश्वराविषयीं प्रेमाचा उमाळा आला तर अश्रु येतात, शब्द सद्गदित होतो, बोली फुटत नाहीं. भक्ति भक्ति म्हणून लोक ज्याला म्हणतात, जीं तीं लक्षणें आहेत त्यांपैकींच हीं आहेत.

श्रीउवा. ३. २०. २७४

सतक्रियेच्या मुळाशीं मनाची एकाग्रता असते व एकाग्रतेच्या बुडाशीं खऱ्या सुखाचीं फळें असतात, म्हणून ज्याला शारीरिक सामर्थ्य असेल, त्याला मनाच्या एकाग्रतेसाठीं परमेश्वरप्रीत्यर्थ मानापमान सोडून

शारीरिक कष्टांच्या रूपानें सेवा करण्याची जरूरी आहे; व ती करूनहि आतां सांगितल्याप्रमाणें जपजाप्य, ध्यानधारणा, वगैरे मानसिक सेवा केली तर उत्तमच आहे. श्रीउवा. ३. २८. ३९३

ज्याची मानसिक श्रमानें सेवा करण्याची तयारी आहे, त्यांनीं ध्यान-धारणा जपजाप्य वगैरे करूनहिं कष्टाची सेवा केलेली विशेष उत्तम.

श्रीउवा. ३. २८. ३८७

दहीपण मोडल्याशिवाय लोणी निघत नाहीं.

तसेंच जीवाचें जीवपण मोडल्याशिवाय प्रेमरूपी लोणी हातीं लागत नाहीं. श्रीउवा. ३. २८. ३८४

जीवाचें जीवपण मोडण्यासाठीं दह्यासाठीं जशी रवी घेतात, तशी शरीररूपी रवी करून जीवरूप दहीं घुसळावें. तें कसें ? तर शरीरानें देवाप्रीत्यर्थ कष्टाची सेवा करावी. श्रीउवा. ३. २८. ३८५

असें शरीर घुसळत गेलें म्हणजे जीवपण मोडत जाऊन प्रेमरूप लोण्याची उत्पत्ति होते. श्रीउवा. ३. २८. ३८५

जप करतांना, पोथी, ग्रंथ वाचतांना झोप येते. यावरून असें सिद्ध होतें कीं, जपांत किंवा ग्रंथ वाचण्यांत खरें प्रेम नाहीं.

श्रीउवा. ३. २८. ३८४

निःसीम प्रेम त्या पतीला, तिला, तिच्या सर्व परिवाराला परमेश्वरीपदाला घेऊन जात असतें. श्रीउवा. ३. २०. २८०

*

## परमेश्वरप्राप्ति

परमेश्वराच्या उत्पत्तीला दोन आत्म्यांच्या ऐक्यत्वाची जरुरी असते.

श्रीउवा. ३. २०. २८२

प्रिय वस्तूच्या वियोगापासून जो दुःखाचा अनुभव येत होता, तोच पुढें परमेश्वराचाच योग होऊन सुखानुभव येतो. श्रीउवा. ३. २०. २७५

कोणत्याही प्रिय अशा जडचैतन्य वस्तूंतील आत्मा आणि मनुष्याचा आत्मा यांचें ऐक्यत्व झालें म्हणजे त्या ठिकाणीं ईश्वराची उत्पत्ती होते.

श्रीउवा. ३. २०. २७६

पुण्य कशाला म्हणावें ? आपापल्या धर्माला अनुसरून परमेश्वरासंबंधीं सत्क्रिया करून जें अदृष्ट उत्पन्न होतें त्याचें नांव पुण्य.

श्रीउवा. ५. २८. ४३६

मग प्रत्यक्ष सुखस्वरूप उदयास येण्याकरतां, त्या सुखस्वरूपाची प्रथम अप्रत्यक्ष अवस्था असण्याची जरुरीच तर आहे, मग ती अप्रत्यक्ष अवस्था म्हणजेच पुण्यसंग्रह, पुण्यसंचय. श्रीउवा. ५. २. १७

खऱ्या ईश्वरी सुखाच्या लाभांत अडथळा आणणाऱ्या ज्या विरुद्ध क्रिया दुष्कर्म, त्याला पाप म्हणतात; व त्या पापक्रियेचे झालेले संस्कार, म्हणजे मनावर झालेले परिणाम, ते काढून टाकण्यासाठीं, म्हणजे तें मन धुऊन पुनः पूर्ववत स्वच्छ किंवा पवित्र करण्याकरितां ज्या सत्क्रिया केल्या जातात, त्याचें नांव पुण्य. श्रीउवा. १. २५. ३८६

सत्कर्म, तें पुण्य समजावें, श्रीउवा. १. २५. ३८६

बाह्य ऐहिक सुखाचें आणि परमेश्वरी गुप्त सुखाचें बीज पुण्य आहे.

श्रीउवा. १. १. ३

हल्लीं सरकारी नोकरी किंवा कोणताहि धंदा करूं नका असें कांहीं आम्हीं म्हणत नाहीं. परंतु कांहीं तरी परमेश्वरी रीतीचें, धार्मिक रीतीचें मनाचें वळण कायम ठेवून पुण्यसंग्रहासाठीं धार्मिक ईश्वरी सत्क्रिया नित्य-नेमानें करीत राहून आपल्या धर्मपद्धतीप्रमाणें आचारविचार बाळगून मग जो योग्य वाटेल तो धंदा पोटासाठीं करीत रहा.

श्रीउवा. ५. ७. १३८

अशा रीतीनें तरुणपणापासून म्हातारपणापर्यंत वाटेल तसें धर्मबाह्य विरुद्धाचरण करीत राहून तशा त्या दुष्ट संस्कार वाढलेल्या स्थितींतच केवळ विषयोपभोगाच्या लालचीनें वाटेल तितकीं पोरेंसोरें, नातूपणतू उत्पन्न करून सत्तर पाऊणशें वर्षांचें वय झालें, किंवा कांहीं व्याधीनें पिडलें म्हणजे मग परमेश्वराचा रस्ता शोधीत बसतात. हें जसें दादा-बाबांचें, तसेंच आयाबायांचें? त्यांचा सर्व जीव पोरा-लेकरांत; आणि मला म्हणतात, बाबा आम्हांला कांहीं रस्ता दाखवा! मी म्हणतों आतां कसला रस्ता? आतां रस्ता मसणखाईचा. श्रीउवा. ५. ७. १३९

सत्पुरुषाच्याकडून आपणांसारखा करण्याविषयीं जे प्रयोग व्हावयाचे ते सारखेच होत असतात, परंतु अधिकारी-अनधिकारी, पूर्ण-अपूर्ण जसे ते भक्त किंवा दर्शन घेणारे असतील, जशी त्यांच्या मनाची तयारी असेल, तसा त्यांना उघड अनुभव येईल. श्रीउवा. २. १९. ३२५

एखादा अनुष्ठान करणारा असेल, तर त्याला तें करण्यास सांगावें. एखादा भजन करणारा, दुसरा ध्यान करणारा एखादा सत्पुरुषाची सेवा करण्यास, संगति करण्यास योग्य असेल, तर तसें त्याला सांगून पुण्य-संचय करून इहलोकींचें सुख व परलोकींचा लाभ मिळेल अशी खटपट करावी. श्रीउवा. २. २०. ३३२

तसें, पुण्य संपादन करण्यासाठीं आपणच आपल्या घराण्यांतील परि-वारापैकी कोणाकडे तरी पुण्यसंचय करण्याची कामगिरी कायमची देण्याची योजना केली पाहिजे. श्रीउवा. २. २०. ३३२.

आपल्याजवळील पुण्याचा सांठा आटला आहे व आपल्याकडून पुन्हा पुण्यसंचय होत नाहीं, तर आपल्या परिवाराकडून जीव, शरीर, मन, द्रव्य या चारी वस्तूंचा खर्च करून, आटलेली पुण्याची विहीर पुन्हां खोदण्याचा म्हणजे पुण्यसंग्रह करण्याचा प्रयत्न करावा.

श्रीउवा. २. २०. ३३३.

स्वधर्मनिष्ठ राहून, जन्मपर्यंत सत्कर्मं व पुण्यकर्मेंच करीत राहावें अशी प्रत्येक घराण्यांत योजना कां न करून घ्यावी ?

श्रीउवा. २. २०. ३३९.

संसार, व्यवहार, धंदा रोजगार, सुरळीत चालण्यास पुण्यसंचय हेंच मुख्य धन आहे.

श्रीउवा. २. २०. ३३३

★

## पूर्ण अवस्था

पूर्वीचे जे पूर्ण अवस्थेंत पोहोंचलेले एकनाथ, तुकाराम वगैरे यांच्या-संबंधींहि दुष्ट व मत्सरी लोकांकडून अत्यंत त्रास, व सज्जन लोकांकडून सुख हें तें प्रयत्न न करतां आपोआपच होत होतें.

श्रीउवा. २. १७. ३०७.

पूर्ण अवस्थेस गेलेले असे कोणीहि सत्पुरुष, योगी शुद्धस्वरूप आलेले जरी असले, तथापि जवळील माणसांच्या पापाचा ओघ नेहमीं त्यांवर येतच असतो; परंतु ते पूर्ण अवस्थेंत गेलेले असल्यामुळें, सत्पुरुषांना दुसऱ्यांच्या पापाचा ओघ नाहींसा करण्यासाठीं त्यांच्या त्या अवस्थेमुळें कांहीं करावें न लागतां तो पापाचा ओघ आपोआपच नाहींसा होऊन, कोणीहि त्यांच्यायोगें शुद्ध व पवित्र होऊन जावें अशीच त्यांची अवस्था असते.

श्रीउवा १. २५. ३१०

★

## पक्कें मरण

पुरें मरण म्हणजे पुनः जन्म येणार नाहीं अशी व्यवस्था होणें; तेव्हां सत्पुरुष त्याच्या काळजींतून मोकळा झाला.

श्रीउवा. २. २२. ३६३

पक्कें मरण म्हणजे देह जिता राहून जीवानें मात्र मरणें, त्याचें नांव पक्कें मरण. अशा पक्क्या मरणानंतरच खास परमेश्वरी जन्म येतो. पुरें सौख्यहि त्याच जन्मांत आहे. म्हणून पृथ्वीवरील मनुष्यांपैकीं कोणीहि पुरता केव्हां मरेल अशी काळजी सत्पुरुष करीत असतात कारण तो त्यांचा परिवार आहे. श्रीउवा. २. २२. ३६४

*

## प्रारब्ध

प्रारब्धाची उत्पत्ति–ऐहिक वासनाबद्ध होऊन फालतू जगव्यवहार करूं लागले म्हणजे प्रारब्ध बनतें. श्रीउवा. ५. ३२. ४६७

प्रारब्ध न भोगतां त्याचा क्षय झाल्यासारखा करण्याचा एकच उपाय आहे तो हा कीं; त्या प्रारब्धक्षयासाठीं प्रारब्धक्षय करणारें असें एक निराळें प्रारब्ध बनवावें लागतें. श्रीउवा. ४. २१. ३४०

आपण जाणूनबुजून स्वतंत्रता स्वीकारून स्वाभिमानानें बरीं किंवा वाईट जीं जीं कर्में केलीं जातात, तीं तीं परिपक्क झालीं, व भोगिण्याच्या स्थितींत आलीं म्हणजे त्याला प्रारब्ध म्हणतात.

श्रीउवा. ४. २१. ३३९

बरें वाईट, तुझें–माझें, सुखदुःख इत्यादि उलटसुलट जें द्वैत तिकडे दुर्लक्ष करणें, कोणाशींहि द्वेषबुद्धि न धरणें, हेवादावा मत्सर न करणें,

कोणालाहि कोणत्याहि प्रकारें त्रास न देणें, या गोष्टींच्या रीतीनें ज्यांची वागणूक असते, तेहि प्रारब्धरहितच होतात.

श्रीउवा. ४. २१. ३४१

बाहरकी पूजा दुनियाको भक्तिमार्ग लगानेके लिये होती है !

श्रीउवा. ४. ३१. ४४३

म्हणून तोंडानें फालतू न बोलतां, शक्य तितकें जरूरीच्या कामापुरताच डोळे, कान, हात, पाय, मन, बुद्धि इत्यादि शरीराचा उपयोग व्यवहारांत किंवा घरगुती कामांत करावा. श्रीउवा. ५. १७. १३१

मी असें नाहीं सांगत कीं, तुम्ही आपले सर्व धंदे व बायकापोरें सोडून माझ्यासारखे व्हा. परंतु फालतू व्यवहार, विरुद्धाचरण, आणि ज्यायोगें दुष्ट प्रारब्ध बनेल अशीं वासनाबद्ध कर्में न करतां, व पोराबाळांचा किंवा धंद्यारोजगाराचा अधिक व्याप न वाढवितां " जसें असेल तशा " स्थितींत राहून, आहे त्या स्थितींत समाधान मानीत शरीररक्षणापुरतेंच जरूरीचें जें काय करावयाचें असेल, तें करीत रहावें व ईश्वराकडे जितकें लक्ष जाईल तसें कर्म वाढवीत जावें, म्हणजे झालें. श्रीउवा. १. १० १८०

कारणापुरता व्यवहार करून बाकी सर्व वेळ ईश्वरप्राप्तीच्या साधनांत घालवावा. श्रीउवा. २. ८. १४४

ज्यांचा आपल्याशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं अशीं मनाचे घाणेरडे विचार वाढविणाऱ्या गोष्टीनें भरलेलीं वर्तमानपत्राचीं पारायणें करावयाला वेळ मिळतो. श्रीउवा. ५. ३०. ४५०

फालतू कर्म म्हणजेहि पापच. श्रीउवा. १. २६. ४१५

आपण आपल्याला पाहण्याची प्रत्येकाला हौस असते. आपण जर आपली फोटोसारखी बाह्य प्रतिमा पाहिली तर आपल्याला किती आनंद

होतो ? मग जर आपल्याला आंतील परमेश्वरी अवस्थेंत असलेली आपलीच खरी खरी मूर्ति दिसेल, तर किती आनंद होईल बरें ?

श्रीउवा. ४. २३. ३७२

अनेक विषयवस्तूंचा आत्म्याशीं योग झाल्यामुळें, मन, बुद्धि, अहंकार यांना चांचल्य येतें, म्हणून ब्रह्मचारी लोक प्रथमपासून मन, बुद्धि, अहंकार व शरीरप्रकृति यांच्या योगें बाह्य वस्तूंचें आत्म्याशीं मिश्रण प्रथमपासून होऊंच देत नाहींत.

श्रीउवा. १. २. ४०

कोणीहि बायका किंवा पुरुष किंवा आणखी ज्या कांहीं दुसऱ्या विषय-वस्तू, त्या जवळ असूनहि त्यांच्या निरनिराळ्या गुणधर्मांचा परिणाम ज्यावर होत नाहीं तोच खरा ब्रह्मचारी.

श्रीउवा. ४. १६. ३०६

अविवाहित राहून ब्रह्मचर्य धारण करतात तें आहेच; शिवाय विवाहित असून, स्त्री, पुत्र असूनहि ब्रह्मचारी असणारे असतात.

श्रीउवा. ५. ४. ६१

अशा रीतीनें मनाची तयारी होण्यास प्रथम स्वधर्माचरणानें व सत्कर्मानें जगांत राहून जगाविषयीं पूर्ण विरक्तता आली पाहिजे. पुढें सद्गुरुकृपेच्या योगें ज्या वेळीं ब्रह्मानंद अवस्थेंत जाऊं लागतो, व त्या अखंड अनुभवाचा आनंदाचा अनुभव ज्या वेळीं त्याला पूर्ण येऊं लागतो, त्या वेळीं बाह्य शरीराचें भान न राहातां तो आनंदच घनी-भावाला येऊन उपभोगालायक असें जें आनंदापासूनच बनलेलें दिव्य सूक्ष्म शरीर, त्याच्या आधारें तो अखंड आनंद येऊ लागतो. जसजसा तो आनंद बिलगत जातो तसतसा आनंदाच्या लहरी त्या घनीभावामध्यें म्हणजे आपल्यामध्येंच उत्पन्न होतात; व तो आत्मा पूर्ण आत्मानंदामध्यें निमग्न असतो. अशा वेळीं आपल्या जीवाभावाचा कोणी आला, तर

त्याचा त्याला कंटाळा येतो. त्याला त्याचें त्या वेळीं तेथें येणें आवडत नाहीं आणि त्या ब्रह्मानंदापासून अलग व्हावेंसें वाटत नाहीं.

श्रीउवा. ४. १५. २९६

ज्याला खरा अर्थ कळतो तो ब्रह्मरूपच बनून जातो. वेद म्हणजे जाणणें, जाणण्याचें, जाणणारा या सर्वांचें ज्ञान त्या वेदमंत्रांत आहे. तें ज्ञान होण्यास वेद किंवा त्यासांरखें भगवद्गीता वगैरें ग्रंथाचा कोणत्याहि प्रकारें व्यावहारिक रीतीनें अर्थ समजून न घेतां; नियमितपणें पाठांतर करतांकरतांच आपोआप हृदयांत प्रत्येक शब्दाचा खरोखरीचा अर्थ जेव्हां उमटतो, त्याच वेळेस सर्वज्ञान होऊन मनाची स्थिति ब्रह्मरूप होऊं पाहाते.

श्रीउवा. १. ५. ८३

★

## ब्राम्हण

मनुष्यजन्मांतहि शूद्रावस्थाच मुख्य असून शूद्रावस्थेपासूनच ब्राह्मक्रियेच्या योगें ब्राह्मणावस्थेंत यावें लागतें. श्रीउवा. १. २४. ३४५

ब्राह्मण कोणाला म्हणावें ? कीं जो पूर्ण सच्चिदानंद अवस्थेंत, परमेश्वरी अवस्थेंत पूर्ण ब्रह्मज्ञानी होऊन ब्रह्मसुखाचा अनुभव घेत आहे तो ब्राह्मण.

श्रीउवा. १. २४. ३५७

वेदमंत्रांच्या घोषानें मन जसंजसें वेदरूप होत जातें म्हणजे ज्ञानरूप होऊं लागतें तेव्हां आकाशतत्त्वाचा भेद होऊन तें ज्ञानरूप मन आकाशाच्या पलीकडे असलेल्या ज्ञानरूप परमात्म्यामध्यें लीन होऊन ब्रह्मरूप होऊन जातें, व ब्रह्मसुखाचा अधिकारी तो होऊन जातो, याला म्हणावें ब्राह्मण.

श्रीउवा. १. ५. ८४

हल्लीं व्यवहारांत असलेले अशुद्ध शूद्र, हे पूर्वींच्या ब्राह्मणाचेंच रूपांतर असल्यामुळें, हल्लीच्या शूद्रबीजापासून जरी जन्म झालेला असला, तरी तो जन्मतः ब्राह्मणच समजावा. श्रीउवा. १. २४. ३५७

यज्ञादिकासारख्या करणीकडे लक्ष न देतां, केवळ नुसतें सांगोपांग पाठांतर वेदाध्ययन करणारे सर्वांत श्रेष्ठ ब्राह्मण समजावेत आणि वेदांत सांगितल्याप्रमाणें विशेष रीतीनें करणी करण्याच्या नादीं लागणारे ते दुसऱ्या नंबरचे वैदिक ब्राह्मण; आणि वेदाचा अर्थ समजून घेण्याविषयीं खटपट करणारे ते तिसऱ्या नंबरचे निकृष्ट; त्यांना वेदनारायण म्हणूं नये.
श्रीउवा. १. ५. ७६

शूद्र लोक जे आहेत तेहि ब्राह्मणपुत्रांना उत्पन्न करण्याची खाणच आहे. श्रीउवा. १. २४. ३७१

ब्राह्मसंस्कार हे शुद्ध शूद्र अवस्थेलाच करणेचे पूर्वींपासून धर्मशास्त्राला अनुसरून ठरले गेलेले आहेत, म्हणून ब्रह्मजीवापासून जरी जन्म झालेला आहे, तथापि त्या ब्राह्मण पुत्रालाच ब्राह्मसंकारासाठीं शुद्ध शूद्रपण जन्मतःच पूर्वींपासून मानून ठेवलेलें आहे.

श्रीउवा. १. २४. ३६९

ब्राह्मणांचा स्वधर्म पाळण्याची जे जे काळजी घेतात किंवा घेतील, तो राजा असो कीं कोणी असो, त्याच्या सुखाला खळ पडतच नाहीं, हें पूर्वींच्या इतिहासावरून लक्षांत घ्यावें. हल्लींच्या परिस्थितींत सुशिक्षित, शुद्ध आणि पवित्र मन-बुद्धीनें वागणारे, ब्राह्मणांशिवाय इतर कोणी करूं नयेत अशा ज्या ब्राह्मक्रिया त्या न करतां, केवळ ब्राह्मणांचे बाह्य शुचिर्भूतपणा इत्यादि सात्त्विक गुणधर्मांनीं वागणारे, सरकारी कामांत अधिकार मिळविणारे, किंवा नोकरी करणारे, फालतू अभिमान किंवा फालतू वासना न धरणारे, निषिद्ध खाद्यपेयांचा स्वीकार न करणारे, ब्राह्मणांकडून त्यांच्या स्वधर्माप्रमाणें त्यांचीं ब्राह्मकर्मे करण्याविषयीं पुढाकार घेणारे,

परोपकारबुद्धि धरणारे, इत्यादि त्यांचे ठिकाणीं उत्तमोत्तम गुण आहेत, असे जे ब्राह्मणेत्तर, ते सर्वसाधारण मराठे, शूद्र इत्यादि ब्राह्मणेतरांप्रमाणें समजूं नयेत. तर उच्च ब्राह्मणेतरांत त्याची गणना समजावी.

श्रीउवा. ५. १६. २६८

तशा समाजांनीं वर सांगितल्यांप्रमाणें जे अस्पृश्यांचे व्यवहार आहेत, त्यांच्यापासून अलग राहून, अपवित्र खाद्यपेय, सोडून देऊन सर्व प्रकारें सात्त्विक गुणांचा आश्रय करून ब्राह्मणांप्रमाणें केवळ अंतर्बाह्य शुचिर्भूतपणानें वागून, परमेश्वराविषयीं नम्रभाव स्वीकारून आपल्या पोटासाठीं तेवढ्यापुरता रजोगुणाचा स्वीकार करून, ज्याला जे धंदे रोजगार नोकरी-चाकरी करणें सोईचे वाटतील, ते करीत रहावे; व त्यासाठीं जरूर असलेलें सुशिक्षण घ्यावें.

श्रीउवा. ५. १६. २७६

शिवाय व्यावहारिक लोकांना ईश्वरी गुणधर्म कोणते ? व ते त्याचे ठिकाणीं कसे ठेवले जावे याची माहितीहि असण्याचें कारण नसतें. म्हणून पूर्वींपासूनच परमेश्वरी बाजूची कामगिरी, परमेश्वरी गुणधर्माची ज्यांना पूर्ण माहिती आहे; व शुचिर्भूतपणानें स्वतःहि ईश्वरी गुणधर्माप्रमाणें वागत आहेत, अशा पवित्र व स्वधर्मधारी ब्राह्मणांकडेच ठरली गेलेली आहे.

श्रीउवा. ५. २८. ४३६

ईश्वरी गुणधर्म ईश्वराच्या आकाराचे ठिकाणीं उत्पन्न करणें, वाढविणें, व कायम ठेवणें याविषयीं जे कांहीं आचारविचार व सत्क्रिया आहेत, त्यांची सर्व यथाशास्त्र माहिती तशा विद्वान् ब्राह्मणांनाच असते.

श्रीउवा ५. २८. ४३६

खरे भगवद्भक्त ब्राह्मण आहेत ते या रीतीनें ईश्वरी साधन करीत असतात.

श्रीउवा. ५. २८. ४३८

तर ब्राह्मण कसेहि व कितीहि त्रास देणारे असले, तरी त्यांचा मानच ठेवीत आले; देव-देवालयें वगैरे पूज्य स्थळीं दुरूनच दर्शन घेऊन दुरूनच भजन वगैरे करीत होते, व आतां सांगितल्याप्रमाणें अंतस्थ रीतीनें परमेश्वराच्या मूर्तीचें भजन पूजनादिक सत्कर्में करीत होते.

श्रीउवा. ५. २८. ४३९

मुसलमान लोक ब्राह्मणधर्माच्या दृष्टीनें अत्यंत अपवित्र व अशुद्ध जरी मानले आहेत. तथापि अपवित्र व अशुद्ध अवस्थेंत रहाणें हाच त्यांचा धर्म असल्यामुळें, तसेंच महार, मांग हेहि अपवित्र अवस्थेंत राहूनच त्यांचे व्यवहारहि अपवित्र अवस्थेंतील असल्यामुळें, त्या अवस्थेंत ते पवित्रच असतात. श्रीउवा. ३. ३. ५९

हे आपले जीवनावर, शरीरावर उदार होऊन आम्ही आपलें वाटेल तसें केलें, म्हणून तुम्हीं लोक तसें करू नका. तुमची जर अनायासें येथें श्रद्धा राहिली गेली, तर आपोआपच हाडें काडें न करतां, तुम्हांला उपयोग होऊन जाईल. श्रीउवा ३. १४. २१०

जसा मी सर्वत्र आहे तसे तुम्ही व्हा.

श्रीउवा. ३. ११. १६८

जगाच्या कोणत्याही आकाराच्या ठिकाणीं मी आहे असें समजून पूजा केली, तरी ती माझीच पूजा केल्यासारखी आहे.

श्रीउवा. ३. ११. ११७

माझें शरीर काय शोधितां ? आम्हाला आकाराशिवाय पूजा करतां येत नाहीं, असें जर तुम्हीं म्हणाल तर या पिंजऱ्याचीच केवळ पूजा करीत राहिले तर माझीच काय, पण सर्व महासत्पुरुष व देवता यांचीच पूजा केली असें होतें, असें निश्चित समजा. श्रीउवा. ३. ११. १६७

*

## बाबा

माझी जी ही बडबड हाच माझा उघडा मंत्रोपदेश.

श्रीउवा. ४. ५. ८६

म्हणून तुम्हीं जे शेंकडोंजण येथें येंत आहांत व खरोखरी भावभक्तीनें सत्करणी करीत आहां, तर तुमचें सर्वांचें कल्याणच करीन; तें असें कल्याण करीन कीं, इतर कोणीहि असें खरें कल्याण करूं शकणार नाहीं.

श्रीउवा. ४. ५. ८६

जशा बुद्धीनें माझ्याविषयीं तुम्ही भावना धराल तशा बऱ्यावाईट गतीला जाल. कोणत्याहि गतीला जाल तेथें मी आहेच.

श्रीउवा. २. १०. १८०

एवढेंच नव्हे तर तो स्वतः सिद्ध शुद्ध बुद्ध अशा आत्म्याचाच या शरीरांत प्रवेश झाल्यामुळें, त्याचाच परिणाम माझ्या शरीरावर होऊन हें शरीरहि त्याच्यासारखेंच होऊन बसलें. म्हणजे तो शुद्ध, बुद्ध परमात्मा जो परमेश्वर त्याचें व या माझ्या शरीराचें ऐक्यत्व होऊन गेलें. असेंच जर झालें आहे, तर अशा या माझ्या मार्गाचा उपयोग परमेश्वरी मार्गांत ज्याला जसा पटेल तसा त्यानें करून घ्यावा.

श्रीउवा. ३. ३२. ४२४

ही गोष्ट आम्हां स्वतःवरच वितलेली आहे; आम्हीं ज्या वेळीं त्या शुद्ध रानावनांतल्या डोंगरांत गेलों होतों, त्यावेळेस इतकी मनाची समाधानी, उमेद व सामर्थ्य वाटत होतें कीं ह्या भागांतून आपला अंत होईपर्यंत जाऊंच नये.

श्रीउवा. ३. १५. २२३

हल्लीं जें तुम्हीं हें माझें स्थूल शरीर पाहात आहांत त्यांतहि पूर्वीचा जीव नसून तो दिव्य शरीरांतील शुद्ध आत्मा तोच यांत आहे.

श्रीउवा. ४. २२. ३५६

मी तरी भयंकर दुःखाची व संकटाची परंपरा भोगली व त्यायोगें माझ्या सर्व वासना जळून जेव्हां माझा जीव जळून गेला, तेव्हांच जगापैकीं ' न कळण्या 'ची प्राप्ति होऊन मला ही अवस्था आली.

श्रीउवा. ४. २२. ३५६

माझी स्वतःची स्थितीहि आंतून गुप्त व एकांत आणि बाहेरून उघड अशीच आहे; परंतु इतर पाहणाऱ्या अज्ञ लोकांना त्याची कल्पना येत नाहीं. मी बाहेरून कशाहि स्थितींत उघड दिसलों; तरी आंतून केवळ गुप्त, एकांत स्थितींतच आहे, असें माझें मीच जाणें. श्रीउवा ४. १८. ३२३

तुम्हांला स्वतःच्या अनुभवासाठीं तुम्हीं आहां, तर तुमचा अनुभव तुम्हांला देण्यासाठीं ती प्रकृतिहि आहे असें समजा. श्रीउवा. ४. १. १२

*

## भजन

धातूंच्या टाळेनें शब्द करून भजनांत आणखी आणिक एक विशेष फायदा आहे कीं, भजन करीत असतां त्याचा ध्वनि दोहों बाजूंनीं जितक्या अंतरावर जाईल तितका भाग पवित्र होतो; व त्या मानानें आपलें मनहि शुद्ध होत जातें. तसेंच जितक्या प्रमाणानें त्या ध्वनीचा भाग आहे, त्या भागांत जे मनुष्यापासून कोणीहि प्राणी असतील तेहि पावन होत जातात. आपल्या भजनांच्या योगें जितके अधिक मनुष्यादिक प्राणी पावन होतील, त्या मानानें आपल्या कुळांतील अनेक पुरुष पावन होऊन उद्धरून जातात. असा हा टाळेच्या शब्दानें भजन करण्याचा परिणाम आहे. श्रीउवा. ५. २०. ३२५

हातांत टाळ घेऊन सारखें ' रामकृष्णहरि ' ' विठ्ठल विठ्ठल ' वगैरे म्हणत असतांना फार काल जाऊन तादात्म्य झालें म्हणजे आपल्या

जीवाचें चैतन्य त्या जड असलेल्या धातुमय टाळींत जाऊन त्या टाळ-मधूनहि तोच नामोच्चार उत्पन्न होतो, असा भास होऊं लागतो;

श्रीउवा. ५. २०. ३२४

स्वतः भजन करून शेंकडों जणांना भजनाविषयीं उत्तेजन देण्यांत महापुण्य आहे. श्रीउवा. ५. २०. ३२३

भजन करतांना अंतर्बाह्य शूचिर्भूत असावें लागतें.

श्रीउवा. ५. २०. ३२१

व त्या देवतेमध्यें जी विलक्षण अघटित शक्ति आहे, तीहि आपल्या हृदयांत प्रगट होऊं लागते.

श्रीउवा. ५. २०. ३२७

म्हणजे मानानेंच आपले ठिकाणीं स्वयंसिद्ध उत्पन्न केलेल्या सामग्रीनेंच, मनानेंच पूजा भजन इत्यादि करीत गेलें तरी उत्तमच आहे.

श्रीउवा. ५. २०. ३३०

अशा रीतीनें परमेश्वरालाच किंवा आपापल्या इष्टदेवतेलाच आपलें सर्वस्व मानून त्याच्याशींच करमणूक करणारे कोणीहि स्त्रीपुरुष आपल्या गणगोताला परमेश्वररूप करून आपणहि सद्रूप होतात, हा निश्चय समजावा. श्रीउवा. ५. २१. ३३५

भजन करणारे नसून खरे भगवद्भक्त व अव्यवस्थित वागणारे नसतील असे केवळ भजन ऐकण्यास येत असतील, तर त्यांना येऊं द्यावें.

श्रीउवा. ५. २०. ३२०

भजन करण्याचें जें आरंभापासून ठिकाण ठरविलें असेल त्या जागेंतच शक्य तितकें भजन करावें. श्रीउवा. ५. २०. ३१९

भजन करीत असतांना बाह्य विषयवस्तूंकडे लक्ष जाऊं नये म्हणून कोणाशींहि न बोलतां डोळे लावून भजन केलेलें उत्तम. ज्या देवतेचें भजन करीत असूं त्या देवतेचें ध्यान किंवा त्यांसंबंधीचे विचार हृदयांत

नेहमीं चालू असावे, किंवा भजन करतांना तोंडावाटे जे अभंग, पदें, गीता वगैरे म्हटलें जात असेल, त्याचा अर्थ ध्यानांत आणीत जावा.
श्रीउवा. ५. २०. ३१९

आपल्या भजनास कोणी लोकांनीं जमावें व चांगलें म्हणावें अशी अपेक्षा ठेवूं नये. श्रीउवा.५. २०. ३१९

'रामकृष्णहरि' इत्यादि कोणत्याहि देवतेचे नामोच्चार करून भजन करीत असतां त्याचें प्रत्येक अक्षर डोळे लावून हृदयांत पाहतां पाहातां भजन करावें; म्हणजे आपलें हृदय किंवा मन हेंहि त्या मंत्ररूप बनून जातें. श्रीउवा. ५. २०. ३२७

हाहि नियमच समजावा. त्याच्यामागें त्याच्या टाळीवर त्याच्या परिवारांनीं भजनाचा नेम चालवावा म्हणजे पिढीन् पिढी इहलोकीं परलोकीं सर्वं सुखाचा अनुभव घेत घेत सर्व कुळांचा उद्धारच होत राहील.
श्रीउवा. ५. २०. ३२७

कदाचित असा भजन करणारा खरा भगवद्भक्त जो असेल तो त्या टाळीच्या किंवा झांजरीच्या योगें नित्य नियमाप्रमाणें भजन करीत असतांना ती टाळ किंवा झांज पूर्ण झिजली नसूनच, हा अंतकाळीं परमेश्वररूपच होऊन जातो. श्रीउवा. ५. २०. ३२१

परंतु या जन्मांत आयुष्य संपण्यापूर्वींच या सर्व गोष्टींचा पूर्ण अनुभव येण्यास भजनकरी खऱ्या भक्तानें शक्य तितकें ब्रह्मचर्यादि नियम पाळून व्रतस्थ राहिलेले उत्तम. म्हणून आपल्या स्त्री वगैरे परिवारांनाहि भजनाची संवय लावून त्यांनाहि आपल्याबरोबर भजनास येण्याची वहिवाट केलेली उत्तम. श्रीउवा. ५. २०. ३२६

भजन करतां करतां झिजून झिजूनच त्या टाळीचा किंवा झांजरीचा शेवट झाला पाहिजे म्हणजेच आपण ज्या देवतेचें भजन करीत होतों, त्या देवतारूप आपले आईबाप झाले असें समजावें. श्रीउवा. ५. २०. ३२७

## भक्ति

आणि त्या सर्व भावरूप विषयावर आपण जें प्रेम ठेवतो ती भक्ति.
श्रीउवा. २. ६. ११२

तुमच्यावर माझा भाव आहे, म्हणजे प्रिय वस्तूदेखील मी तुम्हांस देण्यास तयार आहे, म्हणजेच तुमच्यावर माझें प्रेम ( भक्ति ) आहे. ही जड वस्तूंच्या दानाची व्याख्या झाली. सारांश, पूज्य बुद्धि असेल, तर दानाचें पुण्य. श्रीउवा. १. १८. २६२

परमेश्वरास भाव व भक्ति आवडते. श्रीउवा. १. १८. २६०

ज्या वस्तूवर प्रेम आहे, ती वस्तु दिली, म्हणजे भाव दिल्यासारखें झालें. श्रीउवा. १. १८. २६१

कोणास पाणी द्यावयाचें म्हणजे पात्रासह द्यावें लागतें. तसेंच, परमेश्वराला भक्तिप्रेम द्यावयाचें म्हणजे तें भक्ति प्रेम ज्या वस्तूवर असेल, त्या वस्तूसह तें प्रेम द्यावें लागतें. श्रीउवा. १. १८. २६१

भाव व भक्ति एकच असल्याचें दाखवावयाचें आहे. कोठें कोठें भक्तिप्रिय माधव असें म्हटलें आहे, व कोठें "देव भावाचा भुकेला, तुका वैकुंठासी गेला" असेंहि आहे. यावरून दोन्हीं ईश्वरास आवडतात. भक्ति किंवा प्रेम हें निराकार आहे. म्हणून तें नेहमी साकार जी प्रिय वस्तु, त्याच्या आधारानें असतें. जसें, पाणी हें जरी निराकार नाहीं, तरी घटकाभर त्याला निराकार समजून तें जसें पात्राच्या आधाराशिवाय केव्हांहि राहूं शकत नाहीं तसेंच भक्तिप्रेम हें साकार प्रियवस्तूशिवाय असूं शकत नाहीं. श्रीउवा. १. १८. २६१

परमेश्वरास नुसता भावच किंवा भक्तीच देऊन चालत नाहीं. प्रेमाला आकार नाहीं. निराकार वस्तु परमेश्वराला दिली जात नाहीं. परमेश्वर

निराकार आहे, निराकाराला निराकार दिलें जात नाहीं. भाव व भक्ति हीं दोन्ही परमेश्वराला दिलीं पाहिजेत. श्रीउवा. १. १८. २६०

सच्चिदानंद जें अनंत त्याचा अनुभव येऊन गेला, म्हणजे कोणत्याहि अदृष्ट स्थितींत. असलेल्या शुद्ध प्रकृतीच्या म्हणजे कोणत्याहि अदृष्ट दिव्य शरीराच्या योगें अजरामर राहातां येतें. हाच मुख्य मनुष्य-देहाचा उपयोग. श्रीउवा. ४. १. ८

तर शेवटचें सुखाचें गांव म्हणजे मनुष्यदेह.

श्रीउवा. ५. २४. ३८३

मनुष्य आकार हा निराकार सच्चिदानंदाचा सर्व साकारांत शेवटचा आकार आहे. श्रीउवा. १. २४. ३४१

तर तांदुळाच्या गरजेसाठी जशी प्रथम साळच उत्पन्न करावी लागते, तसेंच परमेश्वराच्या प्राप्तीसाठी प्रथम मनुष्यपणच यावें लागतें.

श्रीउवा. ५. ३१. ४६१

कांहीं अनियमितपणा व बेबंदशाहीपणाने वाटेल तसें वागण्याचा बखेडा जर असेल, तर तो तुम्हां मनुष्यजातींतच.

श्रीउवा. २. २४. ४१२

## मत्सर

सारांश, आपल्या दुःख-परिहारासाठीं सकाम करणी करूं नये, आणि द्वेषबुद्धि व मत्सर हे स्वप्नांतसुद्धा मनांत आणूं नये.

श्रीउवा ४. ४. ७०.

मी श्रेष्ठ अशी जी बुद्धि तीच मत्सरास कारण. श्रीउवा. ४. ४. ५९.

त्या मत्सर दैत्याच्या वाटेस न जातां त्याचा संबंध किंवा त्याचें बीज जें तुझ्या हृदयांत आहे त्याचा प्रथम नाश कर. श्रीउवा. ४. ४. ५९.

दत्तात्रयानें सांगितलें कीं, त्या मत्सरासुराला मारण्याची युक्ति तुझ्या-जवळच तर आहे. मत्सराचें बीं तुझ्याजवळ आहे, त्या बीजरूपानें असलेल्या मत्सराचा नाश कर. श्रीउवा. ४. ४. ५८.

त्याचा नाश जर तूं करून टाकशील तर बाहेरच्या मत्सराच्या नाशास कितीसा अवकाश ? मुळाचा नाश केल्यावर वृक्षाच्या नाशास किती उशीर ? श्रीउवा. ४. ४. ५८.

मत्सर म्हणजे काय ? तर परोत्कर्षासहन म्हणजे दुसऱ्याच्या उत्कर्षाचें असहन; म्हणजे सहन न होणें. दुसऱ्याचें चांगलें पाहावत नसणें, दुसऱ्याचें चांगलें किंवा उत्कर्ष होऊं लागला म्हणजे त्याला दुःख होतें, त्याला मत्सर म्हणावें. श्रीउवा. ४. ४. ५५.

तर जग निर्माण करण्याकरितां जी आद्य प्रकृति, तिनें जगपण म्हणजे जगाची घडामोड नेहमीं चालत राहावी, याकरतां ज्या ज्या गोष्टींची जरूरी होती, त्यांपैकींच जगामध्यें मत्सराचीहि जरुरी आहेच.
श्रीउवा. ४. ४. ५६

अर्थात आरंभाला असलेली अभिमान अवस्था नाहींशी होईल, तरच मत्सराचा नाश होईल. श्रीउवा. ४. ४. ६३

मागील कामक्रोधादिकांची मूस म्हणजे मत्सर. श्रीउवा. ४. ४. ६३

## मनुष्य

मनुष्य शरीर मिळवून मुख्य कर्तव्यें काय आहे ? तर ऐहिक, पार-लौकिक थेट परमेश्वरी ब्रह्मसुखापर्यंतचें सुख भोगावें, व त्या सुखासाठीं

जे खरे खरे उपाय असतील, त्या उपायांची योग्य ती करणी करीत रहावें. असें करणें हेंच मुख्य मनुष्य-जन्म घेण्याचें सार्थक.

श्रीउवा. ५. २. १३

समजा, एखादी जगापैकीं वेडीवाकडी किंवा चांगली अशी वस्तु कोणालाहि दिली, किंवा त्या वस्तूचा कोणत्याहि तऱ्हेनें उपयोग करण्यास सांगितलें, तर त्याबद्दल आपण कोणत्याहि प्रकारें तर्क वितर्क, शंका कुशंका न करतां व कोणतीहि कल्पना मनांत न आणतां ते सांगतील त्याप्रमाणें करणें हेंच खरें भक्तीचें कर्तव्य. श्रीउवा. ५. २६. ४०२

याच्या उलट जसें सत्कर्माचें उगमस्थान मनुष्य, तसेंच असत् कर्माचें उगमस्थानहि मनुष्यच आहे. श्रीउवा. ५. २६. ४०७

मनुष्यानें मनाच्याद्वारें असत् कर्माचा प्रवाह सुरू केला म्हणजे असत् कर्माचें उगम मनुष्यच झाला. श्रीउवा. ५. २६. ४०७

आपल्यापासून सत्कर्माची उत्पत्ति व सद्वस्तूची प्राप्ति होईपर्यंत ती कर्माची गति चालूं ठेवणें, व तीं कर्में पुन्हां आपल्यांतच लीन होणें म्हणजे सत्कर्माची पूर्णता झाली. श्रीउवा. ५. २६. ४०५

सत्कर्में सुरू होण्यास मन हें कारण आहे. श्रीउवा. ५. २६. ४०६

मनुष्यप्राणी हें जसें सत्कर्माचें उगमस्थान परंतु कोणत्याहि प्रवाहाचें मनुष्य हेंच उगमस्थान. श्रीउवा. ५. २६. ४०५

*

## सत्कर्म

सत्कर्म करीत असतांना उत्पन्न होणारें जें पुण्य, तें पुण्य घेऊन तें त्या दारूच्या गुत्त्याकडे जातें; आणि त्यायोगें त्या गुत्त्यावर जेवढे लोक

आपल्या परिचयाचे असतील, तितक्यांचेहि दोष कमी होत जाऊन त्यांना दारू पीत असतांनाहि पावनता येते. श्रीउवा. ४. ८. १६१

त्याचप्रमाणें सत्कर्म करीत असतां तें सत्कर्म करणाऱ्याचें मन, जितक्या प्रमाणांत ज्या ज्या व्यक्तींसंबंधी बरेवाईट विचार करीत राहील, तितक्याहि फैलावलेल्या त्या सत्कर्म करणाऱ्याच्या मनाची शुद्धता झाल्यावर, मग त्या त्या व्यक्तीच्या द्वारें जे जे विचार किंवा मानसिक क्रिया होतील, त्या त्या या सत्कर्म करणाऱ्याला कळूं लागतात.

श्रीउवा. ४. ८. १७४

एवढा मोठा महत्त्वाचा फायदा होतो; आणि तें सत्कर्म पूर्ण झालें, म्हणजे अखेरीस सुद्धां या सत्कर्म करणाऱ्याचा अंत झाल्यावर, तो पुढें ज्या सद्‌गतीमध्यें जाईल तेथेंच, त्याचें मन जेथें जेथें फैलत होतें त्या त्या व्यक्तींचीं आयुष्यें संपल्यावर, त्या सत्कर्म करणाराचींच तीं मनें होऊन बसल्यामुळें, त्या व्यक्तींचे जीवहि त्याच्याच पाठीमागें सद्गतीस जातात. श्रीउवा. ४. ८. १७४

इतर कोणत्याही लहान मोठ्या, अत्यंत हीन जातीवाल्यांना सुद्धा या मार्गानें ईश्वरी उपासना करणें श्रेष्ठ आहे. श्रीउवा. ५. २८. ४३८

प्रथम चार वर्षे परमेश्वरी संबंधांत काळजीनें, शास्त्रपद्धतीनें पायाशुद्ध काळ घालविला म्हणजे त्या बाजूच्या एका हिश्शाची पूर्णता झाली, असेंच आणखी चार चार वर्षांचे दोन हिस्से काढले म्हणजे आपलें कर्तव्य संपलें. मग राहिला चौथा भाग. त्यासंबंधीं आपल्यावर जबाबदारी नसते. ती जबाबदारी सद्‌गुरूवर. ज्यांची तीन हिश्शांची म्हणजे १२ वर्षेपर्यंत सत्कार्याच्या बाजूनें तयारी झाली असेल त्याला उघड किंवा अदृष्ट अवस्थेंत असलेले महासत्पुरुष भेटून त्यांचें चौथ्या हिश्शाचें कार्य ते होऊनच करून टाकतात. श्रीउवा. ५. ७. १४४

तुम्हांला आपल्या स्वतःची, जीवाची व शरीराची शुद्धता राहून नेहमीं

आरोग्य आणि सुखसमाधानच जर पाहिजे आहे, तर बाह्य दिखाऊपणाचे अपवित्र व्यवहार सोडून शुद्ध असे सत्कार्यादिक व्यवहारच वाढविले पाहिजेत. कारण जीव व मन हें शरीराचें मुख्य मूळ आहे.

श्रीउवा. २. २९. ४९६

व्यवहारांत कोणतीहि करणी मनुष्य सुखासाठींच करतो; आणि मानलें तें सुख तरी खरें नसून मानलेलेंच असतें. श्रीउवा. ३. ९. १४२

सकाम करणी करण्याचें हावडें उत्पन्न होऊन सकाम करणी करूं लागला, म्हणजे तसल्या मनुष्याला जिता समजावा, आणि जितेपण हेंच दुःखाला कारणीभूत असतें. श्रीउवा. ३. ९. १४५

केलेल्या सकाम करणीलाच जीवदशा येते. श्रीउवा. ३. ९. १४६

जो दुःख सोसायला तयार होत नाहीं, त्याच्याच मागें दुःख व संकटें येतात. श्रीउवा. ३. ९. १४९

आपल्याला ह्या दुःखरूप जन्ममरणांतून जर मुक्त व्हावयाचें असेल, तर कारणापुरता जगामध्यें व्यवहार ठेवून निष्कामबुद्धीनें स्वधर्माला अनुसरून सत्कर्मेंच केलीं पाहिजेत. श्रीउवा ३. ९. १५१

तसेंच परमेश्वरी सत्कर्म कांहीं सकारण करणें असल्यास तें कर्म पद्धतशीर सशास्त्र व्हावयास पाहिजे म्हणजेच त्याचें फळ मिळतें.

श्रीउवा. ३. ७. १२८

परमेश्वरप्राप्तीसाठीं अभिमानाचा अडथळा दूर व्हावा म्हणून आपण होऊनच परमेश्वरासाठीं लज्जा, अब्रू सोडून कोणतींहि सत्कर्में करीत रहावें हें उत्तम. श्रीउवा. ३. १८. २६१

अशा रीतीनें दुष्कर्माची म्हणजे पापाची जरी पूर्णता झाली, तरी दुष्कर्म तेंच पुण्यकर्म आणि पाप तेंच अखेरीस पुण्य होऊन बसतें.

श्रीउवा. २. ५. ९९

★

## मन

तसेंच साधु, सज्जन आरंभापासून नाहींत; सत्क्रियाच साधु सज्जनाच्या रूपाला येते. तसेंच दुष्ट, दुर्जन हेहि मुळांत नाहींत; पण मनाच्या योगें दुष्ट क्रियाच दुष्ट, दुर्जन मनुष्याच्या रूपांनीं येतात.

श्रीउवा. ३. २३. ३४६.

तसा मनोनाश झाला म्हणजे थोड्या कालानें पूर्व संस्कारांचा प्रवाहहि बंद होतो. श्रीउवा. २. ८. १४४

वासना ठेवून मन स्थिर ठेवूं म्हणाल तर तसें होऊं शकत नाहीं.

श्रीउवा. २. ८. १४४

मन आहे तरच प्रपंच. मनाशिवाय कांहीं व्यवहार होत नाहीं.

श्रीउवा. २. ८. १४४

प्रथम मनांत विचार येतात मग शारीरिक क्रिया घडते.

श्रीउवा. २. ८. १४४

मी म्हणतों कीं मन स्थिर करतों, पण तुमचे व्यवहार बंद होतील मग तुम्ही म्हणतां, नका करूं. मन स्थिर केलें कीं तो पागल झाला, पण तेंहि एकाएकीं स्थिर होत नाहीं. श्रीउवा. २. ८. १४४

जगाचें बरें वाईट, खोटें सुखदुःख, तसेंच कांहीं काल असणें कांहीं काल नसणें, वगैरे जे जगाचे गुणधर्म त्याला अनुसरून तें मनच बनत जातें. श्रीउवा. ५. २६. ४०७

जसजशी असत् कर्माची पूर्णता होत जाते. तसतशी असद्रूपाची म्हणजे जगाची पूर्णता होत जाते. मग तेंच मन खोट्या जाणिवेच्या रूपानें त्याच्या आधारें जग रूपानें झालेलें असद्रूप त्याच्या गुणधर्मा-प्रमाणें दुःख भोगीत जन्म-मरणाचा अनुभव घेत राहातें.

श्रीउवा. ५. २६. ४०८

सुटी म्हणजे व्यावहारिक ऐहिक सुखासाठीं अकरा इंद्रियांच्यायोगें ज्या व्यावहारिक क्रिया केल्या जातात त्या सर्व बंद ठेवणें.

श्रीउवा. ५. २६. ४०४

पुढें मनच सत्कर्में करतां करतां सत्कर्मरूप बनतें. मग मन आणि क्रियेचा प्रवाह निराळे नसतात. श्रीउवा. ५. २६. ४०६

मुख्य आपण. पुढें आपणच मन रूपानें, मनाच्या द्वारें सत्क्रिया किंवा असत्क्रिया म्हणजे तें मनच क्रियारूपाला आलें. पुढें तें कर्मच फलद्रूपाला आलें. सत्कर्म असेल तर सत्फल; असत्कर्म असेल तर असत्फल. म्हणजे मन, क्रिया, फल हे तिन्ही परंपरेनें आपणच बनलों; आणि त्याचें सुखदुःख भोगणारेहि आपणच. श्रीउवा. ५. २६. ४०८

मनाची क्रिया जशी होईल तशी होऊं द्यावी. पण शरीराची क्रिया चालूं ठेवावी, म्हणजे मन कांहीं काळानें स्वाधीन होईल.

श्रीउवा. ४. ८. १५४

देवाचें सत्कर्म करत असतां मन भटकतें तर भटकूं द्या. त्याच्यांत नुकसान नाहीं. जितकें तें भटकेल, तितका सत्कर्म करण्याचा फायदा आहे. आपल्याच्यानें स्थिर चित्तानें तें सत्कर्म केलें जात नाहीं ना ?

श्रीउवा. ४. ८. १५५

मनाचा स्वभाव असा आहे कीं, एक काम शरीराचे द्वारें करीत असतां दुसरींहि पुष्कळ मानसिक कामें त्याच वेळेस तें करतें, परंतु दुसरीं कामें करीत असतां पूर्वीं करीत असलेलें कांहीं बिघडतें असें नाहीं.

श्रीउवा. ४. ८. १५५

मन हें स्थूल शरीराप्रमाणें जड जरी आहे तरी तें स्थूल नाहीं. तें सूक्ष्म आणि भासमान अवस्थेंत असल्यामुळें, जड शरीराच्या द्वारें जेवढें कार्य होईल, त्यापेक्षां शेंकडों पटीनें मनाच्या द्वारें होणारीं कार्यें होतात. कारण तें केवळ भासमान् आहे. श्रीउवा. ४. १०. २०७

मौन म्हणजे मनाचें बोलणें बंद करणें; त्याचें नांव मौन.

श्रीउवा. ४. ८. १३४

कारण मौन हें साक्षात भगवंताचें स्वरूप आहे. "मौनं चैवास्मि" असें भगवंताचेंच वाक्य आहे. श्रीउवा. २. ८. १३६

तोंड बंद केलें तरी मनाची बडबड चालू असते. असें करावयाचें, तसें करावयाचें वगैरे हजारों विचार येतात. मनानें आधीं बोलून मग तोंडानें बोलतों. श्रीउवा. २. ८. १३४

मनापासून बोलण्याचा व्यवहार बंद ठेवला म्हणजे मौन व्रत धरलें तर परमेश्वर आपल्याशींच बोलूं लागतो. श्रीउवा. ४. १९. ३२६

डोळ्यानें कांहींहि पाहाण्याची क्रिया मनापासून बंद ठेवली तर परमेश्वर आपल्याकडे पाहूं लागतो व तो आपल्यालाहि दिसतो.

श्रीउवा. ४. १९. ३२६

परमेश्वरानें जें जें करावें असें ज्या ज्या विषयाबद्दल आपल्याला वाटत असेल, तो तो व्यवहार मनापासून बंद ठेवला म्हणजे परमेश्वर तो व्यवहार करूं लागतो. श्रीउवा. ४. १९. ३२६

मनांत ठरविल्याशिवाय बाह्य व्यवहार होत नाहींत, मनरूपी अग्नींत जितकें इंधन टाकूं, तितका तापहि जास्त होणार व चंचलत्वहि जास्त होणार. मग तुम्हांला इंधन टाकावयाला पाहिजे. पण ताप नको. असें कसें होईल ? भूक लागली म्हणजे विस्तव पेटवून, स्वयंपाक करून पोटांत घालावा लागतो; हें खाण्यासाठीं करावें लागतें. खाण्याची इच्छा नसेल तर अग्नि पेटविण्याचा वगैरे त्रास करावा लागत नाहीं.

श्रीउवा. २. ८. १४३

आतां सद्गुरु पहिले ठिकाणांतच कळ दाबतात, मग हळूहळू मनाचें चांचल्य कमी होत जातें; परंतु शेंकडों प्रसंगानें चंचल असलेलें मन पुढें

कांहीं दिवस थोडें चंचल राहात असतें, व पुढें कांहीं दिवसांनीं तेंहि बंद होतें. श्रीउवा. २. ८. १३९

उगेंमुगें राहिलें म्हणजे सत्पुरुष युक्ति करतात. ती युक्ति म्हणजे स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण अशीं गति उत्पन्न होण्याचीं चार ठिकाणें आहेत. ती बोलण्याची क्रिया पहिल्या तीन ठिकाणीं होऊन मग तोंडावाटे बाहेर पडते. ती क्रिया फार जलदीनें होते. श्रीउवा. २. ८. १३८

निदान जोंपर्यंत आपण सत्पुरुषांच्या दरबारांत आहोंत, किंवा परमेश्वरी संबंधांत पूजा वगैरे पुण्यकर्मांत किंवा सेवाधर्मांत आहोत, तोंपर्यंत तरी कोणत्याहि प्रकारें व्यवहारी भाषण करूं नये.

श्रीउवा. २. ८. १३८

अगदीं कारणापुरताच व्यवहार ठेवला म्हणजे मनाचें चांचल्य व तोंडाचें बोलणेंहि अधिक वाढत नसतें; हा नियमच आहे.

श्रीउवा. २. ८. १३८

तो पुष्कळ कालाचा, कर्माच्या योगें मनाचा चंचलपणाचा ओघ बंद करणें, हें आपल्या हातांत राहिलें नसतें. म्हणून तो बंद करण्यास सत्पुरुषाच्या आज्ञेनें चालून त्यांची मदत घ्यावी लागते.

श्रीउवा. २. ८. १३७

तो उतार व जोर आपल्याच जन्मोजन्माच्या वासनाबद्ध कर्माच्या योगें होऊन बसलेला असतो. तसें मनहि कितीहि आवरलें तरी तें बेटें फुटायला पाहतें. त्याला जोर फार असतो. श्रीउवा. २. ८. १३७

तसें पूर्वीचे मनाचे व्यापार कीं ज्यापासून आपल्याला त्रास होतो व खरें समाधान होत नाहीं, तें खरें समाधान पाहिजे असेल तर पूर्वींचे मनाचे व्यापार मोडून टाकावे लागतात. श्रीउवा. २. ८. १३६

जुनें घर ठेवून नवीन चांगलें बांधूं म्हटलें, किंवा वाईट जागेंत चांगलें धान्य लावूं म्हटलें तर होऊं शकत नाहीं, तसें पूर्वींचे मनाचे

वेडेशाकडे व्यापार बंद करून तें स्वच्छ केलें पाहिजे.

श्रीउवा. २. ८. १३६

देवाला मन लागतें, मन न दिलें व सर्व दिलें, तर कांहीं उपयोग नाहीं. मनापासून शरीराची, जीवाची, अनेक विषयांची उत्पत्ति आहे. तें मूळ आहे. श्रीउवा. २. ४. ७२

मनांत ठरविल्याशिवाय बाह्य अवयवांनीं व्यवहार होत नाहींत.

श्रीउवा. २. ८. १४३

मन जोंपर्यंत आहे तोंपर्यंत त्याचा ताप सोसणें भाग पडतें. त्याची चंचलता केव्हांहि बंद होत नाहीं, कारण त्याचा तो स्वभावच आहे.

श्रीउवा. २. ८. १४३

जसा अग्नीचा दाहक गुण त्याच्या आंगचाच आहे. आपण म्हणूं अग्नि असावा पण त्यानें जाळूं पोळूं नये, तर असें होऊं शकत नाहीं. तो दाहक नको असला तर अग्नीच काढून टाकला पाहिजे, तरच जळणें पोळणें बंद पडेल. अनेक विषयवासनांनीं चंचल झालेलें मन पेटलेल्या अग्नीप्रमाणें असतें. श्रीउवा. २. ८. १४३

सद्विचारासंबंधीं बोलण्यानें मौन मोडलें जात नाहीं.

श्रीउवा. २. ८. १३९

वरचीं फुलें डोक्यावर नाहीं रहात तर नाहीं; मन हेंच पुष्प आहे तेंच परमेश्वराला देऊन, तेथेंच कायम ठेवण्याचा प्रयत्न करावा.

श्रीउवा. २. ४. ७२

मनाचे चांगले चांगले विचार, चांगलें चांगलें कर्म वाढवून सुखांत जाणें म्हणजे संक्रांत. मनाचे वाईट विचार, वाईट कर्मे सोडीत जाऊनहि सुखांत गेलें म्हणजे किंक्रांत. श्रीउवा. २. ५ ९७

म्हणून अन्नग्रहण करण्याचीं इंद्रियें व त्या इंद्रियांच्याद्वारें आनंद

घेणारें आपलें मन बंद ठेवलें, म्हणजे दगडाच्या मूर्तीचा का देव असेना !
श्रीउवा. ४. १९. २२६

ज्या जीवात्म्याला म्हणजे ज्या कोणाला आपल्या शरीरांत परमेश्वराची वस्ती झाली पाहिजे, व तो आपल्या हृदयांत आल्याचेंहि आपल्याला ज्ञान झालें पाहिजे; व तो आल्यामुळें आपल्या ठिकाणीं अघटित शक्तीहि प्रगट झाली पाहिजे; किंवा आपला जीवात्मा तो परमेश्वरी आत्मा झाला पाहिजे, त्यांनीं जरूरीपुरत्या शरीररक्षणाच्या व्यवहाराशिवाय जगांतील व्यवहारांत मनुष्याच्या पद्धतीप्रमाणें आपल्या शरीराचा, मनाचा व बुद्धीचा उपयोग करूं नये. श्रीउवा. ३. ३०. ४०९

यावरून मनाची वाढ आपल्या ताब्यांत आहे; जेवढें तें वाढवावें तेवढें वाढतें, व कमी करावें तेवढें कमी होतें.
श्रीउवा. ३. ४. ७४

एखादे वेळीं एखाद्याचें शरीर मोठें असतें, परंतु बाह्य विषय न घेतल्यामुळें मन सूक्ष्म असतें. एखाद्याचें शरीर वयानें लहान असून इंद्रियाद्वारा पुष्कळ विषय शरीरांत गेल्या कारणानें मन शरीराच्या वयापेक्षां मोठें होऊन बसतें. श्रीउवा. ३. ४. ७४

मन हलकें व लहान ठेवण्याचा प्रयत्न करावा; याचा स्वभाव शरीराबरोबर वाढावा असा नाहीं. परंतु शरीर जसजसें वाढतें व बाह्य विषय इंद्रियाच्या द्वारें आंत शिरतात, तसतसें त्या विषयांबरोबर मन वाढतें.
श्रीउवा. ३. ४. ७४

मन लहान मोठें ठेवणें आपल्या हातांत आहे. श्रीउवा. ३. ४. ७४

परमेश्वराला सगळ्या अवस्थांच्या माणसांची जरूरी आहे. मन फार वाईटहि आहे, व फार चांगलेंहि आहे. त्याला जशी संवय लावावी तसे तें वाईट किंवा चांगलें रहातें. शरीर जसें वाढत जातें तसें मनहि वाढत जातें. श्रीउवा. ३. ३. ५६

मळ वगैरे लागला तर पाण्यानें धुऊन टाकून स्वच्छ करतात. तशी स्वच्छता झाली म्हणजे बाह्य अवयव नेहमीं पूर्ण पवित्र असण्यासाठी प्रथम मन पवित्र झालें पाहिजे. श्रीउवा. ३. ९. १५४

मन पूर्ण पवित्र असलें म्हणजे बाह्य हस्तपादादिक अवयवांना कितीहि अमंगळ घाणेरडा मळ लागलेला असला तरी तीं अवयवें पवित्रच समजावींत. श्रीउवा. ३. १०. १५४

मन पवित्र कशानें असतें ? तर व्यवहारामध्यें " असें आणि तसें " म्हणजे अमुक बरें आणि वाईट, बऱ्याबद्दल आनंद आणि वाईटाबद्दल कंटाळा असा बऱ्यावाइटाबद्दल ज्याच्या मनाला कोणत्याहि प्रकारें विचार येत नाहीं व विकार उत्पन्न होत नाहीं, " जसें असेल तसें " कसेंहि असलें, तरी त्यांत आनंद वृत्तीच अशी ज्या स्त्रिया किंवा पुरुषांच्या मनाची वृत्ति असेल, तें मन उत्तम रीतीचें पवित्र आहे असें समजावें. श्रीउवा. ३. १० १५४

सारांश, मनाचा व शरीराचा संबंध नाहीं. शरीर पतन झालें; तरी तें मन पुन्हा जन्म घेण्याची तयारी करतें. श्रीउवा. ३. ४. ७५

परंतु त्या मनाला गुदद्वार नसल्यामुळें ज्या द्वारानें त्यानें वासनारूप खाद्य स्वीकारलें, त्याच द्वारानें त्याचा मल काढला जातो. श्रीउवा. ३. २५. ३५४

आतां त्या मनाला मळ काढून टाकण्याला गुदद्वार जरी नाहीं, तथापि कोणीहि मनुष्यानें तो मळ काढून टाकण्याचें निश्चित केलें तर तो काढूं शकतो. श्रीउवा. ३. २५. ३५४

जे कोणी मनुष्य तशा त्या गुदद्वार नसलेल्या शरीराच्या योगें विरुद्ध वासनेचें खाद्य खात नाहींत- व सद्वासनेचें खाद्य खाऊन त्याचा मळ बनतहि नाहीं व सांचतहि नाहीं, त्यांना वारंवार दुःख देणाऱ्या स्थूल शरीराचा जन्म येत नाहीं. श्रीउवा. ३. २५. ३५३

असें हें गुदद्वार नसलेलें शरीर कोणतें ? तर प्रत्येक मनुष्याचें मन.

श्रीउवा. ३. २५. ३५३

मनुष्याचें पहिलें मुख्य अदृष्ट, न दिसणारें शरीर, मनच आहे.

श्रीउवा. ३. २५. ३५३

तुमचें पोर जर हगलें, तर तें नाक मुरडीत मुरडीत कंटाळा करून, किळसवाणें तोंड करून, कसें तरी राख माती घालून, पानांनीं, खापरांनीं काढून टाकतां, नाहीं तर एखाद्या मोलकरणीला सांगून काढून घेतां हें कांहीं पवित्र मनाचें किंवा पवित्र अवयवांचें लक्षण नाहीं.

श्रीउवा ३. १०. १५५

जगांत ज्या ज्या कांहीं वस्तू आहेत त्या वस्तू वास्तविक नाहींतच; तर आपल्या मनाचें तें रूपांतर आहे. श्रीउवा. ५. १. १

बाह्य वस्तू कोणत्याहि प्रकारें दिसेनाशा झाल्या म्हणजे मग काळा अंधकार डोळ्यापुढें दिसून त्याचाच अनुभव येतो. काळा अंधकार जोंपर्यंत दिसतो व अनुभवास येतो; तोंपर्यंत डोळ्यांची कनीनिका पूर्ण स्थिर झाली, व मनहि पूर्ण स्थिर झालें असें समजूं नये.

श्रीउवा. ५. १. ४

तर अत्यंत सूक्ष्म प्रमाणानें मनाचें व कनीनिकेचें चंचलत्व असतें. जें दिसणारें अंधकारासारखें काळें हेंच सर्व जगाच्या उत्पत्तीला मूळ आद्यकारण. श्रीउवा. ५. १. ४

पाहाण्याला मुख्य साधनीभूत जी डोळ्याची आंतील कनीनिका म्हणजे बाहुली ती जर तिच्या प्रमाणांत नेहमीं चंचल होत राहील, तरच बाह्य वस्तू त्याला दिसून मनाच्या योगें त्याला बोध होईल. मनाच्या चंचलत्वाचा परिणाम डोळ्यांतील कनीनिकेवर होऊन, ती नेहमीं सूक्ष्म प्रमाणांत हालत रहातें; म्हणून बाह्य वस्तू दिसतात.

श्रीउवा. ५. १. ४.

डोळ्यांतील कनीनिका जर बिलकूल हलणारच नाहीं, तर मनहि हलणार नाहीं; व मन स्थिर होईल तर कनीनिकाहि हलणार नाहीं. मग बाह्य वस्तूहि दिसत नाहींत; व मनानेंहि त्यांचा बोध होत नाहीं. मन स्थिर झाल्याची अशी स्थिती आहे. श्रीउवा. ५. १. ४

पाहाण्यासाठीं जी वस्तू घेतात, ती वस्तू शांत, सौम्य, सात्विक आणि परमेश्वरी संबंधाचे गुणधर्म असलेली हालचाल न करणारी स्थिर अशी असावी लागते. श्रीउवा. ५. १. ५

म्हणून सौम्य अशी परमेश्वराची मूर्ति डोळ्यांसमोर ठेवण्याची वहिवाट आहे. कोणी कोणी सौम्य निर्वात स्थितींत निश्चल असा तुपाचा दिवा ठेवून त्याकडे पाहात बसतात. श्रीउवा. ५. १. ५

असा अभ्यास पूर्ण झाल्यावर ती कनीनिका पूर्ण स्थिर होऊन जाते; म्हणजे मनहि पूर्ण स्थिर होतें. म्हणजे त्याच्यांत किंचित् सुद्धां चंचलपणा रहात नाहीं. श्रीउवा. ५. १. ५

मग एकदां मन स्थिर झालें म्हणजे जग, जगांतील वस्तु व तत्संबंधी विचार व त्यापासून उत्पन्न होणारे सुखदुःखादि विकार, तसेंच आपलें शरीर व शरीराचीं अवयवें इत्यादि सर्व व इतक्यांना कारणीभूत काळ्या अंधकार रूपांनीं असलेली आद्यप्रकृति तिच्यासह सर्वच आपल्यामध्यें लीन झाल्यावर मग सर्व आकार विकार रहित केवळ आपणच तेवढे उरलों. श्रीउवा. ५ १. ६

जगापासून जेव्हां मी उलट अवस्थेंत जातों, तेव्हां मी 'एकोऽहं' या अवस्थेंत असून केवल शुद्ध आनंदाचा अनुभव घेत रहातों; आणि तुमच्या जगाच्या प्रसंगासाठीं जेव्हां भानावर असतों तेव्हां 'बहु स्याम्' या वाक्याप्रमाणें जगरूपानें तरी भीच व्यापलो आहे असा अनुभव येतो. श्रीउवा. ५. १. ३

मनाचा स्वभावच आहे, कीं कोणत्याहि वस्तूचा ध्यास नेहमी धरीतच राहिलें, तर तसें तें बनावें. श्रीउवा. २. २५. ४२०

म्हणजे स्वप्नांत जें पाहतों, हें त्या मनाचें रूपांतर आहे.

श्रीउवा. २. २४. ४०६

वो नोकरके ( इंद्रियोंके ) साथ मिलते नहीं आता मगर नोकरभी ( इंद्रियोंभी ) अपने तौरसे रहे, और वैसे अपनेसेभी रख्खा जाय तो अपनेको और अपने साथ नौकर ( इंद्रियों ) को भी आनंद आ जायेगा.

श्रीउवा. २. २१. ४७१

सब इंद्रियोंमें मनहि बलवान है ओ मनकू इतना बल कैसा आता है ? तो विषयवासनाका हरवख्त विचार करता येहि उसका खाद्य ओ वासना विचारसे वो बलवान् हो जाता है. श्रीउवा. २. २७. ४६६

सर्व इंद्रियरूपी नोकरांमध्यें सर्वांत मुख्य नोकर जें मन, हेंच इंद्रिय सर्व इंद्रियांत फार बदमाश आहे. श्रीउवा. २. २७. ४६४

हेंच मन सर्व इंद्रियांना फितवून त्यांच्यायोगें आपल्याला जन्मोजन्म सतावून राहिलें, असें जेव्हां त्या जीवात्म्याच्या पक्कें लक्षांत येतें, तेव्हां इतर इंद्रियांपेक्षां त्या मनाचाच नाश करून टाकण्याविषयीं नाना तऱ्हेच्या युक्त्या तो लढवीत राहतो. श्रीउवा. २. २७. ४६४

मनासह सर्व इंद्रियांना त्यांच्या त्यांच्या कार्यापासून बंद ठेवणे हा खरा उपवास, व हाच खरा निराहार अशा रीतीचे ज्याचेकडून थोडे दिवस कां होईना, निराहार होतील, त्यांचाच मनोनाश होऊन, तो सर्व वासनात्मक कर्मदोषांपासून मुक्त होऊन, शुद्ध आत्मानंदाची त्याला प्राप्ती होते. श्रीउवा. २. २७. ४६६

या सर्व इंद्रियांपेक्षां मन मुख्य असल्यामुळें मनालाच फालतू जगाचे विचार न दिले, म्हणजेच मनाला उपोषित ठेवण्यासारखें होतें.

श्रीउवा. ४. २. २७

ईश्वरी नियमाविरुद्ध ' ज्या मनुष्याचें मन असतें, त्या मनानें जें जें केलें जातें, तें केव्हाहि मनुष्याच्याच सुखदुःखाला कारणीभूत होतें.
श्रीउवा. ४. २६. ३९८

तसेंच मनाचें भणक्या मारणें म्हणजे वाटेल तिकडे मनाची धांव जाणें म्हणजे खरा प्रवास. श्रीउवा. ४. २२. ३४५

भणक्या मारण्यांत फार दुःख असतें जो भणक्या मारीत नाहीं, घरी स्वस्थ असतो, कोणाचें देणें नाही घेणें नाहीं, कोठें जाणें नाहीं, येणें नाहीं तोच खरा सुखी. श्रीउवा. ४. २२. ३४५

भणक्या मारणें संकटाचेंच लक्षण आहे. संकटांत पडलेला शेंकडों वर्षें भणक्या मारील. स्वस्थ घरीं बसणें हें सुखाचें लक्षण आहे.
श्रीउवा. ४. २२. ३४५

अशा रीतीचे शुद्धसत्त्वात्मक आपलें मन होण्यास दुसऱ्या कोणाचींहि मनें सत्करणीनें शुद्ध करण्याचा किंवा शुद्ध ठेवण्याचा प्रयत्न करावा लागतो. कोणाहि ब्राह्मणादिकांचीं मनें ब्राम्हकर्मांच्या योगें व ज्याच्या त्याच्या स्वधर्मांच्यायोगें नेहमी शुद्ध ठेवण्याविषयीं प्रयत्न करीत राहिलें, तर आपलेंच मन शुद्धसत्त्वात्मक बनलें जातें. दुसऱ्या कोणाचींहि मनें दूषित व पापात्मक करून घेणें असें होतें. श्रीउवा. १. २५. ३८८

" राहावें बारामतींत परंतु ठेवावी एकमती " म्हणजे ऐकून घ्यावें पुष्कळांचें पण त्यांत जें योग्य असेल त्या रीतीनेंच चालावें, म्हणजे तो कांहीं व्याधिग्रस्त होत नाहीं. श्रीउवा. १. १८. २५२

आपलें मन, बुद्धि जें पात्र, त्यांत व्यावहारिक, सांसारिक अनेक बऱ्या-वाईट विषयांपैकीं साधारण थोड्या प्रमाणांनीं जर भरलेलें असेल, आणि आपल्याला सत्पुरुषाची कृपा किंवा अपक्रिया याची अत्यंत खरी जरुरी असेल, तर आपलें मन, बुद्धि जें पात्र तें रिकामें करून कृपा ठेवण्या-योग्य असें लवकर स्वच्छ केलें जाईल. श्रीउवा. १. २०. २९४

तें लिहीत असतांना एकाग्र अंतःकरण होण्याचा तो एक उपाय आहे. जें लिहिणें, त्या लिहिण्याच्या जागेवर एकसारखी दृष्टी ठेविल्याशिवाय लिहिलें जात नाहीं. श्रीउवा. ३. २८. ३८८

जप करतांना झोंप येऊं लागली तर कष्टाची सेवा करावी, नंतर वेळानें पुनः जप करीत बसावें, अशी कांहीं योजना करावी म्हणजे मन स्थिर होईल. श्रीउवा. ३. २८. ३८७

जप करणें, पोथी वाचणें, इत्यादि मानसिक सेवा करीत असतां मन वाटेल तिकडे भटकत असतें. भटकलें तरी हरकत नाहीं; परंतु प्रथमतः शारीरिक सेवा करून मन इकडे तिकडे न फिरण्याची संवय करावी; व नंतर मानसिक सेवा करावी, किंवा दोन्हींही सेवा चालू ठेवाव्या.

श्रीउवा. ३. २८. ३८७

अशा या साधनीभूत मन बुद्धीसह या शरिराचा जोंपर्यंत मनुष्य-पद्धतीनें निरनिराळ्या तऱ्हेनें उपयोग केला जातो, तोंपर्यंत परमेश्वराची वस्ती तशा शरीरांत होऊं शकत नाहीं; व त्याचा जीवात्माहि परमेश्वरी अवस्थेचा बनूं शकत नाहीं. श्रीउवा. ३. ३०. ४०८

बेमार म्हणजे निर्वासनपणा आणि निरभिमानपणा हें बहुतेक सर्वांना आतां समजलें आहे. अशा अर्थानें जो केवळ बेमार तोच बेफिकीर, बेपरवा, बेजात, बेकाम, बेमन, मानापमानरहित असतो.

श्रीउवा. ५. २९. ४४४

पुष्कळ जन्मांच्या, आपल्या बापदादांपासूनच्या अनेक घाणेरड्या वासना, घासलेट, डासराप्रमाणें शेंकडों दुष्ट विषयवासनांच्या योगें पूर्ण भरलेलें, कीट बसल्यासारखें झालेलें असें जें मन बुद्धिपात्र, हें स्वच्छ होण्यास पुष्कळ काल पाहिजे. श्रीउवा. १. २०. २९४

मनबुद्धि हें जें पात्र तें रिकामें करून कृपा ठेवण्यायोग्य स्वच्छ करण्यास चित्तशुद्धि असें म्हणतात श्रीउवा. १. २०. २९५

आपलें मनबुद्धिपात्र साधारण संसार व्यवहाराच्यायोगें थोड्या प्रमाणांत अमंगल झालेलें असलें, तर थोड्याशा सत्समागमाच्या योगें शुद्ध होऊन जातें. कांहीं जास्त विषयादिक वासनेंत लुब्ध होऊन घाणेरडें झालेलें असलें, तर सत्पुरुषाच्या सहवासांत त्यांच्या आज्ञेनुसार वागून भजन-पूजनादिक ईश्वरासंबंधी कांहीं काल सत्कर्में करीत व स्वधर्मानें वागत राहिलें,तर त्यायोगें शुद्ध होतात. याहिपेक्षां जन्मोजन्माचे व वाडवडिलां-पासून अनेक दोष वाढत जाऊन मनबुद्धि पुष्कळ प्रकारें डामरासारखी घाणेरडी व किटलेली असल्यास तें मनबुद्धि स्वच्छ होण्यास सत्पुरुषाच्या सहवासांत आपल्या स्वधर्माला अनुसरून, त्यांच्या आज्ञेनें कडक तप-श्चर्या अनुष्ठानें, उपासतापास वगैरे करून तो घाणेरडा जीव व मन जळून जाईल अशा रीतीनें कडक सत्कर्में केल्यानें स्वच्छ होतात. अशा रीतीनें पूर्ण चित्तशुद्धि झाल्यावर आपले ठिकाणीं पात्रता येते.

श्रीउवा. १. २०. २९६

तुम्हीं गेलांत म्हणजे तुमचें उसनें आलेलें मन तेंहि तुमच्याबरोबर पुनः परत चाललें जातें. पुनः आपलें जसेंच्या तसेंच निर्मनस्क अव-स्थेंत पडलें राहावें अशी ही आमची स्थिती आहे महाराज.

श्रीउवा. १. २०. ३०६

कोणाच्याहि दुःखाला कारणीभूत असें जें दुसऱ्याचें अशुद्ध मन, तें आपण शुद्ध करीत राहिलें, तर दुसऱ्यालाहि शुद्धसत्त्वात्मक मनाची प्राप्ती होऊन खऱ्या सुखाचा लाभ त्याला मिळतो, व तसाच आपल्यालाहि मिळतो.

श्रीउवा. १. २५. ३८७

आपल्याहून आपलें मन दुसरें केव्हां असतें ? तर, जेव्हां जगापैकीं अनेक बाह्य विषयवस्तूंचा विचार करीत राहातें व त्याकरितां काळज्या, फिकीर, दुःख करीत राहातें, तेव्हां तें मन त्याच जगापैकीं बाह्य विषय वस्तु वगैरेंचेंच झालेलें असतें.

श्रीउवा. १. २५. ३८८

सत्करणीच्यायोगें बाह्य विषयादिकांपासून सुटून दूषित संस्काररहित होऊन; शुद्धसत्त्वात्मक जेव्हां बनतें तेव्हां तें आपलें मन आपल्याहून दुसरें न राहातां, आपणच होऊन बसतें, म्हणजे आपल्याहून मन निराळें नसतें. श्रीउवा. १. २५. ३८८

और ये मनके साथ सब इंद्रियें अपने नौकर हैं; ये समझकर रहनेमें आनंद आता है. श्रीउवा. २. २७. ४७०

वेदांच्या अर्थाप्रमाणें यज्ञयागादिक जे करणारे आहेत, ते स्थिर मनाचे नाहींत. श्रीउवा. १. ६. १०७

मन वस्तुरूप होतें, तेव्हांच वस्तुबोध होतो. श्रीउवा. १. ६. ११०

अर्थ समजूं लागल्याबरोबर मनाची चलविचलता होऊन असें केलें म्हणजे तसें होतें, तसें केलें म्हणजे तसें होईल, अमुक यज्ञ केला म्हणजे अमुक देवता प्रसन्न होते; अमुक देवतेला अशा रीतीनें तृप्त करावें तर अमुक फळ मिळतें, वगैरे वगैरे स्वर्गसुखापर्यंतच्या वासनेनें बद्ध होऊन त्यांतच गुरफटतात व मनाची चंचलता वाढत जाते.

श्रीउवा. १. ६. १०८

अंधश्रद्धेनें वेदमंत्रांच्या अक्षरांचें सहाय्य घेऊन अक्षररूप मन करून, ब्रह्मसुखांत गेलेलें कितीउत्तम. श्रीउवा. १. ६. ११०

तशा रीतीनें फालतू विषयवस्तूच्या वासनेचा अधिक जोर झाल्यामुळें मन जर अधिक पेटल्यासारखें होऊन मनाची अस्थिरता चंचलता अधिक वाढली, व त्यायोगें बेचैन अवस्था होऊन कांहीं सुचेनासें जेव्हां होऊं लागतें व कसें करावें, अशा चिंताग्रस्त अवस्थेनें मन पेटल्यासारखें होतें. त्यावेळीं शहाण्या व हुषार लोकांप्रमाणें सद्विचार हृदयांत घेऊन परमेश्वर नामस्मरण, जपजाप्य, सत्कर्में किंवा सत्पात्र ब्राह्मणद्वारां अनुष्ठानें हेंच पाण्यासारखें फालतु वासनेनें पेटलेला मनरूपी अग्नि शांत करण्याकरितां अत्यंत उपयोगी आहे. श्रीउवा. ३. ५. ८३

व याच उपायाच्यायोगें शेकडों लोकांनीं आपल्या पेटलेल्या मनाची शांतता करून घेतलेली आहे. श्रीउवा. ३. ५. ८३

पुढें वासनारूप इंधन न घातलें म्हणजे झालें, मग तें मन आपोआप शांत होतच असतें. श्रीउवा. ३, ५. ८२

असें तें शुद्धसत्त्वात्मक मन व आपण एकच होऊन गेल्यावर आपल्या मध्यें शुद्ध सत्त्वात्मक अघटित शक्ति येते व आपल्याला ऐहिक किंवा अखंड सुखाचा लाभ आपोआप मिळतो. श्रीउवा. १. २५. ३८८

तसें तुमचें मन जर लहान असेल तर त्याला स्वच्छ करण्यास थोडें सत्कर्म पुरेल; पण तुमचें मन मूळचें लहान असून, नाना तऱ्हेचे व्याप वाढवून तुम्हीं त्याला मोठें करून ठेवलें आहे. बरें त्याला मोठें करून तरी एकाच अवस्थेंत ठेवलें असेल म्हणावें तर तेंहि नाहीं. तुमच्या शरीराचे जसे निरनिराळे अवयव आहेत, त्याचप्रमाणें तुम्ही आपल्या मनालाहि निरनिराळे पुष्कळ अवयव निर्माण करून, अनेक प्रकारांनीं त्याला मोठें बनवून ठेवलें आहे. हे अवयव कोणते म्हणाल तर, जेथें जेथें तुमचें मन धांव घेईल तें तें ठिकाण म्हणजे त्याचा अवयवच. श्रीउवा. ४. ८. १७०

तर सत्कर्माचा परिणाम तें सत्कर्म करणाऱ्याच्या मनाच्या द्वारें त्याच्या शत्रूमध्यें जाऊन तो शांत होतो. श्रीउवा. ४. ८. १६२

एखाद्या शत्रूचें मन घाणेरडें असून त्याच्याशीं शत्रूपणानें आपला संबंध जोडला गेलेला असेल, तर त्या शत्रूच्या मनापर्यंत आपलेंच तें मन आहे. श्रीउवा. ४. ८. १७१

अशा रीतीनें त्याचें सत्कर्माचे ठिकाणीं व ध्येयमूर्तीचे ठिकाणीं येणें, व पुन्हा इकडे तिकडे भटकत फिरणें; यायोगें परमेश्वराची ध्येयमूर्ती मधून मधून लक्षांत घेतल्यामुळें त्या-सत्क्रियेंतील पुण्यांशानें तीं त्याचीं बहुतेक ठिकाणें पवित्र होत आलीं म्हणजे त्याचें भटकण्याचें काम आपोआप बंद पडून, तें आपल्या ठिकाणावर आपोआप येतें. श्रीउवा. ४. ८. १६१

त्याला अगदीं थोडें संकुचित माहिती असतें. तर तेवढयाच ठिकाणामध्यें तें हिंडत राहील, दुसरें कोठें जाणार नाहीं, हा आहे त्याचा नियम.

श्रीउवा. ४. ८. १५८

त्या मनाला जेथें जेथें त्याचीं ठिकाणें असतील तेथें तेथें सत्कर्म चालू असतां भटकण्याची जरूरी आहे; कारण मन जेथें जेथें जाईल त्या त्या सर्व गोष्टी मिळूनच त्या मनाची बनावट झालेली असते, म्हणून त्या सर्व गोष्टींची शुद्धता झाल्याशिवाय, मनाची शुद्धता झाली असें होत नाहीं.

श्रीउवा. ४. ८. १५९

अहो, सत्कर्म करीत असतां चित्त स्थिर होण्याची गरजच तर नाहीं.

श्रीउवा. ४. ८. १६०

पूर्वीं जें जें ठाऊक असेल तेथेंच तें जाईल, जें कधीं पाहिलेलें नाहीं व कधीं ऐकलेलें नाहीं, कोणत्याहि प्रकारानें आपल्याला जें ठाऊक नाहीं, तिकडे मन कधींहि जाणार नाहीं.

श्रीउवा. ४८. १५८

★

## माया

परमेश्वरी जी शक्ति, तिचेंच नांव माया. परमात्मा मायेच्या आधारें किंवा माया परमात्म्याचे आधारें अघटित घटना करून वास्तव्य करीत आहे.

श्रीउवा. २. ३. ३६

माया म्हणजे शुद्ध परब्रह्माची स्त्री. श्रीउवा. ४. १६. ३०८

★

## मानसपूजा

देवाची मानसपूजा कशी करतात, तर पुढें देव नाहीं, पूजासाहित्य नाहीं, कांहीं नाहीं, असें असून देवाची मानसपूजा करावी असें शास्त्रांत सांगितलें आहे. म्हणून डोळे मिटून एकांतांत स्थिर आसन घालून बसतात आणि आपली इष्ट देवता, ज्याची पूजा करावयाची असेल ती मूर्ति मनांत आणतात. श्रीउवा. ५. ७. १३२

प्रथम हृदयांतल्या हृदयांत करणें कठीण जातें म्हणून मनानेंच समोर मूर्ति ठेवून करण्याची संवय करावी. श्रीउवा. ५. ७. १३२

प्रथम बाह्य मूर्तिपूजेनेंच मनाची तयारी करावी, म्हणजे पुढें मानस-पूजा सोपें करणें जातें. श्रीउवा. ५. ७. १३४

मानसपूजा करणारांनींहि ज्या ज्या वस्तूंचा मानसिक रीतीनें का होईना; उपयोग केला असेल आणि मनाचा तर त्या पूजेसाठीं सर्वस्वी उपयोग करावाच लागतो. म्हणून त्या त्या वस्तूंचा व मनाचा व्यवहारांत अगदीं जरुरीच्या कारणाशिवाय उपयोग करूंच नये. ही झाली मानसपूजा.
श्रीउवा. ५. ७. १३५

आम्ही पूर्वी सांगितलेंच आहे कीं, जग किंवा जगांतील वस्तु हें मनाचें रूपांतर आहे. मग ऐश्वर्यरूप बनलेलें जें मन तेंच पुढें ऐश्वर्याच्या अनेक सुखोपभोग्य वस्तूंच्या स्थूल रूपानें त्या पूजा करणाऱ्याला प्रत्यक्ष सुखोपभोग देण्याकरतां येतें, आणि अगदीं लहानपणापासूनच त्यांच्या वयाच्या मानानें क्रमाक्रमानें जर ही अशी बाह्य पूजेची व मानसपूजेची मुलांमुलींना सवय लावली, आणि त्या अभ्यासाची जर थोड्या कालांत परिपक्वता होऊन पूर्णता झाली, तर तें ऐश्वर्य मुलांना याच जन्मांत, याच शरीरानें भोगण्यास मिळणार यांत संशय नाहीं. श्रीउवा. ५. ७. १३६

★

## मांग–महार

आतां ते मांग, महार वगैरे लोक कोणत्याही प्रकारें मोठेपणाची बरोबरी न करतां, आपल्याच धर्माप्रमाणेंच वागतील तर त्यांच्याकडून पापहरण करण्याची जी ही मोठी कामगिरी केली जाते, त्याचा मोबदला त्यांना पुढचा जन्म मोठ्या सुखाचा येतो. श्रीउवा. ३. २. २८

परंतु महार, मांग, भंगी वगैरे हे खास परमेश्वरी अवस्थेचे जरी आहेत, तथापि त्याची जाणीव त्यांनाहि नाहीं व इतर लोकांनाहि नाहीं म्हणून त्यांची नेहमीं परमेश्वराप्रमाणें पूजा वगैरे करूं नये.

श्रीउवा. ३. २. ३२

सारांश, मांग मांगीण, महार महारीण, यांना कांहीं ग्रहणासारख्या पर्वकाळांत दानधर्म दिल्यानें आपला जीव पवित्र होऊन खास परमात्मा जो " मांग " ( निराकार ) अवस्थेंत आहे, त्या अवस्थेंत जाण्याचा त्यांचा अधिकार होतो. श्रीउवा. ३. २. ३२

मांग महार अवस्थेंत त्यांना जन्म मिळाल्यावर मांग, महाराच्याच रीतीप्रमाणें जर ते वागले, तर पूर्व जन्माच्या दोषांचा क्षय होऊन ते मांग महाराच्या रूपांतच परमेश्वररूप होतात. श्रीउवा. ३. २. ३०

सरकारकडून मोठया गुन्हेगारास देहान्त शिक्षा देणें असल्यास देहातीत अवस्थेंत म्हणजे खास निराकार जो परमेश्वर त्याच्या पदाला म्हणजे मोक्षपदाला त्याचा आत्मा जावा, या उद्देशानेंच पूर्वीच्या सरकारपासून ते हल्लींच्या सरकारपर्यंत देखील मांगाच्या हातूनच त्याचा शिरच्छेद, किंवा सुळावर देणें, किंवा फांशीच्या रूपानें गुन्हेगारास देहापासून मुक्ति देण्याची वहिवाट आहे. श्रीउवा. ३. २. ३४

पण हल्लीच्या परिस्थितींत सुष्ट परमाणूंपेक्षां दुष्ट परमाणूंचाच भरणा गांवभर शहरभर अधिक प्रमाणानीं चोहोंकडे पसरलेला असतो. त्यामुळे

दुष्ट विचारांचाच मतलबी, मत्सरी असा लोकसमाज चोहोंकडे हल्लीं फार वाढत चाललेला आहे. श्रीउवा. ३. १५. २१९

गावांत किंवा शहरांत असणाऱ्या लोकसमुदायाचे श्वासोच्छ्वासांत दुष्ट व सुष्ट असे दोन्हीहि परमाणू प्रगट होतच आहेत.

श्रीउवा. ३. १५. २१९

नाहींतर हल्लीं जें चाललें आहे त्याप्रमाणें जर तुम्ही चालत राहाल, तर हल्लीं जें दुःख भोगीत आहांत, त्याहिपेक्षां अधिक दुःखपरंपरा तुमच्या देशांत आहे म्हणून समजा. श्रीउवा. ३. १५. २१९

आतां ती अलग अलग व्यवस्था न राहिल्यामुळें वाटेल त्याचे श्वासोच्छ्वास वाटेल त्याच्या हृदयांत प्रवेश करून, वाटेल तशा स्वभावाची बनावट होऊन, वाटेल त्यानें वाटेल तसें वागावें अशी परिस्थिति होऊन बसली. श्रीउवा. २. १५. २१८

वाटेल तसे चाळे केल्यानें काय मांस चढतें का आरोग्य वाढतें, जितकें काहीं नाटकी फॅशनचे व वेश्यासारखे चाळे हे शरीराला रोग वाढविणारे व मानसिक दुःख वाढविण्याचे उपाय आहेत. श्रीउवा. ३. १० १५८

शूद्रांच्या रीतीप्रमाणें जी वागणूक ती ब्राह्मणाच्या धर्मदृष्टीनें जरी अशुद्ध मानली आहे, तरी ती अशुद्ध न समजतां ती शुद्रावस्थेंत शुद्धच आहे; पवित्रच आहे. श्रीउवा. २. ३. ५८

सत्पुरुषाची अवस्था मांग, महार, भंगी, यांच्यासारखीच असते.

श्रीउवा. ३. २. ४७

जसें सर्व प्रकारानें तुमचें उलटलें असेल म्हणजे द्वैत मोडलें असेल, जसें तुमचें स्त्रीपुत्र धनदौलत, हें मांग महारासारख्याचें करून दिलें, किंवा तेंच धनदौलत, जर तुम्हाला दगड मातीसारखे वाटत असेल किंवा अन्न आणि गू हे जर तुम्हाला एकच वाटूं लागलें, ब्रह्मपदीं, परमेश्वरपदीं, तुमच्या आत्म्याची एकतानवृत्ति होऊन त्या आनंदावस्थेंत तुम्ही राहात आहां,

तुमची स्वतःची जातपात कोण आहे, यालाहि तुम्ही विसरलां, शारीरिक, मानसिक कोणत्याहि सुखदुःखाची तुम्हांला कल्पना राहिली नसेल, तुझें माझें आपपर भाव मोडला असेल वगैरें वगैरे अशा सर्व प्रकारें जर तुमचें द्वैत मोडलें गेलें, व पूर्ण सत्पुरुष अवस्था तुमच्या ठिकाणीं बाणली असेल, तर तुम्ही मांग महाराशीं काय म्हणत असाल तसे वागा.

श्रीउवा. ३. २. ४७

★

## मोक्ष

तसेंच जगांत येऊन एखाद्या मनुष्यानें नानाप्रकारचे धंदे, कारभार, नाना प्रकारच्या वासना वगैरे वाढवून जे संस्कार करून घेतले, त्यायोगें पुष्कळ प्रकारचा पसारा त्यानें वाढविला असें होतें. मग त्या पसाऱ्याचा निकाल लावल्याशिवाय त्याला मूळ ठिकाणीं मुक्तिपदाला कसें जातां येईल ? श्रीउवा. ४. ९. १८२

या अभ्यासाच्या योगें वासनाबद्ध झालेला जीव, जगांतून मोकळा होऊन आपल्या मूळच्या सुखरूप ठिकाणीं जातो.

श्रीउवा. ४. ९. १८०

तर त्याचें थोडक्यांत वर्म समजून घ्या. स्त्रिया किंवा पुरुष यांचा समाज कांहीं युक्तिप्रयुक्तीनें जमविण्याविषयीं ते सत्पुरुष आपण होऊन प्रवृत्त होत नाहींत; व न होणें हीच त्यांची पूर्णतेची खूण.

श्रीउवा. ५. ६. १०२

यालाच मोक्ष म्हणतात. अरे, मोक्ष काय फुकटचा आहे ? जगांतील लोकांचा जन्मोजन्मींचा ऋणानुबंध तुटला पाहिजे व तो तुटण्यासाठीं, परमेश्वराशीं ऋणानुबंध जोडला पाहिजे, म्हणजे आपण त्याचें बांधलें

गेलें पाहिजे किंवा तो आपल्यांत बांधला गेला पाहिजे.

श्रीउवा. २. २२. ३७९

वस्तुतः मूळ आपण जे आहोंत त्याला बंधहि नाहीं व मोक्षहि नाहीं, मोक्ष ही अवस्थाच नाहीं, परंतु बंधरूप अवस्था त्या मनाच्या रूपानें घेतली जाते म्हणून बंध; आणि त्यांतून मनाच्या योगें सुटणें म्हणजे मोक्ष.

श्रीउवा. ३. २३. ३४३

सुखरूप, आनंदरूप अशा परमेश्वरी शिवरूप अवस्थेचाच आपला आत्मा म्हणजे आपण असून, केवळ बाह्य विषयाच्या मिश्रणानेंच परमेश्वरी आत्म्याहून अलग वाळीत टाकल्यासारखें आपण झालों आहोंत. क्षणिक सुखाचे, व पुष्कळ दुःखाचे असे शेंकडों जन्ममरणाचे प्रसंग आपल्यावर गुजरतात; व ते आपल्यासच जन्मोजन्मी भोगावे लागतात.

श्रीउवा. १. २. ३०

★

## मोठेपणा

जीवाच्या वस्तु खर्च होऊं नयेत, तन, मन, धन यांपैकीं कांहीं खर्च होऊं नये, व आपली घाण ( पाप ) त्यानें काढून घ्यावी म्हणून त्याला मोठेपणा दिला आहे. वस्तुतः मोठेपणा नाहीं, हलकेपणा आहे.

श्रीउवा. १. २६. ४१२

जर एखाद्याच्या ठिकाणीं मोठेपण नसून दुसरा त्याला तें देऊं लागला. तर समजावें कीं याच्याजवळ मोठेपण होतें म्हणून तो तें देण्याला आला.

श्रीउवा. ४. १३. २७१

आपल्या ठिकाणीं अगदीं हलकेपणा, मूर्खपणा घेण्याचा ज्याचा स्वभाव आहे, तो त्याच्या जवळील मोठेपण पुष्कळ सांचलेलें असतें

किंवा सांचलें जातें, त्यामुळें त्याचा तसा स्वभाव बनून त्याप्रमाणें वागतो. म्हणूनच कमी दर्जानें वागावें, लीन होऊन वागावें अशा रीतीच्या वागणुकीची त्याला गोडी असते; व जसजशी त्याची ती वागणूक वाढत जाते, तसतसें त्याचें मोठेपण गुप्त रीतीनें सांचतच जातें.

श्रीउवा. ४. १३. २७३

या सगळ्या गोष्टींवरून माझ्या पक्कें हृदयांत कळून गेलें कीं, परमेश्वरी बाजू करतां व्यवहारी जगांतील ज्या ज्या प्रकारचा मोठेपणा असेल तो यत्किंचितहि उपयोगी पडत नाहीं. श्रीउवा. ५. ७. १२१

आतां कांहीं वर्षांपासून तुम्हीं देव म्हणून मोठेपणा देतां, त्यापासून मला किती दुःख होऊन रडायला येतें; तें माझें मी जाणें.

श्रीउवा. ४. ५. ७५

*

## मोह

तो मोह जर फारच वाढला तर वरील सर्वांचे गुण मद अवस्थेंत येऊन पुढें मुक्तपणा उत्पन्न होतो. तेव्हां कोणास बोलावें, काय करावें इत्यादि गोष्टींचा सुमार नसतो. श्रीउवा. ४. ४. ६२

मूढ अवस्था म्हणजे कोणतेंहि एखादें काम हातीं धरावें; परंतु मग मागें उलटावें का पुढें जावें हें समजत नाहीं हाच मोह. श्रीउवा. ४. ४. ६२

मोहाची वाट म्हणजेच मद. श्रीउवा. ४. ४. ६२

*

## मौन

मौन हें कोणत्याहि प्रकारचे इष्ट हेतु सिद्धीस जाण्याकरतां मुख्य साधन आहे. श्रीउवा. ४. ८. १५०

कोणत्याहि अनुष्ठान क्रियेमध्यें जे जे नियम सांगून ठेवलेले आहेत, त्यांत मुख्य नियम मौन व ब्रह्मचर्य. अनुष्ठान करतांना हे नियम अवश्य पाळले पाहिजेत आणि जी क्रिया करावयाची ती प्रेम, गोडी व हौस धरून केली पाहिजे. श्रीउवा. ४. ८. १५०

मग ज्यायोगें खऱ्या सुखाचा अनुभव येईल, त्या रीतीनें मनाचा उपयोग करावा. मनाचा व्यवहार परमेश्वराचे प्रीत्यर्थ केला तर मौन धारण करण्याचें फल मिळतें. श्रीउवा. २. ८. १४४

सद्विचार येऊं लागले, म्हणजे मौनाचें फळ मिळूं लागलें असें समजावें. श्रीउवा. ८. १३९

स्वस्थ बसून मौनाचा अभ्यास करणें म्हणजे हा एक योगाभ्यासच होतो. श्रीउवा–८. १३९

मनानें वेडेवाकडे विचार नाहींसें होणें व त्याच्यासाठीं जे प्रयत्न करावयाचे ते करणें, म्हणजेच मौनाचा अभ्यास. श्रीउवा.–८. १३९

मग आंतलें केलेलें, कांहीं दिवसांनीं उदयास येतें व अनेक जन्मांच्या संस्काराच्या वेड्यावाकड्या विचारांचा ओघ बंद पडून चांगले विचार येऊं लागतात. गुप्त असलेले परमेश्वराचे बोल व अखंड सुखाच्या अनुभवाचे बोल हृदयांत, मनांत सुरू होतात; हेंच मौनाचें फळ. श्रीउवा.–८. १३९

स्वस्थ बसण्याच्या योगानेंच सत्पुरुष आंत क्रिया करतात. श्रीउवा.–८. १३९

*

## योग

जें आपल्या मनुष्याच्या आत्म्याचें परमेश्वरी आत्म्यांत पूर्ण मिसळून जाणें यालाच म्हणावें योग. श्रीउवा. १. २. ३५

तसेंच शरीरांत असूनच म्हणजे देहपातापूर्वींच देहांत असलेलें संकुचित प्रमाणाचें जें आपण, ते शुद्ध जो सच्चिदानंद आत्मा त्याच्याशीं मिसळून जाण्याचा अभ्यास करणें म्हणजे योगाभ्यास. श्रीउवा. २. १८. ३१४

देह विद्यमान आहे तोंपर्यंतच हा देहातीतपणाचा अभ्यास पूर्ण झाला तर देहाच्याद्वारें जे अनेक क्रियाकर्तृत्व व्यवहार होऊन जीवात्म्याला दूषित संस्कार झालेले असतात, ते आपोआप नाहींसे होतात.

श्रीउवा. २. १८. ३१५

याच अभ्यासाला योगाभ्यास किंवा वियोगाभ्यास म्हणावें.

श्रीउवा. २. १८. ३१४

योगाभ्यास होऊं लागला, म्हणजे बाह्य विषयवस्तूंशी असलेला जन्मोजन्मींचा जो योग तो तुटत जाऊन, त्याचा वियोगाभ्यास आपोआप होत रहातो. श्रीउवा. १. २. ३८

हा अनुभव इतर कोणच्याहि आधाराशिवाय केवळ आपली शरीरप्रकृति व जीवपुरुष यांच्या आधारानेंच आपल्या आपल्या ठिकाणींच विजातीय विषय वतूंचा अंतःकरणानें वियोग करण्यानें, म्हणजे विषयवस्तूंना मनापासून सोडीत गेल्यानेंच येतो. श्रीउवा. १. ९. १५७

विषय वस्तूंचा आपल्या प्रारब्धगतीनें वियोग होऊं लागला, तर त्या विषयवस्तूंशीं जितक्या कमीअधिक प्रमाणांनीं आपला निकट संबंध जोडला गेला असेल व त्याच मानानें कमी अधिक प्रमाणांनीं जितकें प्रेम जडलें गेलें असेल, त्या मानानेंच वियोग होतांना वियोगदुःखहि कमीअधिक प्रमाणांनी होणारच. श्रीउवा. १. ९. १५८

ईश्वर-इच्छेनें किंवा आपल्या प्रारब्धगतीनें प्रियवस्तुवियोग-दुःखाचे घडोघडी प्रसंग येतच राहिले, व ते ते प्रसंग मोठें धैर्य धारण करून सद्विचाराच्या जोरावर सहन करीतच राहिले तर यालाच म्हणतात वियोगाभ्यास. श्रीउवा. १. ९. १५८

तर त्या सर्व असूनहि त्यांच्यावरचें प्रेम नष्ट झालें, म्हणजेच त्यांच्याशीं आपला वियोगाभ्यास पूर्ण झाला असें होतें. श्रीउवा. १. ९. १६२

त्या वस्तू आपल्यापासून दूर होणें किंवा नाहींशा होऊन जाणें म्हणजे वियोग असें नाहीं, तर सर्व विषयवस्तु आपल्याजवळ असून त्यांच्यावरचें जें प्रेम आहे तें प्रेम नष्ट झालें पाहिजे; म्हणजेच त्या विषयवस्तूंचा खरा वियोग झाला असें होतें. श्रीउवा. १. ९. १६२

विषयवस्तूंचा वियोगाभ्यास पूर्ण करूं लागलें, म्हणजे सच्चिदानंद परमात्मा परमेश्वर याच्याशीं योगाभ्यास आपोआपच होतो; तो करावा लागत नाहीं व खऱ्या आनंदाचा अनुभव सुरू होतो.

श्रीउवा. १. ९. १६३

असें नित्य करीत गेल्यास थोड्या कालांतच, विषयवस्तु आपल्या-जवळ असूनहि, त्यांच्यावरील प्रेमाचा वियोगाभ्यास होत असल्याचा, व परमेश्वराशीं योगाभ्यास होत असल्याचा साक्षात्कार होऊं लागतो.

श्रीउवा. १. २. ३८

स्थूल शरीराचा व बाह्य विषयांचा जो जन्मोजन्म संयोग झालेला आहे त्याचा स्थूल शरीराच्यायोगें वियोगाभ्यास करीत रहावा लागतो.

श्रीउवा. १ २. ३५

परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं उलट रीतीनें प्रथम स्थूल शरीरानें बाह्य विषयवस्तूंशीं वियोगाभ्यास करावयाचा, व तो जसजसा वाढत जातो. तसतसा सूक्ष्म शरीराच्यायोगें परमेश्वराशीं आपोआप योगाभ्यास होत राहतो. श्रीउवा. १. २. ३५

टाळ घेऊन भजन करणें, किंवा त्या मूर्तीची यथासांग पूजा करणें वगैरे भक्तिमार्गानें त्या मूर्तींचा सहवास वाढविला, तरी थोड्या कालांत वियोगाभ्यास व योगाभ्यास याचा साक्षात्कार अनुभवास येतो.

श्रीउवा. १. २. ३८

*

## वासना

वासना पूर्ण झाली नाहीं, म्हणजे क्रोध उत्पन्न होतो; व त्या क्रोधाचे गुण त्यापुढील जो लोभ त्यांत येतात, व वासना पूर्ण होण्यासाठीं लोभ वाढतच जातो. श्रीउवा. ४. ४. ६२

व्यवहारामध्यें ज्या कांहीं ऐहिक सुख मिळविण्याच्या क्रिया व त्यापासून मिळणारें जें सुख त्या सुखाची विषयवस्तु इत्यादि जीं साधनें, तीं सर्व असत्च, त्या ऐहिक सुखासाठीं निरनिराळ्या वासना वाढविणें म्हणजे त्या असताचा मल, तोच मल मनाचे व जीवाचे ठिकाणीं पुष्कळ काल सांचत राहिला, म्हणजे त्यापासून दुःखपरंपरा व संकटपरंपरा.

श्रीउवा. ४. ८. १७५

तसेंच आपलें शरीर जसें घर आणि आंत आपण जसें त्या शरीराचे घरधनी. अनेक निरनिराळ्या विषयवासनेच्या योगें जीवावर व मनावर सांचलेला मळ तो जसा केर कचरा. तो असल्यावर नाना तऱ्हेचीं दुःखें येतच असतात. तीं येऊं नयेत म्हणून परमेश्वरासंबंधीं ज्या ज्या पवित्र अशा अनुष्ठानादिक क्रिया, व स्वधर्माचरण हेंच तो मळ काढून टाकण्याचें मुख्य साधन. श्रीउवा. ४. ८. १७५

कारण शरीर उत्पत्तीच्या अगोदर वासनेची उत्पत्ति आहे; व वासनेच्या आधारें शरीर उत्पन्न झालें आहे. श्रीउवा. ४. ९. १८५

सर्व प्रकारची निरीपिरी करून जर मरेल, तर मग जन्म घेण्याचें कारण नाहीं; शरीराच्या आकाराचा जन्म हा आपल्या वासना तृप्ती-साठीं कांहीं साधन म्हणून आला आहे. श्रीउवा. ४. ९. १८२

*

## वाईट

जगांत वाईट वस्तूच नाहीं. जें जें कांहीं आलेलें आहे तें चांगलेंच आहे; कारण तें आपोआप आलेलें आहे. श्रीउवा. ४. २. ३०

वाईट किंवा चांगलें हें मानण्यावर आहे. श्रीउवा. ४. २. ३१

जसजशी जीवाची वासना वृद्धिंगत होत जाते, तसतसें जीवाचें जीव-पण कायम होत जाते आणि त्या वासना तृप्त करण्यासाठीं निरनिराळे शरीरयोग येऊन जन्ममरण कायम होऊन बसतें. शरीर हें वासना तृप्त करण्याच्या क्रियेसाठीं साधन आहे. परंतु वासनाच जर नसतील तर त्याची काय गरज ? श्रीउवा. ४. ९. १८३

मत्सर, मद, मोह, लोभ, क्रोध असें उलट मानलें तर काम अखेरचा आहे. यांत सामर्थ्य मुळींच नाहीं. श्रीउवा. ४. ४. ६३

*

## विचार

कोणत्याहि प्रकारें इतर विचार न येतां, केवळ, परमेश्वरासंबंधींच जें मनाच्या योगें व बाह्य इंद्रियांच्यायोगें केलें जातें, तेंच खरें गुप्तपणांत केल्यासारखें होऊन तें परमेश्वरास एकदम कळतें व पोहोंचतें.

श्रीउवा. १. ६. १००

इतर विचार येत असतां, परमेश्वराचे संबंधी कांहीं करीत असतां जरी तें एकदम परमेश्वराला पोहोंचणार नाहीं, तरीहि तें फुकट न जातां, तशा

करण्यानेंहि व्यावहारिक दोष व अनेक प्रकारच्या झालेल्या पापांचा नाश होऊन ऐहिक कामना पूर्ण होण्यास विशेष महत्त्वाचा उपयोग होत असतो व तें केलेलें हळूहळू परंपरेनें परमेश्वरासहि जाऊन पोहोंचतें.

श्रीउवा. १. ६. १०१

*

## वासना

स्वतः निर्वासन होतां येत नसेल तर, पूर्ण वासनारहित म्हणजेच जीवरहित अशा सत्पुरुषाला धरून ठेवावें; म्हणजे त्याच्या आधारें आपण वासनाबद्ध व सजीव जरी आहों, तरी वासनारहित व जीवरहिताचें फळ मिळतें. श्रीउवा. ५. २२. ३४७

जसजसें मन निर्वासन होत जातें, तसतसें त्याचें अनायासेंच असद्वस्तूकडे दुर्लक्ष होत जाऊन त्या ग्रहण करण्याविषयीं तेंच मन असमर्थ होत जातें मग तेंच मन सद्वस्तु ग्रहण करण्याकडे लक्ष घालतें, म्हणजे अर्थातच परमेश्वरी बाजूकडे त्याचें वळण सुरू होतें. मग बाह्य वेषानें किंवा अंतर्वृत्तीनें सदवस्था वाढण्याकडे त्याचा ओघ पडत जातो.

श्रीउवा. ५. ५. ७९

याचप्रमाणें बाह्य विषयवस्तूंच्या निरनिराळ्या वऱ्यावाईट वासना हाच मळ; हा आपल्या शुद्ध आत्म्यावर, शुद्ध बुद्धीवर व शुद्ध मनावर शेंकडों दिवसांपासून वारंवार सांचून सांचून; शुद्ध आत्म्यावर जें कीट बसतें त्याला आपल्या शुद्ध आत्म्याचा चैतन्य संबंध असल्यामुळें त्या वासनात्मक मळामध्यें स्वतंत्र रीतीनें एक चैतन्य उत्पन्न होतें.

श्रीउवा. ५. ३. ५१

असें तें वासनात्मक मळाच्या न दिसणाऱ्या गुप्त व सूक्ष्म अशा आकाराच्या आधारानें बनलेलें जें चैतन्य त्यालाच जीव म्हणावें. तेंच

वासनात्मक चैतन्य रूपांतरानें मन, बुद्धि या सूक्ष्म रूपानेंहि असतें.
श्रीउवा. ५. ३. ५१

कोणत्याहि वासना करणें किंवा वाढविणें, हेंच एक महापाप आहे.
श्रीउवा. ४. ५. ७७

जीव म्हणजे प्रकृतिधर्मामुळें आलेल्या अनेक बऱ्यावाईट वासनेच्या योगें शुद्ध आत्म्यावर जें मळाचें कीट सांचलेलें असतें, त्या मळाशी आत्म्याचा संबंध असल्यामुळें, त्या मळालाच चैतन्यरूप अवस्था येऊन जीव असें म्हटलें जातें.
श्रीउवा. ५. ३. ५०

हा कांहीं खास आत्म्याचा धर्म नाहीं. वस्तुतः वासनात्मक मळापासून झालेल्या जीवाशीं आपल्या आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं.
श्रीउवा. ५, ३. ५०

वासना नष्ट होण्याचा उपाय " जसें असेल तसें " हा मुख्य गुरुमंत्र स्वीकारून, सत्पुरुष व परमेश्वर यांचेविषयीं पूज्यभावानें प्रेम ठेवणारा सर्व दुःखांतून मुक्त होऊन सर्व सुखाचा व परमेश्वराच्या भेटीचा अधिकारी होतो.
श्रीउवा. ५. २२. ३४७

पूर्णनिर्जीव किंवा परमेश्वर याच्या प्राप्तीसाठीं जीवाच्या उत्पत्तीला कारणीभूत अशा ज्या नाना प्रकारच्या वासना, त्या कोणत्याहि उपायांनीं हळूं हळूं कमी करीत करीत त्या प्रबळ झालेल्या जीवाला थोडें फार तरी निर्बळ करीत असलें पाहिजे.
श्रीउवा. ५. २२. ३४७

म्हणजे जीव, मन, बुद्धि व शरीर यांचा व त्या आत्म्याचा कोणत्याही प्रकारें संबंध नाहीं. कारण जीव उत्पन्न होण्याला ज्या मळाची जरूरी आहे तो मळ बाह्य विषयवस्तूंपासून आलेला असतो; तो खास आत्म्यातून निघालेला नसतो. म्हणून आत्मा शुद्धच्या शुद्ध स्वतंत्र रीतीनें आहे तो आहेच.
श्रीउवा. ५. ३. ५२

आपल्या शरीराच्या चैतन्याच्या आधारानें आपल्याच मळामध्यें उत्पन्न

झालेले उवा, ढेंकूण वगैरे जे मलरूप जीव त्यांचा जसा आपल्या जीवाशी, शरीराशीं संबंध नसतो; तसेंच आपला जो शुद्ध आत्मा त्याचा व वासनात्मक बनलेला जो जीव त्याचा कोणत्याहि प्रकारें अर्थाअर्थी संबंध नसतो.
श्रीउवा. ५. ३. ५१

ढेंकूण, पिसवा, चिलटे, उवा हे आपल्यापासूनच उत्पन्न होऊन आपल्यालाच त्रास देतात. रात्रीं स्वस्थपणें शांत झोप येऊ देत नाहींत. परंतु ते ढेकूण, पिसवा, उवा वगैरे नाहींशा करून मारून टाकल्या म्हणजे मग त्यांच्याशिवाय आपणच असल्यामुळें सुखसमाधानांत शांतपणें झोपेचा आनंद घेतों.
श्रीउवा. ४. ३. ५२

तसेंच वासनाबद्ध असलेल्या जीवाचें व त्याला मदत करीत असलेली दुष्ट मन, बुद्धि यांचा नाश करून नाहींसें केलें म्हणजे त्रास देणाऱ्या अशा जीवाशिवाय केवळ आपणच असल्यामुळें कोणत्याहि प्रकारें दुःखानुभव न येतां शांत अशा सुखसमाधान स्थितींत अखंड आनंद भोगीत रहातो.
श्रीउवा. ५. ३. ५२

तसेंच विषयापासून उत्पन्न होणारा जो वासनात्मक मळ त्याच्या ठिकाणीं शुद्ध आत्म्याच्या चैतन्याच्यायोगें जीवावस्था उत्पन्न होऊन तो मळच जीवरूप जरी बनला तरी वासनात्मक मळरूप अवस्था ती मळरूपच, आणि वासनात्मक मळ चैतन्यावस्थेंत जरी असला, तरी त्या वासनात्मक मळाचा त्या शुद्ध आत्म्याशीं कांहीं संबंध नसतो तो आत्मा त्या वासनात्मक जीवापासून अलग तो अलगच. त्यापासून मोकळा तो मोकळाच.
श्रीउवा. ५. ३. ५४

वासनात्मक जो मळ त्याचा संबंध शुद्ध आत्म्यांत कोणत्याहि प्रकारें किंचित्‌ही नाहीं. पण वासनात्मक मळच त्या शुद्ध आत्म्याच्या चैतन्याच्या सहवासांत असल्यामुळें त्या मळानें चैतन्यरूप जीवरूपानें मी मी म्हणून

अहंकार घेतला; व जगांत व्यवहारकर्ता होऊन बसला.
श्रीउवा. ५. ३ ५४

तर परित्याग करण्याचा प्रकृतिधर्म स्वीकारून, विषयवस्तु, विषयवासना, आणि विषयोपभोग यांच्याकडे आपणच दुर्लक्ष केल्याशिवाय त्या जीवाचें जीवपण नष्ट होऊन त्याला जगाच्या बाहेरील शुद्ध आत्म्याच्या अवस्थेंत सच्चिदानंदाचा अखंड सुखानुभव मिळत नाहीं. श्रीउवा. ५. ३. ५७

वासना येऊं देणें हा जसा प्रकृतिधर्म आहे; तसाच वासनांचा परित्याग करणें हाहि प्रकृतिधर्मच आहे. श्रीउवा. ५. ३ ५७

मग असलें हें खाद्य त्याला मिळतच गेलें. म्हणजे तो जीव शरीर जरी नाहींसें झालें, तरी आपला जिताच असतो. श्रीउवा. ५. ३. ५६

असें त्या जीवाचें भवचक्र चालूच रहातें; व निरनिराळ्या तऱ्हेची दुःखें, संकटें, बरेवाईट हजारों कालपर्यंत भोगीत रहातो.
श्रीउवा. ५. ३. ५७

तसेंच वासनेच्या योगें उत्पत्ति असलेल्या जीवाचें व मनबुद्धीचेंहि पोषक, पुष्टी वाढविणारें व त्या जीवाला जितें ठेवणारें असें मुख्य द्रव्य म्हणजे विषयवासना व तत्संबंधी क्रिया हेंच आहे
श्रीउवा. ५. ३. ५६

तुमच्या पिंजऱ्यांत तुमचा जीव. श्रीउवा. ५. २३. ३६०

आपल्या शरीरामध्यें पुष्कळ शरीरें आहेत, पुष्कळ जीव आहेत, व पुष्कळ प्रकारचे अहंकार आहेत. ते केव्हां आपापसांत भिन्न भावानें वागतात. श्रीउवा. ५. २३. ३६१

सर्वांत श्रेष्ठ विघ्न येईल तर तें काय करील ? जीवच घेईल ना ? घेऊं द्या घेतला तर. आपल्याला जीवदशा नकोच आहे.
श्रीउवा. ४. ७. १३२

शास्त्रमर्यादेच्या आधारें पूर्ण निर्वासना अवस्था झाल्यावर म्हणजे

वासनारूप चोरांची भीति नाहींशी झाल्यावर मग शास्त्रमर्यादेची त्याला काय गरज ? श्रीउवा. ५. ४. ६४

वासना मोठें नाटक आहे. श्रीउवा. २. २. २९

ज्यांच्या अंतःकरणांत नाना प्रकारच्या वासना नसून, जसें असेल तशांत समाधान मानणारे, निष्कपट व संशयरहित त्यांना भोळे भाळे म्हणावें. श्रीउवा. २. २. २९

भाळाभोळा म्हणजे कोणत्याहि रीतीचा रंग नसणें.

श्रीउवा. २. २. ३०

सुवासिनीचा दुसरा अर्थ :—सर्व प्रकारच्या वासना बंद करून एकच वासना धरिली ती सुवासिनी. ती वासना कोणती तर सद्वासना.

श्रीउवा. २. २. २१

तसेंच आपल्याला वासना आहेत तोंपर्यंत त्या तृप्त करण्यासाठीं मनरूपी अग्नीला प्रज्वलित ठेवावें लागतें. श्रीउवा. २. ८. १४३

तुम्हाला मनाचें चंचलत्व नको असेल तर वासना सोडून द्या.

श्रीउवा. २. ८. १४३

जोंपर्यंत पेटलेल्या अग्नीमध्यें त्या अग्नीचें इंधन हें पडत आहे, तोंपर्यंत त्या अग्नीचा नाश होणें शक्य नाहीं. तद्वतच मनरूप शरीर जें आहे, त्याला वासनारूप भक्ष्य जोंपर्यंत मिळतें, तोंपर्यंत त्याचा नाश होणें शक्य नसतें. श्रीउवा. ३. २५. ३५४

तथापि मनाचा मळ काढून टाकून मन व जीव स्वच्छ करण्याचाच त्याचा निश्चय झाला असेल तर तें मन स्वच्छ करण्यास मुख्य उपाय असा आहे कीं, ज्या ज्या मळ सांचवणाऱ्या विरुद्ध वासना मनाच्यायोगें वाढल्या गेल्या असतील, त्या वासना तृप्त करण्यासाठीं जे जे प्रयत्न केले जातात ते हळुहळू कमी करीत जाऊन दृढ निश्चयाच्यायोगें धाडसवृत्ति धरून त्या त्या विरुद्ध, वाईट वासनेचें खाणें कमी करीत जावें; म्हणजे

विरुद्ध वासना हळुहळू सोडीत जाव्या. तसेंच दृढनिश्चयाच्या योगें धाडस-वृत्ति धरून सद्वासना, परमेश्वरी सत्कर्माविषयींची वासना वाढवीत जावें.
श्रीउवा. ३. २५. ३५५

आपण वासना कमी केल्या आणि त्या विषयवस्तु जरी समोर असल्या, तरी इच्छाच होत नाहीं असें झालें, म्हणजे वासनारूप इंधन त्या मनरूप अग्नींत पडत नाहींसें होतें. तें पडेनासें झालें म्हणजे पूर्वींच्या वासना ज्या त्यांत पडलेल्या आहेत, त्या जळून जाईपर्यंत तो अग्नि राहील; म्हणजे तोंपर्यंत मन चंचल स्थितींत राहील.
श्रीउवा. ३. ५, ८२

तसे अनेक प्रकारचे विषय हींच लांकडें, वासनांच्या रूपानें त्या विषयवस्तु मनामध्यें येऊं लागल्या, म्हणजे तें मन पेट धरणाऱ्या अग्नी-सारखें बनतें.
श्रीउवा. ३. ५. ८१

अग्नि पेटविला असला व त्यांत इंधन टाकलें, तर तो अग्नि पेट घेईल; जर लाकडें न टाकलीं व आपल्यास गरज नसली, तर पूर्वींचीं लाकडें जळून जाईपर्यंत तो अग्नि राहून पुढें शांत होऊन जाईल.
श्रीउवा. ३. ५. ८१

*

## विषय

विषयवस्तु म्हणजे काय? तर कोणत्याहि प्रकारच्या सुखाचा किंवा गोडीचा चटका किंवा चटक लावून देणाऱ्या जगापैकीं कोणत्याहि वस्तु. त्याचेंच नांव विषयवस्तु.
श्रीउवा. १. ९. १५८

तर संसारांत घसरणें म्हणजे संसाराची, म्हणजे विषयाची गोडी लागणें. विषयाकडे मनाची भराभर धांव होणें, आणि त्याच्याकरतां

अनेक दुःखें भोगणें. श्रीउवा. ४. २३. ३६६

थोडीफार विषमवस्तूंची बाजू मिळाली, तर तेवढ्यापुरतें सुख, तें बोलून चालून नाशवंत असल्यामुळें कांहीं कमी होऊं लागलें, किंवा नाहींसें होऊं लागले म्हणजे दुःखप्रसंग. श्रीउवा. १. २. २९

मनुष्यशरीराकरितां चौऱ्यांशीं लक्षाला एक कमी इतक्या विषय-वस्तूंपैकीं कोणत्याहि विषयवस्तूंचे मनुष्यशरीरांत परमेश्वर अवस्थेनें असलेले जे आपण, त्या आपल्याकडून जोंपर्यंत ग्रहण केलें नाहीं तोंपर्यंत ईश्वर व आपण शुद्धरूपांनीं एकच असतों. श्रीउवा. १. १. २४

केव्हांहि वासना वाढविणारी कोणतीही फालतू भोग्य विषयवस्तु प्रसंगानें समोर येऊं लागली तर त्याकडे दुर्लक्ष करण्याची हळुहळू संवय वाढवावी. श्रीउवा. १. २. ३६

*

## वस्तुसंग्रह

शरीर रक्षणापुरतांच अशा वस्तूंचा कारणापुरता संग्रह ठेवावा.
श्रीउवा. १. २. ३६

*

## वस्तु संग्रह

ज्यावांचून अडत नाहीं, अशा कोणत्याहि विषयवस्तूंचा जवळ संग्रह ठेवूं नये. श्रीउवा १. २. ३६

रक्षणापुरताच अशा वस्तूचा कारणापुरता संग्रह ठेवावा.
श्रीउवा. १. २. ३६

परमेश्वराशीं ऐक्यत्वाला अडथळा आणणाऱ्या व जीवाला व मनाला लालचींत पाडणाऱ्या, व संसार-प्रपंचाचे अनेक भयंकर दुःखाला कारणीभूत असे दोष वाढविणाऱ्या अशा मुख्य मुख्य विषयवस्तूंची आपल्या मुलांमुलींना आईबापांनीं ओळखच होऊं नये अशी व्यवस्था ठेवली म्हणजे झालें. श्रीउवा. १, २. ४१

अनेक विषयवस्तूंचा आत्म्याशीं योग आल्यामुळें मन, बुद्धी, अहंकार यांना अत्यंत चांचल्य येतें. श्रीउवा. १. ४२. ४०

बाह्यविजातीय विषयवस्तूंचे संस्कार जे अंतर्यामीं वांझेसारखे फालतू वाढले आहेत ते सदसद्विवेकरूपी कुठारानें छाटले गेले पाहिजेत.
श्रीउवा. १. ९. १५७

एक शुद्ध आनंदाच्याच चौऱ्यांशीं लक्ष विषयवस्तु झाल्या.
श्रीउवा. १. २. ३१

हल्लींच्या परिस्थितींत लोक समाजाची प्रवृत्ति पूर्वीप्रमाणें सद्धर्मानें वागून स्वतंत्र रीतीनें उद्धार करून घेण्याची राहिली नाहीं; म्हणून त्या लोकांचा ज्या ज्या उपभोग्य विषयवस्तूंत जीव अडकलेला असतो, त्या त्या विषयवस्तूच सत्पुरुषाच्या सान्निध्यांत आपोआप येत जाऊन त्यांत अडकलेले जे जीव ते सत्पुरुषांच्या शरीराद्वारें सहज रीतीनें उद्धरून जातात. श्रीउवा. ५. ६. १०६

कागद जसा गोंदानें चिकटतो, तसें आपण सत्पुरुषास भावभक्ति-सहित प्रेमानें, मनानें चिकटावें, विषयवस्तूंमध्यें चिकटलें तर हावरेपणा वाढतो व तेंच प्रेम सत्पुरुषास दिलें तर आपण वासनारहित होऊन सद्रूप होऊन जातों. श्रीउवा. ४. २०. ३३६

डोळ्यांत जी आपली ज्योति आहे ती ज्ञानज्योति आहे, व बाहेरील विषयवस्तूंतहि ज्ञान ज्योतीच आहेत. त्या दोन्ही ज्ञानज्योतींचें, ऐक्य होईल तेव्हांच विषयवस्तूंचा पूर्ण बोध होईल. श्रीउवा. ४. १. १८

विषय साकार आहेत, त्यांचें ग्रहण निराकारानें होत नाहीं.

श्रीउवा ४. ९. १८२

ज्यांच्या विषयवस्तु अर्पण झाल्या, त्या वस्तूंबरोबर त्यांचे अशुद्ध जीव तेहि इकडेच आले. श्रीउवा. २. ९. १५६

★

## वेदमंत्र

खऱ्या ब्रह्मपदाच्या प्राप्तीला अंधश्रद्धेची गरज आहे. गायत्रीमंत्रांतील शब्द किंवा अक्षरें, किंवा सर्व वेदमंत्रांतील शब्द किंवा अक्षरें हींच सर्व मूर्तिमंत ब्रह्मरूपच आहेत. शिवाय ' गायत्री छंदसामहम् " या गीतेच्या वाक्यावरून गायत्रीमंत्र हें प्रत्यक्ष भगवंताचेंच स्वरूप आहे. पूर्ण परब्रह्माचे अगदी अगोदरचे मुख्य आकार वेदमंत्रांतील " ॐ " " अ " वगैरें शब्दाक्षरें हेच आहेत. श्रीउवा. १. ६. १०२

वेदमंत्र जितके गुप्तांत गुप्त राखले जाऊन, विधियुक्त नियम राखून, ब्राह्मण लोक जर त्याचा उपयोग करीत राहतील तर त्यापुढें शब्दार्थाची किंमत मुळींच नसते; व त्या अर्थाचा उपयोगहि नसतो. खरें जें परब्रह्मपद त्याचीच प्राप्ति होऊन जाते. श्रीउवा. १. ६. ९९

हल्ली वेदमंत्रांपासून उपयोग होत नाही. त्याचें कारण, पूर्वीचे ऋषिवर्य हे प्रथमतः अंधश्रद्धेनेंच वेदपठण करून तपश्चर्यादिक स्वधर्माचरणानें वागत होते म्हणून आपोआप त्यांच्या हृदयांत जो अर्थ उमटूं लागला त्यायोगें ते तर ब्रह्मरूप होऊन गेले. परंतु जो अर्थ हृदयांत आपोआप प्रगट होऊं लागला, तो खरा अर्थ त्यांनीं लिहून ठेवला.

श्रीउवा १. ६. ११७

वेदाचा किंवा भगवद्गीतेसारख्या ग्रंथांचा खरा अर्थ समजणें म्हणजे

त्या अर्थाप्रमाणें बनूनच जाणें; व आतून बाहेरून जो पूर्ण बनला गेला त्यालाच खरा अर्थ समजला असें होतें. श्रीउवा. १. ५. ८८

वेदांच्या सर्व मंत्रांचा गूढार्थ किंवा बाह्यार्थ याचा कोणत्याहि प्रकारें विचार न करतां त्या मंत्रांत काय अर्थ आहे व कशासाठीं ते मंत्र आहेत, त्यासंबंधीं वाटाघाट किंवा खोल उंथळ न पहातां केवळ शुचिर्भूत राहून, आणि वेदाच्या ग्रंथांनाही पवित्र स्थितींत ठेवून ब्रह्मचर्यादि व्रत पाळून व्रतस्थ नियमानें आमरणांत केवळ नित्य सांगोपांग वेदपारायणांतच ज्या ब्राह्मणांनीं शेवटपर्यंत काळ घालविला, ते ब्राह्मण सर्वसाधारण ब्राह्मणासारखे समजूं नयेत. ते खरे भूदेवच म्हणजे पृथ्वीवरचे देवच ते.
श्रीउवा. १. ४. ६१

जर आपण त्या ग्रंथांचे अर्थ समजून घेण्याच्या भानगडींत पडूं लागलों तर, मनाची चंचलता तर वाढतच जाते आणि त्यांतील खरें वर्म न समजता, मनुष्य बुद्धीला अनुसरूनच त्याचें तसें वर्म ठरवूं लागतो.
श्रीउवा. १. ४. ६४

अघटित शक्ति, तीच परमेश्वरी शक्ति, व जी परमेश्वरी शक्ति गुप्त शक्ति, त्या गुप्त शक्तीच्या प्राप्तीसाठीं, ती गुप्त विद्या कोणती तर चार वेद. श्रीउवा. १. ४. ७१

चारी वेद, हे सर्व प्रकारच्या ऐहिक व पारलौकिक खऱ्या सुखाचें मुख्य भांडवल किंवा मुख्य साधन आहे. श्रीउवा. १. ४. ७१

हें केवळ परमेश्वराचें जें जें कांहीं गुप्त आहे तें गुप्तपणें राखल्यानें व वेदाच्या अर्थाचें उद्घाटन न करतां, केवळ वेदाक्षरें हृदयांत कायम करीत गेलें, त्यायोगानेंच प्रभाव प्रगट होत होता, व पूर्ण बनल्यावर आपोआप प्रयत्न न करतां जो अर्थ हृदयांत प्रगट होतो तोच खरा अर्थ.
श्रीउवा. १. ५. ८१

त्यांचा अर्थ न करितां, त्यांचे नियम पाळून ते वेदमंत्र हृदयांत कायम

ठेवणें, व त्यांना गुप्त राखणें ह्याच त्यांचा मुख्य पहिला उपयोग व तसें गुप्तपणें ठेवण्यांतच जगाला उपयोग आहे. श्रीउवा. १. ५. ७७

*

## सहन–शक्ति

निंदा करणारे, मत्सर करणारे, उगीचच्या उगीच द्वेषाचीं कारणें उत्पन्न करणारें, उगीचच्या उगीच कांहीं तरी कुरापत काढून त्रास देणारे असे निरनिराळ्या स्वभावाचे जे लोक असतात, तेच सहन करण्याच्या व निरभिमान होण्याच्या अभ्यासाचीं मुख्य पुस्तकें आहेत.

श्रीउवा. २. १. १२

तो मुसलमान झाला, सहन करण्याच्या व निरभिमान होण्याच्या अभ्यासाचें त्या महाराजांचें मुख्य पुस्तक. श्रीउवा. २. १. १३

ज्याला परमपदाची, अखंड परमेश्वरी सुखाची, खऱ्या ब्रह्मसुखाची प्राप्ति करून घेणें असेल, त्यानें सर्वप्रकारें स्वधर्माच्या योगें मानसिक सहनशक्ति वाढविण्याचा अभ्यास केला पाहिजे. श्रीउवा. २. १. १५

परंतु मानसिक त्रास हा सर्व प्रकारें सहन करतां आला पाहिजे.

श्रीउवा. २. १. २

पण खऱ्या आनंदाचा लाभ " जसें असेल तसें " ह्या मंत्रांतच आहे. कसेंहि असलें आणि कसाहि प्रसंग असला, त्यांतच नेहमीं समाधानी वृत्तीनें वागणारें, त्यांनाच ऐहिक आणि पारलौकिक खऱ्या ईश्वरी सुखाचा व आनंदाचा लाभ मिळतो. श्रीउवा. २. २. ३१

मंत्र म्हणजे सद्विचार. ज्या शब्दानें सद्विचार होईल, तो मंत्र. मी जसें म्हणतों तसें जीवानें बनून जा. मला कोणीतरी मंत्र दिला

असेल, तसा तुला देतो; तों मंत्र असा " जसें असेल तसें " यांत कांहीं फरक करूं नये. श्रीउवा. २. २. ३०

तर परमेश्वरासाठीं आपला किंवा आपल्या परिवारांतील कोणाचाहि कोणत्याहि प्रकारें अपमान होत गेला; किंवा परमेश्वरासाठींच कोणत्याहि प्रकारें नुकसानी होत गेली; किंवा परमेश्वरासाठीं आणखी कोणत्याहि प्रकारांनीं त्रास किंवा कष्ट होत गेले; व त्या नुकसानीचा अपमानाचा किंवा कष्टाचा जर आपण आनंदानें स्वीकार करीत गेलों, म्हणजे परमेश्वराच्या बाजूनें चढण्याची व उताराची स्थिति होते.

श्रीउवा. ४. २३. ३६७

देवाजवळ त्याची कीर्ति वाढावी; तरच माझें त्याच्यावर खरें प्रेम आहे असें होईल. मी त्याला नेहमीं त्रासांत, अपमानकारक हलक्या स्थितींत ठेवण्याचा प्रयत्न करतो व तोहि तें सहन करतों असें जितकें जितकें तो सहन करील, तितकी त्याच्यावर परमेश्वरी कृपा होण्याची वेळ जवळ आली आहे म्हणून समजावें. श्रीउवा. ३. २३. ३७०

कोणतेंहि ऐहिक सुख, संसारसुख, जगापैकीं व्यावहारिक सुख, अशांपैकीं कोणतेंहि सुख व त्याकरतां निरनिराळ्या अनेक वासना वाढवून कोणत्याहि सुखासाठीं नाना प्रकारें व्यवहार, उद्योग, खटपट करणें वगैरे, या सर्व गोष्टींविषयीं इच्छारहित असून कोणतेहि करण्यांत उदास जो असतो, म्हणजे यदृच्छेने, अनायासें, सहजासहजीं, स्वतःसंबंधीं बऱ्यावाईट, सुखकारक किंवा दुःखकारक ज्या गोष्टी घडतील, त्यांत कांहीं फेरबदल न करतां " जसें असेल तसें " या स्थितींतच नेहमीं समाधान मानून जो राहतो, त्याचे ठिकाणीं सात्त्विक गुणांचीं लक्षणें आहेत असें समजावें व हीं लक्षणें ज्याच्यांत असतात, तो देवासारखा असतो.

श्रीउवा. १. १७. २३२

सहनशक्तीची परिसीमा कोणती ? तर कसाहि दुःखप्रसंग आला तरी

बळें होऊन सहन न करतां आपोआप तें सहन होतच राहतें. म्हणजे सहन करण्याकरितां कोणत्याहि प्रकारें मानसिक क्रिया सुरूच होत नाहीं. कोणताहि विचारच येत नाहीं, सहनाच्या बाजूनें वृक्षपाषाणवत् मनाची स्थिति होते. श्रीउवा. १. ९. १५९

जसजसें शरीराचें दुखलें खुपलें पहावें, लाड कौतुक करावें, तसतसें आपल्या स्वतःला, जीवाला, मनाला, दुःखांत पडावें लागतें.

श्रीउवा. २. २९. ४९४

मनुष्य अवस्थेंत मुख्य मानसिक सहनशक्तीची जरूरी आहे.

श्रीउवा. ४. १९. ३२८

म्हणून होईल तोंपर्यंत प्रत्येक मनुष्य म्हणवणाऱ्यांनीं स्वाभाविक दुःख असो, किंवा आपल्या दुष्ट कर्माचें फळ म्हणून तें दुःख असो; तें दुःख मानसिक असो वा शारिरिक असो; तें प्रथम सहन करण्याचाच निश्चय करावा. श्रीउवा. ४. ४. ६८

म्हणून वाटेल तेव्हां यावें व वाटेल तेव्हां जावें. त्रास होईल तो सोसावा. सुखदुःखाचे आघात जगांत होतच असतात; म्हणून हर्ष-विषादाला धरून कशीहि स्थिति असली तरी घाबरूं नये.

श्रीउवा. ४. २७. ४०४

ज्या ठिकाणीं पूर्ण ज्ञान, तेथें सहनशक्ति; व जेथें पूर्ण सहनशक्ति तेथेंच पूर्ण ज्ञान. श्रीउवा. ४. १९. ३२८

सर्वांपेक्षा पाषाणांत सहनशक्ति जास्त आहे व ते गुणधर्म माणसांत येण्याकरितां दगडाच्या मूर्तींची पूजा करण्याची वहिवाट आहे, दगडाचे गुणधर्म ज्यांच्यांत येतात, तेहि पूजेला अधिकारी होतात.

श्रीउवा. ४. १९. ३३०

जे शहाणे आईबाप असतात, ते मुलांना तशी संवय करवितात. परंतु आतां सर्वच उलट झालें आहे, लहान मुलांच्या ठिकाणीं असलेली

सहनशक्ति कमी करण्याची आईबाप खटपट करतात.
श्रीउवा. ४. १९. ३२९

मनुष्यजन्मांतील अनेक कर्तव्यांत सहनशक्ति वाढविणें हें एक मुख्य कर्तव्य आहे.
श्रीउवा. ५. १२. २१८

सहनामध्यें एवढी विलक्षण शक्ति आहे कीं, त्याच्यापुढें ब्रह्मदेवसुद्धां कांहीं करूं शकत नाहीं.
श्रीउवा. ५. १२. २१७

कोणाहि सत्पुरुषानें अधिकारपरत्वें कोणालाहि निरनिराळ्या प्रकारानें उपदेश केला व वागणारा त्याप्रमाणें वागला, तरी त्याच्या त्या वागणुकीच्या बुडाशीं व अखेर सहनाची जरूरी आहे.
श्रीउवा. ५. १२. २९३

खरोखर सत्पुरुषाकडे जाऊन कांही उपदेश घ्यावयाचा असेल तर तो सहनाचाच घ्यावा.
श्रीउवा. ५. १२. २१७

आपण जसजसें सहन वाढवीत जातों, तसतसा परमेश्वर त्या सहनरूपानें आपल्या शरीरांत वास करून राहतो.
श्रीउवा. ५. १२. २१२

संन्यासांत सर्वच सोडलें जातें. सर्व सोडून सहनालाच जवळ बाळगावें लागतें.
श्रीउवा. ५. १२. २॥

म्हणून स्त्रियांपासून कोणतीहि वासना येऊं लागली तरी ती सहन करण्याचा अभ्यास करीत जावा. अशा रीतीनें आपल्या स्त्रीच्यायोगें परमेश्वराशीं होणारा जो योग त्यालाच म्हणावें खरा योगाभ्यास.
श्रीउवा. ५. ९. १६६

*

## स्त्री

स्त्री-जाति, ही ऐहिक सुखाच्या उपभोगांसाठीं नाहीं, तर स्त्री धर्माची

विद्या त्यांना शिकवून, त्यायोगें हजारों पुरुषांनीं खऱ्या ईश्वरी सुखांत जाण्याकरितां आहे. श्रीउवा. १५. २६१

*

## साईबाबा

साईबाबा या मंडलाबाहेर गेलेले होते. त्यांनीं स्त्रीत्व पत्करलें होतें व सूर्यमंडळाची बनावट त्यांना माहीत होती. ते स्वतः स्त्री धर्माप्रमाणें वागत होते. स्वतः हातानें स्वयंपाक करून दुसऱ्यांस खाऊं घालीत होते, आपल्या हातानें भाकरी इत्यादि पाक करून खाऊं घालीत असत. अशी त्यांची पद्धत होती. श्रीउवा. १६. २७९

अशी सद्बुद्धि सरकारचे ठिकाणीं उत्पन्न व्हावी व त्याचें सर्व श्रेय सरकारकडे येऊन जगाच्या व सरकारच्या खऱ्या कल्याणाला सरकारच निमित्त व्हावें. श्रीउवा. ५. २७. ४१७

*

## सत्पुरुष

असें जर आहे तर रजोगुणी क्रियाकर्तृत्वव्यवहार स्त्रियांच्या माथीं मारून त्यांचे ठिकाणी असलेली स्वाभाविक सात्त्विक ईश्वरी शक्ति व कन्यापण हें नष्ट करून स्त्रियांचें व पुरुषांचें नुकसान करण्यास पुरुषांनीं कशाला पुढाकार घ्यावा, व स्त्रियांनीं तरी काय म्हणून असें पापाचें भांडवल आपल्या पदरीं सांठवावें ? हे ज्याचें त्यानें धोरण पहावें.

श्रीउवा. १. १३. २०६

## संसार

संसार प्रपंचादिक व्यवहार हा बोलून चालून खोटा आणि असत् आहे तो नाहींसा होऊन जाईल; आणि सत्कर्माच्या योगें परमेश्वरी संबंध हा खरा आणि सत् आहे तो राहून जाईल जो कायम असतो.

श्रीउवा. ४. ३०. ४४८

*

## स्वप्न

जें पहिलें असेल अनुभविलेलें असेल त्याचेंच स्वप्न पडतें, असा सिद्धांत आहे; न पाहिलेल्याचें व न अनुभविल्याचे स्वप्न पडत नाही. स्वप्न म्हणजे एक प्रकारचे पूर्वी पाहिलेल्या किंवा आपल्या हातून झालेल्या किंवा पूर्वीं अनुभव घेतलेल्या गोष्टींचे स्मरण. श्रीउवा. ३. १२. १९२

स्त्रिया या कामवासना वाढविण्यासाठी किंवा त्या पूर्ण करून घेण्यासाठीं नाहींत तर स्त्री हें कामवासना सहन करण्याच्या अभ्यासाचें मुख्य साधनच आहे. श्रीउवा. ५. ९. १६६

खास परमेश्वराची प्राप्ति, अखंड सुखाची जागासुद्धां आपल्याजवळ असलेलें ते सहनच मिळवून देतें. श्रीउवा. ५. १२. २१०

हें सहन ज्यावेळीं त्तम काम करूं लागतें त्यावेळीं त्याहून उत्तम काम दुसरें कोणीहि करूं शकत नाहीं. श्रीउवा. ५. १२. २११

आपल्याला कोणत्याहि अडचणी आल्या तरी त्याचा त्रास सोसावा. संन्यास घेऊन हाच तर अभ्यास करावयाचा. श्रीउवा. ५. १२. २०८

म्हणून चैतन्य किंवा जड वस्तु जी आंपल्या जीवाची किंवा प्रेमाची

असेल, ती अर्पण केली म्हणजे आपण अर्पण झाल्यासारखेंच आहोंत.
श्रीउवा. ५. ११. १९९

याप्रमाणें सहनपणा व अभिमानरहितपणा या दोन अवस्था ज्याच्याजवळ आहेत, तोच खरा नारी व खरा नरवीर, व तोच खरा ईश्वरी अखंड सुखाचा अधिकारी समजावा. श्रीउवा. ४. १. ४

*

## संसार

आळवाच्या किंवा कमळाच्या पानावर जसें पाणी ठरत नाहीं, व जरी ठरलें तरी मौक्तिक बिंदूसारखी त्याची शोभा त्या पानाला जास्त शोभिवंत करते; तसा आपला संसार आपल्यास न बाधतां, जास्त शोभिवंत होतो. श्रीउवा. १. २१. ३१४

सांसारिक दोष आपल्यास लागूं नयेत, त्यांचा संबंध परमेश्वराशीं लावून दिला जावा, म्हणून देवळें करून राम, कृष्ण किंवा शंकर यांच्या मूर्ति बसवितात. श्रीउवा. १. २१. ३१३

सासूच्यायोगें सून आणि पुत्र दोघांनाहि सहन करण्याचा अभ्यास पूर्ण व्हावा, या हेतूनें ईश्वरी संकेतानें अशी व्यवस्था आहे.
श्रीउवा. २. १. १४

सून व पुत्र यांच्यायोगें आपला उद्धार व्हावा, यासाठीं ती सासू क्षुल्लक कारणावरून पुष्कळ प्रकारानें तिचे ठिकाणीं सहनशक्तीचा अभ्यास वाढावा म्हणून हृदयाला लागणाऱ्या अशा शब्दानें टोचीतच राहते, व आपल्या बायकोला आपली आई त्रास देते.
श्रीउवा. २. १. १४

अशा रीतीनें परमेश्वराशीं जोड जोडण्यासाठीं स्वधर्मपालन करून

निरनिराळीं परमेश्वरी सत्कर्में करीत करीत जे संसार करतात, तेच खरे संसारी.
श्रीउवा. ५. ३०. ४५१

जन्म घेणें म्हणजे या दुःखकारक अशा भवसमुद्रांत पडणें.
श्रीउवा. ५. ३०. ४५१

*

## सिद्धपुरुष

पूर्ण बनलेले सत्पुरुष ते तरी सर्व प्रकारें बऱ्यावाइटाच्या अभिमानापासून रहित होऊन, सर्वांपेक्षां अगदीं हीन-दीन अवस्था त्यांचे ठिकाणीं स्वभावतःच येऊन बसलेली असते—म्हणूनच दुःख उत्पन्न करणाऱ्या अभिमानाचा नाश करण्यासाठीं लोकसमूह त्यांच्याकडे येत असतो.
श्रीउवा. ४. ४. ६५

ज्यांचें कोणत्याहि प्रकारें वैराग्य नष्ट होत नाहीं, किंवा लोभ वाढवून वाढत नाहीं, आणि ज्यांच्यावर पूर्ण सद्गुरुकृपा होऊन सर्व जग त्यांना नीरस झालें, अशा बनलेल्या सिद्ध सत्पुरुषाकडे तुम्हीं कांहींहि दिलें व कसेंहि केलें तरी ती गोष्ट निराळी. त्यांच्या संबंधांत दोष नाहीं.
श्रीउवा. ५. ५. ८२

त्यांच्या ठिकाणीं स्त्री, धनादिक विषयवस्तु ज्या आपोआप जमतात त्या वस्तु व त्यांच्या द्वारें त्या ज्यांच्या असतील तेही सद्गतीला जातात. याबद्दल कोणी तर्ककुतर्क करणारे असतील तर त्यांनीं खुशाल करीत बसावें.
श्रीउवा. ५. ६. ९५

सर्व कांहीं आपोआप येतें व आपोआप चाललें जातें.
श्रीउवा. ५. ६. ९३

मग त्या लोहचुंबकासारख्या राजविलासी सत्पुरुषांच्या शरीराच्या

द्वारें परमेश्वरी अवस्थेंत जे जे स्त्रीपुरुषांचे जीव जातात, ते जातां जातां कांहीं काल त्या सत्पुरुषांच्या शरीराच्या द्वारें बाह्य राजविलासी सुखोपभोगाचा अनुभव घेतात. श्रीउवा. ५. ६. १०१

पूर्ण बनलेले सद्गुरु मौन आणि ब्रह्मचर्य याच साधनानें, त्या परब्रह्माचा सहवास वाढवून तसे बनलेले असतात व त्यांचें अंतःकरण लोण्याप्रमाणें किंवा ओल्या चिखलाप्रमाणें मृदु बनलें गेलें असल्यामुळें जसा प्रसंग असेल त्याचप्रमाणें त्याचें सहज रीतीनें वळण वळलें जातें.

श्रीउवा. ४. ८. १५१

कारण मी कोणाकडून जाऊन पैसे घ्या असें आजपर्यंत कोणाला सांगितलें नाहीं, व तसें सांगण्याचा माझा स्वभावच नाहीं.

श्रीउवा. ५. ५. ८७

एकच आनंदघन जो परमात्मा, तो ईश्वर, जीवात्मा, अहंकार, मन, चित्त, बुद्धि इत्यादि रूपानें नटून मनुष्यरूपानें ऐहिक सुख-दुःख भोगून, पुनः सद्गुरुकृपेनें मनुष्य देहांतच परत स्वस्वरूपाचा अनुभव घेत अखंड सुखांत कसा रममाण होतो, हें ध्यानांत येईल. या चैतन्य स्वरूपाची ओळख करून घेण्यासच "ज्ञान" म्हणतात.

श्रीउवा. २. १०. १७८

अशा रीतीचा पूर्ण बनलेला सत्पुरुष, ज्याला सांपडला असेल त्यानें त्यालाच सद्भाव बुद्धीनें धरून ठेवावें. श्रीउवा. २. १०. १७९

आणि येथें ह्या पिंजऱ्यांतच जर कोणाची तशी भावना असेल तर मीच सर्व कांहीं आहे असें पक्कें समजून घ्यावें. श्रीउवा. २. १०.१७९

हें मी माझ्या स्वतःच्या आंत बाहेर सर्व पूर्ण अनुभवांनीं सत्य सत्य सांगतों. श्रीउवा. २. १०. १८०

सत्पुरुष असेहि नसतात व तसेहि नसतात. 'जसे असेल तसे' असतात. श्रीउवा. २. ३. ४५

त्यायोगें तो मनुष्य कितीहि लांब असला, तरी त्या सत्पुरुषानें केलेल्या प्रयोगाप्रमाणें त्याच्या हृदयांत एकदम प्रेरणा होऊन तशी त्याची बुद्धिहि होऊन तसा तो करूं लागतो, किंवा वागूं लागतो वगैरे; परंतु ही गोष्ट फारच जरूर असेल तरच सत्पुरुष करतात. श्रीउवा. ३. ३. ५१

संसारांत वंशाला दिवा उत्पन्न होण्यासाठीं, एक बायको करून घ्यावी लागते, तसें परमार्थासाठी सत्पुरुषास बायको बनवाल, तर ती जेथें, तेथें तुम्ही. श्रीउवा. ३. ३. ५५

एखादा पूर्ण सत्पुरुष असतो तो जोंपर्यंत एकांतवासांत असतो, त्याचा विशेष परिचय जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत लोकहि त्याचेविषयीं विशेष आदरबुद्धीनें वागतात. पूज्यभावहि पुष्कळ असतो. असा जोंपर्यंत तो सत्पुरुष एकांतावस्थेंत राहतो, तोंपर्यंत बहुतेकांची पूर्ण श्रद्धा, पूज्यभाव असून शेंकडो जणांना उपयोग होऊन फायदेहि पुष्कळ होतात.

तथापि त्या सत्पुरुषाचे ठिकाणीं असलेला सत्पुरुषपणा किंवा त्याचे ठिकाणीं असलेलें अघटित गुप्त सामर्थ्य, तें कांहीं कमी होतें असें नाहीं; तें त्यांचें जसेंच्या तसेंच असतें, परंतु मनुष्याच्या प्रसंगामुळें त्यांचा उपयोग, अतिपरिचयामुळें, लोकांना कमी झाल्यासारखा भासतो. श्रीउवा. १. ६. ११९

हल्लींच्या लोकसमाजांत बहुतेक पुरुषांचा जीव स्त्रिया आणि धन यांच्यातच लागून, त्यांच्याविषयीं हांवरेपणा धरून उपभोक्तेपणा वाढला आहे. मग पुरुष जातीच्या जीवाला जर सत्पुरुष आकर्षित करूं लागले, तर त्या पुरुषांचे जीव त्या स्त्री, धन व बाह्य विषयवस्तूंमध्यें शेकडों जन्मापासून पक्के अडकलेले असतात; म्हणून केवळ पुरुषांच्याच जीवांचें आकर्षण करणें फार कठीण जातें; किंबहुना अशक्य होऊन बसतें आणि त्यांचे जीव तर उद्धारगतींत गेलेच पाहिजेत. मग त्यांचा जीव स्त्रिया व

धन यांत अडकला असल्याकारणानें त्या विषयवस्तु आपोआपच सत्पुरुषाकडे खेंचल्या जातात. श्रीउवा. ५. ६. १०६

जसजसे लोक जमतील त्यांच्या कर्मानुसार त्यांच्या चेष्टा होऊं लागतात; व्यवहार होऊं लागतात. सत्पुरुष फत्तरासारखे किंवा निश्चल पाण्यासारखे असतात. त्यांचे ते व्यवहार नसतात. परंतु तुमच्या कर्माचा क्षय होण्यासाठीं, तुमचीं कर्में ब्रह्मरूप होण्यासाठीं तीं कर्में त्यांच्यावर पडून त्यांना चलनवलन करण्यास लावितात.

श्रीउवा. ४. २१. ४०८

त्यानें कोणतीहि वस्तु दिली तरी ते तिचा अंगीकार करतात. त्याची वस्तु सत्पुरुषानें खाल्ली कीं त्याला आनंद होतो, कारण सत्पुरुषांच्या तोंडानें त्याच्याच जीवानें खाल्लें असें होतें. श्रीउवा. १. २० ३०२

तसाच सद्गुरु ज्याचा जसा अधिकार असेल त्याप्रमाणें त्यांना सोप्या व जवळच्या रस्त्यानें ईश्वराच्या बाजूस वर घेऊन जातात.

श्रीउवा. ३. ३१. ४१९

धनदारादि ज्या विषयवस्तु त्यांच्याविषयीं इतर व्यवहारी मनुष्य आसक्त बुद्धीनें लुब्ध होऊन त्यांचा उपभोग घेतात. जे पूर्ण योगी असतात, जे महापुरुष असतात, ते स्वतः सिद्ध विरागी म्हणजे विरक्त, विषयवस्तूविषयीं प्रेमरहित असे असल्यामुळें त्यांच्याकडे जे धनदारादिक विषय आपोआप येतात, ते ज्यांच्याकडून येतात, त्यांच्या उद्धारगतीसाठीं, सद्गतीसाठीं, केवळ आपल्या शुद्ध अशा योगदृष्टीनें त्या वस्तूंचा त्या महापुरुषांकडून स्वीकार केला जातो; व तसें करणें भाग पडतें. श्रीउवा. ५. ४. ६६

असे पूर्ण सत्पुरुष स्त्रीधनादिकांचा सामान्य पुरुषांप्रमाणें संसारी रीतीनें दुरुपयोग करतात अशी अज्ञान, संसारांत लंपट अशा पुरुषांना कल्पना येणें साहजिक आहे; परंतु तो समज साफ चुकीचा असून अशी दुष्ट कल्पना करणारे महाघोर पाप करीत आहेत असें समजावें, तशा महा-

पुरुषांची व संसारी पुरुषांची पूर्ण उलट सुलट दिशा असते. त्या महापुरुषांच्या सहवासांत स्त्रिया, धन इत्यादि कोणत्याहि विषयवस्तूंचा कितीहि समाज वाढला तरी, त्यांचा त्या महापुरुषांवर कोणत्याहि प्रकारें मनुष्यासारखा परिणाम न होतां त्या महापुरुषांच्या ब्रह्मरूप अवस्थेचा परिणाम त्यांच्यावर होऊन ते व त्यांचा परिवारहि ब्रह्मरूप अवस्थेंत जातात. श्रीउवा. ५. ४. ५८

तसेंच संसार, प्रपंचांत, व्यवहारांत निमग्न झालेले, अनेक प्रकारें वासनाबद्ध झालेले, कुत्सित बुद्धीचे, अनेक पापाचरण केलेले, श्रद्धाळू किंवा अश्रद्ध असे संसारी व्यवहारी स्त्रीपुरुष ते कोणत्याहि प्रकारें जगरीतीप्रमाणें व्यवहार करूनहि जर सत्पुरुषाच्या सहवासांत असतील तर तेहि वरील उदाहरणाप्रमाणें सद्रूप होऊन जातात. हा सिद्धांतच आहे. श्रीउवा. ५. ४. ६९

जगांतील सर्व लोक जगाच्या रीतीनें द्वैत अवस्थेंत वागणारे असतात; पण त्यांपैकींच जन्मोजन्म अभ्यास करून जो सद्गुरु अवस्थेंत आलेला असतो, तो द्वैत अद्वैताच्या बाहेर जाऊन खऱ्या शिष्य अवस्थेंतील अखंड सुखानुभव घेत रहातो. श्रीउवा. ४. ५. ८३

सुखाची अवस्था किंवा दुःखाची अवस्था है सत्पुरुषांचे पाटच असतात. ते न सुखी न दुःखी, न श्रीमंत न गरीब. श्रीउवा. ५. १०. १८३

सत्पुरुषांची अवस्था दोन प्रकारची पाहण्यांत येते. एक सुखरूप अवस्थेंतील सत्पुरुष व दुसरा दुःखरूप अवस्थेंतील सत्पुरुष. सत्पुरुषाची सेवा करण्याचें महत्त्व आहेच. पण त्यांतहि दुःखरूप अवस्थेंतील सत्पुरुषाची सेवा करण्याचें महत्त्व फार आहे. श्रीउवा. ५. १०. १८२

आपलें मनुष्यपण जेथें पचेल तेथें तें टाकीत रहाणें हा एक उपाय आहे. तें परमेश्वराच्या ठिकाणींच टाकलें जाईल व तेथेंच तें पचेल; म्हणून नेहमीं

परमेश्वराचा, सत्पुरुषाचा सहवास करावा. श्रीउवा. ५. ९. १७६

महात्मा किंवा ज्याला तुम्हीं सत्पुरुष म्हणतां तो पूर्ण अभागी असतो, जेथें पूर्ण अभागीपण दिसेल तेथें सत्पुरुष जाणावा.

श्रीउवा. ३. ८. १३३

साबणाचें काम मैला हरण करण्याचें असतें. तसेंच सत्पुरुषाचें काम मळ घेण्याचें आहे. श्रीउवा. २. ९. १५०

सत्पुरुष साबणाप्रमाणें आत्म्याचा मळ नाहींसा करतात व जसजसा मळ हरण होत जातो, तसतसा आत्मा उज्ज्वल होत जातो व मग आत्मदर्शन होत जातें. श्रीउवा. २. ९. १५१

आतां आपल्याला आत्म्यावरचा मळ काढण्याचा साबण स्वधर्माचरण, ईश्वर भजनपूजनादिकांच्या योगें स्वतःस बनतां येईल, तर स्वतःच बनावें; तसें बनतां येत नसेल, तर ज्यांची योग्यता आत्म्यावरील मैला काढून घेण्याची असेल, अशा सत्पुरुषांकडे गेलें पाहिजे.

श्रीउवा. २. ९. १५३

या रीतीनें आत्मा स्वच्छच आहे, त्यांत कांही मिसळत नाहीं. पण तेलाप्रमाणें जन्मजन्माची घाण वर सांचली आहे, ती सत्पुरुषाच्या द्वारें एकवार पूर्ण निघाली म्हणजे फिल्टर झालेलें पाणी, व शुद्ध झालेलें सोनें तें जसें शुद्ध पाण्यांत व शुद्ध सोन्यांत मिसळलें जातें, तसेंच सत्पुरुषांचा व आपला आत्मा एकच होऊन खऱ्या आत्मदर्शनाचा व आत्मानंदाचा लाभ होऊन जातो.

श्रीउवा. २. ९. १५५

आत्मा स्वच्छ होण्यासाठीं सत्पुरुषाकडून होणारे अश्रद्धादिकांचे त्रास सोसून भक्तांनीं सत्पुरुषांचा सहवास सोडूंच नये, व सत्पुरुषहि स्वतः पूर्ण झाले असल्यामुळें लोकांकडून निंदास्तुतीची पर्वा न करितां जगाच्या व भक्तांच्या कल्याणासाठीं अश्रद्धा उत्पन्न करण्याचे उपाय करीतच राहून

भक्तांना कसोटीस उतरविण्याची गुप्तपणें तयारी करीत राहतात
श्रीउवा. २. ९. १५८

जसें घाणेरडें पाणी सूर्यनारायणाच्या द्वारें स्वाभाविक रीतीनें शुद्ध होऊन पावसाच्या रूपानें पडून तुमची तृषा शांत करतें, तसें तुमच्या पापरूप वस्तु, स्वाभाविक रीतीनें पुण्यरूप करतात. श्रीउवा. २.९.१५९

परंतु पापी लोकांना जसजसा पुण्यपुरुषाचा अधिक सहवास वाढेल, तसतसें त्याचें पाप नष्ट होऊन सद्‌बुद्धि व पुण्यबुद्धि उत्पन्न होते. म्हणून दुष्ट बुद्धीचे, द्वेषबुद्धीनें वागणारे, मत्सर करणारे, व पापाचरण वाढविणारे असे जे कोणी असतील, त्यांच्या त्या पाप-स्वभावाला अनुसरून पुण्यपुरुष, सत्पुरुष, परमेश्वर यांचा सहवास करण्याची जरी त्यांना इच्छा होत नसेल, तरी त्यांनीं बळें होऊन परमेश्वरासारख्या ठिकाणीं सहवास वाढवीतच जावा आणि सत्पुरुषांचे सदुपदेश बळें होऊन ऐकतच जावे. म्हणजे पूर्वीची दुष्टबुद्धि पापबुद्धि नष्ट होऊन त्यांचे ठिकाणीं पुण्यप्रभाव उद्रयास येऊन त्यांचें प्रारब्ध पुण्यकारक व सुख देणारें बनतें.
श्रीउवा. ४. ५. ७७

सद्‌गुरु स्वतः होऊन कोणाशीं कांहीं बोलत नसतात, व कांहीं सांगतहि नसतात व कोणाकरिता कांहीं करीतहि नसतात.
श्रीउवा. २. ६. १२१

सत्पुरुषाचे कोणतेहि बरे-वाईट व्यवहार जगाच्या कल्याणासाठीं प्रसादरूपच समजावे.
श्रीउवा. १. २६. ४१७

कोणत्याहि स्थिरचर वस्तूस सद्‌गुरु किंवा परमेश्वर समजून पूज्य बुद्धीनें पूजा वगैरे करीत राहिलें, म्हणजे पुढें मनुष्यरूपानें सद्‌गुरूची प्राप्ति होते
श्रीउवा. २. ६. १२१

सद्‌गुरु करून त्यांच्या आज्ञेनें वागलें म्हणजे ते, सर्व अज्ञान दूर करून, सर्व सुखाचें भांडार असें ज्ञान देतात. श्रीउवा. २. ६. १२१

सत्पुरुषाच्या संबंधानेंच वडिलांना सद्गति मिळते.

श्रीउवा. २. ७. १२७

उत्तरायण असो, नसो, सत्पुरुषाजवळ जर क्रिया केल्या, तर सद्गति मिळते.

श्रीउवा. २. ७. १३०

तसेंच शरीर वगैरे साधनांच्या योगें परमेश्वरी सत्कर्में वगैरे जो जीवात्मा करतो, त्या कर्माप्रमाणें परमेश्वरी संस्कारच त्याला पूर्णपणें घडत गेल्यामुळें, त्या शरीरांतील तो जीवात्मा परमेश्वर किंवा सत्पुरुष हें नांव पावतो; व ईश्वरी संबंधाचे, गुप्त अघटित शक्तीचे व सात्त्विक गुणधर्म व आनंदरूप अशी अवस्था त्याचे ठिकाणीं येते. श्रीउवा. ४. ९. १८४

तसेंच सत्पुरुषाच्या दर्शनास अधिकारी असो अगर अनधिकारी असो कोणीहि गेले, तरी त्यांच्याकडून आपणासारखें करण्याविषयीं जे प्रयोग व्हावयाचे ते सारखेच होत असतात. श्रीउवा. २. १९. ३२५

अशीं पूर्वीचीं पुष्कळ उदाहरणें लक्षांत घेऊन हल्लींच्या काळांत जेथें तशापैकीं दोन्ही गोष्टी पुष्कळ प्रमाणांनी आपोआप होत असतील तीच पूर्ण बनलेल्या सत्पुरुषाची सहज ओळख पाहण्याची खूण समजावी.

श्रीउवा. २. १७. ३०७

आतां अंतकालाचे वेळेस सत्पुरुषाचें किंवा परमेश्वराचें स्मरण यावें यासाठीं कोणाही सत्पुरुषाशीं मनानें पक्कें धरून ठेवून व्यवहारांत वागत असतांहि सत्पुरुषाचाच ध्यास ठेवला तर अखेर अंतकालीं तेच सत्पुरुष आपल्याला आठवण देतात, स्मरण देतात किंवा तेच स्वतः गुप्तपणें येऊन उभे राहतात.

श्रीउवा. २. १७. ३००

सत्पुरुष दुसऱ्याच्या पापामुळें तेवढ्यापुरते निराळे भासतील, परंतु निरंतरची शुद्धसत्त्वावस्था ही त्यांच्यापासून केव्हांहि सुटत नाहीं.

श्रीउवा. १. २५. ३१०

सत्पुरुषाचा व आपला आत्मा चैतन्यरूपच असल्यामुळें तद्रूप होण्याला फार काळ लागत नाहीं. श्रीउवा. २. २५. ४२८

कारण सत्पुरुषांच्या तोंडानें त्यांच्याच जीवानें खाल्लें असें होतें. अशी ही प्रेमाच्यायोगें परस्परांच्या जीवांचीं अदलाबदल होत असते.

श्रीउवा. १. २०. ३०२

परंतु सत्पुरुषांची पूर्ण अवस्था असली म्हणजे निंदा करणें किंवा दुःख देणें याचा परिणाम त्यांच्यावर होत नसतो, अशीं पुष्कळ उदाहरणें मिळतील. श्रीउवा. १. १९. २७९

सत्पुरुष कोणाचें खातात ? ज्याचा जीव खरोखर त्यांच्यात ( सत्पुरुषांत ) आहे, त्यांचें ते खातात. श्रीउवा. १. २०. ३०२

परमेश्वररूप झालेला सत्पुरुष, सद्गुरु, त्यांच्या आज्ञेनें वागण्याकरितां शरीराचा व मनाचा उपयोग केला तरी आपलें शरीर व मन परमेश्वराला दिल्यासारखें झालें. श्रीउवा. १. १८. २६३

सत्पुरुष द्वैताबाहेर असतात, त्यांच्यांत समुद्रासारखें बरें-वाईट सर्व सामाविलें जातें. तेच सत्पुरुष पूर्ण. श्रीउवा. १. १. २१

याकरतां त्या मानलेल्या सत्पुरुषास ईश्वर मानून प्रातःकालापासून दुसऱ्या दिवसापर्यंत जितके व्यवहार झाले असतील, ते त्या ठिकाणीं अर्पण करावे. श्रीउवा. २. २९. २९९

सत्पुरुषास गटार समजावयाचें, त्यांच्याशीं संबंध जोडला म्हणजे ते आपणांस निर्दोषी करतात. श्रीउवा. १. २६. ४२१

हा एवढा मोठा भवसमुद्र. पण सत्पुरुषाच्या सहवासानें गोष्पदाप्रमाणें वाटतो. श्रीउवा. २. ८. १४६

कोणाचेंहि युक्तीप्रयुक्तीनें भलें करावें, कोणाचें वाईट असेल तर तें युक्तीप्रयुक्तीनें काढून टाकावें. श्रीउवा. २. १२. २०९

प्रसंगानें जगाच्या कल्याणासाठीं त्यांना लोकांच्या विरुद्ध क्रियाहि कराव्या लागतात. श्रीउवा. २. ९. १५९

अंतकाळीं सत्पुरुषाचा बाह्य आकार जरी आठवला, तरीहि सद्वस्थाच प्राप्त होते. श्रीउवा. २. १२. २१५

*

## समाधी

कोणत्याच प्रकारची वासना नाहीं, **मी पुण्य करतों** याचाहि विचार नाहीं; जसा जो असतो, तो सहजसमाधीपर्यंत जातो.

श्रीउवा. ४. ३५. ४८८

*

## सत्

सत् म्हणजेच परमेश्वर आणि परमेश्वर म्हणजेच सत्.

श्रीउवा. ५. २. १८

सर्व प्रकारें मन सद्रूप व सुखरूप स्थितींत असलें म्हणजे आपण स्वतःहि त्या मनावरच अवलंबून असल्याकारणानें सर्व सुखात्मक असा जो सद्रूप परमेश्वर तीच अवस्था आपल्यास येणार.

श्रीउवा. ५. ५. ७७

जगांत उलट सुलट स्थितींत नेहमीं दोनच असतें. जग हें असत्रूप आहे व सत्रूपहि आहे. श्रीउवा. ५. ५. ७७

जसजसा असत् कर्माचा प्रवाह वाढत जातो व त्या असत् कर्माची

पूर्णता होत जाते, तसतसें मनहि असद्रूपच बनत जातें. असद्रूपच काय आहे तर जग ! श्रीउवा. ५. २६. ४०७

जेथें कोणत्याहि प्रकारें येणें जाणें वगैरे गति नाहीं. अशा गतिरहित अवस्थेलाच सत् अवस्था म्हणतात. श्रीउवा. ५. २२. ३४१

*

## संन्यास

संन्यासाश्रमाचा अग्नि पेटवून त्यांत त्यानें काय जाळावयाचें ? जे शहाणे असतात, विचारी असतात, ज्यांच्याजवळ संकल्प-विकल्प नाहीं, अशांनीं संन्यासाश्रम घेणें उत्तमच आहे. पण ज्यांचें क्रियाकर्तव्य, व्यवहार व संकल्प-विकल्प चालू असून, ज्यांचेजवळ जन्मोजन्माचा पुष्कळ केर-कचरा सांचला असेल ते जरी संसारप्रपंचादिक व्यवहारांत असले तरी त्यांनींसुद्धां शेवटीं त्या दोघांच्या मुक्ततेसाठीं संन्यासाश्रम स्वीकारण्याची जरुरीच आहे. श्रीउवा. ४. २८. ४१८

संन्यासाश्रमाला कोणी म्हणतात, ' अधिकारी असावा लागतो. ' अरे अधिकार काय ? ज्याच्या घरांत संकल्प-विकल्पाचा कचरा पुष्कळ सांचलेला असतो, तोच अधिकारी. श्रीउवा. ४. २८. ४१८

याचप्रमाणें पूर्वाश्रमांतून एक वार चतुर्थाश्रम म्हणजे संन्यासाश्रम घेतला गेला म्हणजे त्याला अनुसरून नेहमीं परमेश्वरी विचारच सुरू होतात. श्रीउवा. ४. २८. ४१७

ज्यांना संन्यासाश्रमाचा अभ्यास करावयाचा असेल, त्यांना तीन नियम फार जरुरीचे आहेत. ते कोणते ? तर ( १ ) जनसमुदायापासून अलग असणें, ( २ ) मौन, ( ३ ) आपल्या शारीरिक सुखासाठीं, अगर सोयीसाठीं आपण होऊन कोणताहि प्रयत्न न करणें. किंवा तें सुख आपो-

आप येत असेल, तरी त्याचा स्वीकार न करणें. श्रीउवा. ५. १७. २९३

संन्यासाश्रमाचे जे मुख्य धर्म आहेत ते पाळण्याची पूर्ण तयारी झाल्याशिवाय संन्यासच घेऊं नये. श्रीउवा. ५. १७. २८८

प्रथम अंतःकरणानें संन्यास घेतल्यावर मग बाह्य वेषाचा संन्यास घेऊं. श्रीउवा. ५. ११. २८६

संन्यास म्हणजे जगाचा सर्व संबंध तुटणें व पुराणपुरुष अवस्थेंत जाणें. श्रीउवा. ४. २८. ४१९

निदान अंतकालाच्या सुमारास तरी त्यांनीं स्वतः इच्छा करून किंवा त्यांच्या परिवाराकडून जबरदस्तीनें का होईना, आतुरसंन्यासाचीं चिन्हें तरी त्याला दिलीं जाऊन त्यांतच त्यांचा शेवट झाला तर तेंहि उत्तमच आहे. श्रीउवा. ४. २८. ४१८

*

## सत्कर्म

सत् कर्माचा परिणाम सत् अवस्थेंत जाणें हाच आहे. सत् म्हणजे खऱ्या सुखाचें आणि अखंड आनंदाचें स्थान. श्रीउवा. २. ५. ९२

बिचारे गरीब लोक आधींच पूर्वीच्या पापानें हलक्या जातींत जन्म येऊन दुःख भोगीत पडलेले आहेत. त्या पापांतून व हीन जातींतून मुक्त होऊन उच्च जातींत त्यांना जन्म मिळेल व खऱ्या सुखाचा लाभ होईल, अशा रीतीचा त्या हीन जातींत असलेल्या गरीब लोकांना सदुपदेश करून त्यांना सन्मार्गाला लावावें. श्रीउवा. ५. २८. ४३५

कोणत्याहि देवतेची पूजा वगैरे सत्कर्मे चित्तशुद्धीसाठीं असून आपलें मन, आत्मा व जीव परमेश्वरी गुणधर्माचे होण्यासाठीं असतात, व तसें करणें म्हणजेच मनुष्यपणाचें कर्तव्य. श्रीउवा. ५. ७. १२७

म्हणून कोणतेंहि सत्कर्म सकाम करण्यापेक्षां निष्काम केलेलें उत्तम.
श्रीउवा. ४. ४. ६९

संसाराचें दुःखनिवारणार्थ व सुखप्राप्त्यर्थ साधन करणें भाग आहे. तें साधन कोणतें ? सद्‌गुरु आणि स्वधर्माचरणाला अनुसरून केलेलीं सत्कर्में मुख्य साधनें आहेत.
श्रीउवा. १. २१. ३१३

कोणीहि यथाशास्त्र आपल्या स्वधर्माला अनुसरून सत्कर्में केलीं, तर त्यायोगें त्यांची भुरळ ( पटल ) नाहींशी होऊन ते शुद्ध आत्म्याच्यायोगें ब्रह्मसुखाचेहि अधिकारी होतात; आणि शुद्ध पुण्यशाली जीवाच्यायोगें पृथ्वीवरील राजविलासी सुखाचेहि अधिकारी तेच होतात.
श्रीउवा. १. १. १९

केव्हांहि पृथ्वीवरील कोणीही एक किंवा एकापेक्षां अधिक सात्त्विक राजे असतील, तर निश्चयानें समजावें कीं, त्या राजे लोकांनीं पूर्वीच्या कोणत्यातरी जन्मांत घोर तपश्चर्यादिक स्वधर्माला अनुसरून सत्कर्में करून पुष्कळ पुण्यसंचय केलेला असला पाहिजे; व त्यायोगें शुद्ध आत्म्याच्या रूपांनीं ते राजे ब्रह्मसुखाचा अनुभव घेत असून, तेच शुद्ध जीवाच्या रूपांनीं पृथ्वीवर राज्यसुखहि भोगतात, असा आहे सिद्धांत.
श्रीउवा. १. १. १८

तशाच रीतीनें कोणतींहि परमेश्वरी सत्कर्में यथायोग्य रीतीनें केल्यावर त्याचें सुखरूप फळ मिळण्याचा काळ येईपर्यंत त्याच्या पूर्व काळांत तेंच सुखरूप फळ असतें. असें अदृष्ट स्थितींत असलेलें सुखरूप फळ त्यालाच पुण्य म्हणावें.
श्रीउवा. ५. २. १७

तुम्हांला जर खरोखरी देशसेवक व देशभक्त बनायचें असेल आणि आपला देश सर्वप्रकारें स्वातंत्र्यावस्थेंत राहावा व सुखी व्हावा असें वाटत असेल, तर गांवोगांवीं, शहरोशहरीं सर्व लोकसमाजांत हल्लीं विपरीत घाणेरडे विचार जे प्रत्येकामध्यें भरले गेले आहेत, ते काढून

टाकण्याविषयीं व सद्धर्म, स्वधर्माचण, सत्कर्में, पुण्यकर्में वाढविण्या-विषयीं करणी करणें अत्यंत श्रेयस्कर आहे.

श्रीउवा. १. १५. २२६

राजकीय व व्यापारी असा जो ब्राह्मणेतर समाज त्यांनीं वाटेल त्या रीतीनें ऐहिक सुखाच्या प्राप्तीसाठीं व श्रीमंतीसाठीं सद्धर्भ व सत्कर्में यांच्या साहाय्यानें योग्य प्रयत्न करणें हाच त्यांचा धर्म आहे.

श्रीउवा. २. २८. ४८५

परंतु हा सिद्धान्त आहे कीं, कोणतेंहि प्रत्यक्ष अनुभवास येणारें सुख, त्या प्रत्यक्ष सुखाची पूर्व अवस्था, पूर्व स्वरूप अप्रत्यक्ष अवस्थेंत असतें.

श्रीउवा. ५. २. १६

तर जें स्वतःकरतां केलेलें नसून, केवळ दुसऱ्याकरतां केलेलें असतें तें सत्कर्म वाटेल तितकें करावें. श्रीउवा. ४. ३. ४७

तसेंच कोणतेंहि सत्कर्मांपासून होणारें सुखरूप फळ उदयास येण्या-पूर्वीं क्रिया झाल्यानंतर तें अप्रत्यक्ष स्थितींतच हळूहळू परिपक्व दशेंत येत रहातें. श्रीउवा. ५. २. १७

★

## सच्चिदानंद

आणि शुद्ध सच्चिदानंद आत्मा हा कोणत्याहि प्रकारें संस्काररहित असतो; म्हणून त्यांत जीवात्मा मिसळत नाहीं. म्हणजे योग होत नाहीं. त्या दूषित संस्काराला अनुसरून तो जीवात्मा पुनः पुनः सुखदुःख भोगण्यालायक शरीर आकार बनवून त्यांत तो जन्माला येतच असतो.

श्रीउवा. २. १८. ३१४

जीव अवस्थेंतील आत्मा परमेश्वरी आत्म्यांत मिसळल्यावर, पूर्वींच्या

जीवावस्थेची सर्व जाणीव राहून परमेश्वरी आत्म्यांत मिसळल्याबरोबर मी फारच मोठा आणि पूर्ण आनंदरूप, व सर्व अघटित शक्तिमान. व अपार अनंत असा आहे तो अनुभव ज्या जीवात्म्याचें मनुष्यरूप जें स्थूल शरीर त्यांतच असलेल्या सूक्ष्म शरीराच्या आधारें पूर्ण अनुभव घेत राहतो.

श्रीउवा. १. २. ३४

जीवदशा नष्ट होऊन तो ईश्वरी शुद्ध आत्मा, त्याच ईश्वरी आकाराला अनुसरून ईश्वराच्याच गुणधर्माप्रमाणें अघटित घटनाशक्ति व अतर्क्य लीला करीत जगांत व जगाबाहेर अखंड आनंदोपभोग घेत राहतो. श्रीउवा. २ २४. ४११

अशा रीतीचा योग झाल्यावर हें नाशवंत मनुष्यशरीर गेल्यावर त्याला अविनाशी व अजरामर अशा परमेश्वरी शरीराची प्राप्ति होऊन यथेच्छ आनंदविहारांत निमग्न राहून अखंड सुखानुभव घेत राहतो.

श्रीउवा. १. २. ३५

शुद्ध आनंद निराकार आहे, तो दिसत नाहीं; तेथें एकमेकच नाहींत, म्हणून तो परस्पर देतां घेतां येत नाहीं, वस्तूंच्या आधारानें घेतला जातो. वस्तु आनंदाची घटना आहे. श्रीउवा. १. २३. ३४०

सुषुम्ना नाडी ईश्वरी कृपेनें किंवा आपोआप साध्य झाल्यास ज्ञानप्राप्ति होते. श्रीउवा. ४. २५. ३८५

तर अखंड सुखाची अवस्था किंवा पूर्ण रीतीनें जगाच्या पोषाखाचा देखावा किंवा पूर्ण मुक्ततेची अवस्था या तिन्हींचा अनुभव घ्यायला आपण कोण बनलें पाहिजे ? तर आपण शरीरानें विद्यमान, जिवंत असून जगासंबंधीं कळणें बंद पडलें पाहिजे. श्रीउवा. ४ १२. २५८

पूर्ण कळणें म्हणजे तसें बनणें, आणि पूर्ण बनलें जाणें म्हणजेच पूर्ण कळणें. स्वभावतः आंतूनच उमाळा उत्पन्न झाल्याशिवाय खरें बनलें आणि खरें कळलें जात नाहीं. तो उमाळा उत्पन्न होण्याला पुण्यकर्म

स...६

वाढविण्याची जरुरी असते. श्रीउवा. ४. १२. २६०

तीच अवस्था सर्वांत श्रेष्ठ असून, जगाच्या आणि जें निराकार शुद्ध सत् चित त्यांतील मधला सांधा आहे. श्रीउवा. ४. १२. २५४

इकडेहि नजर नाहीं व तिकडेहि नजर नाहीं, अशा त्या दोन्ही अवस्था सोडून दोघांच्या सांध्यांत जी तिसरी अवस्था आहे, ती नुसती आहे. ती अवस्था आली कीं मूळचें जें सच्चिदानंद तेंच तो बनतो.

श्रीउवा. ४. १२. २५७

अर्थात् याच्या बुडाशीं, या खोट्याच्या बुडाशीं याच्या उलट अखंड अविनाशी ' कळणें ', अखंड आनंद, अखंड अस्तित्व हेंच असलें पाहिजे; आणि तें एकच असलें पाहिजे, व तें स्वतंत्र असून त्याच्यांत सत् , चित् आणि आनंदाचा अनुभव असला पाहिजे, अशा अभ्यासाची मनाला संवय लावावी, म्हणजे आपलेच ठिकाणीं असलेला जो सच्चिदानंद त्याचा अनुभव येतो. श्रीउवा. ४. १२. २५४

असें सर्वत्र दुर्लक्ष करीत इष्ट देवतेच्या स्मरणांतच काळ घालवीत राहिलें व असा अभ्यास सतत चार वर्षें चालू ठेवला म्हणजे हळूहळू देहाचा विसर पडूं लागतो व हाच अभ्यास पुढें कांहीं दिवस चालू ठेवल्यास आपला देह आपल्याजवळ असून आपल्या समोर दिसूं लागतो व पुन्हां पूर्ववत आपल्या आपल्या देहांतच आपण आहोंत असें होतें व मधून केव्हां केव्हां आपलें शरीर आपल्या जवळ नसून समोर अलग पाहूं लागतो. असें पुष्कळ वेळां होऊं लागलें म्हणजे देहातीतपणाचा पूर्ण अभ्यास झाला असें होतें. श्रीउवा. २. १८. ३१६

आणि देहापासून पुढें पुन्हां होणारे कोणतेहि व्यवहार, त्यायोगें पुन्हां आत्मा दूषित होत नाहीं. तो सदोदित शुद्धच्या शुद्धच राहतो, आणि देहांत असूनच देहाबाहेर असलेला जो सच्चिदानंद आत्मा त्याच्याशीं मिसळून जातां येतें. श्रीउवा. २. १८. ३१५

म्हणजे देहांत आहे आणि देहाबाहेर सच्चिदानंद रूपांनीं तोच असल्याचा त्या मनुष्याला अनुभव येतो. श्रीउवा. २. १८. ३१५

पूर्ण अर्थ कळणें म्हणजे तसें बनूनच जाणें. श्रीउवा. १. ५. ८३

आणि हजारों कोसांवरची ज्ञानदृष्टि प्रगट होते.

श्रीउवा. २. १८. ३१५

तसेंच तो निराकार सच्चिदानंदच मनुष्य रूपाला येऊन, मनुष्य-आकाराच्या द्वारें जगांतील भोग्य वस्तूंच्या रूपांनीं आलेल्या साकार सच्चिदानंदाचा म्हणजे आपला आपलाच आत्मज्ञानी अशा मनुष्याकारानी निरंतर उपभोग घेत राहतो. श्रीउवा. २. २३. ३९०

ते प्रेम परस्पर ब्रह्मचर्य पाळून वाढवीतच राहिलें, तर त्या प्रेमभरांत जो आनंद प्रकट होतो व त्या आनंदाचीहि परस्परांत परिसीमा राहूं लागली म्हणजे तो आनंद शुद्ध समजावा व तोच आनंद शुद्ध सच्चिदानंद परमेश्वराच्या प्राप्तीला कारण असतो व त्याच स्त्री-पुरुषांत परमेश्वरी शक्ति प्रगट होते. श्रीउवा. २. १८. ३१७

तो अनुभव जाणीव-नेणीव इत्यादि द्वैताच्या गुणधर्मानें बनलेल्या आपल्या मनुष्यप्रकृतीच्याच योगें होतो. श्रीउवा. ४. १. ८

भगवद्गीता–ग्रंथाचें पठण करण्याचा मुख्य मुद्दा काय, तर त्याच्याशीं आपला आत्मा किंवा आपण तादात्म्य व्हावें म्हणजे तेंच आपण बनून जावें, हा आहे. मग तेंच आपण बनल्यावर त्यांच्या मुखांतून निघालेले वेदासारखे व गीतेसारखे ग्रंथ आपल्याच तोंडांतून निघाल्याचा अनुभव होतो. श्रीउवा. १. ४. ६३

जगांत भासमान किंवा अनुभवास जें येतें, ते त्या अविनाशी प्रकृतीचे गुणधर्म आहेत. ते जर मुजरेंत धरले नाहींत, त्यांकडे दुर्लक्ष केलें, तर तें जें केवल अनंत जाणीव नेणीवरहित शुद्ध सच्चिदानंद त्याचा अनुभव येतो. श्रीउवा. ४. १. ८

मुख्य मुख्य विषयवस्तूंची ओळखच होऊं नये अशी व्यवस्था ठेवली म्हणजे झालें. त्यायोगें अनायासेंच त्या मुलांमुलींचे ठिकाणीं ब्रह्मचर्याचे गुणधर्म वाढूं लागून, परमेश्वरी आत्म्याशीं त्यांचा आत्मा ऐक्य होण्यास अधिकारी होतो. श्रीउवा. १. २. ४१

तसेंच आपल्या खोट्या शरीराच्यायोगें एकदां खऱ्या मोल्यासारखें जें कांहीं शुद्ध सच्चिदानंदाचा उपभोग घेण्यायोग्य अजरामर, अशा दिव्य शरीराचा एकदां अनुभव आला, म्हणजे आपलें खोटें स्थूल शरीर असलें काय व नसलें काय सारखेंच. श्रीउवा. ४. १५. २९५

मूळ परब्रह्म सच्चिदानंद ही अवस्था स्थिर आहे; त्यांत चलविचल, असमाधान, किंवा आनंदवृत्तीला व्यत्यय येत नाहीं.

श्रीउवा. ४. ७. ११४

याच्या उलट खास परमेश्वरी बाजूंत घेऊन जाणारें जें दुःख असतें, तें आपण कोणत्याहि तऱ्हेनें दुष्ट कर्म न करतां आपोआप येतें. तें दुःख सहन करीतच गेलें व सहन करण्याचा एक प्रकारचा निश्चयच ठेवला, तर तें सहन करण्याकरतां गुप्तपणें आपले ठिकाणीं एक प्रकारची शक्ति प्रगट होते. श्रीउवा. ४. ४. ६८

प्रथम जगाचा अनुभव पूर्वीं म्हटल्याप्रमाणें आपल्यांत लीन करून घेतल्यावर, पुन्हा पूर्ववत् मूळ अवस्थेच्या रीतीचें आपण सच्चिदानंद-रूप होऊन गेलों. श्रीउवा. ५. १. ७

म्हणजे जगापैकीं कोणत्याहि प्रकारें जाणीव-नेणीवरहित असें जें आहे, तेंच शुद्ध सच्चिदानंदरूपानें खास आपण. श्रीउवा. ५. १. ७

त्याचप्रमाणें आपल्याला खरा आनंद जर पाहिजे असेल, तर उलट सुलट जे द्वैताचे, प्रकृतीचे गुणधर्म तिकडे दुर्लक्ष केलें म्हणजे त्या अविनाशी स्वयंप्रकृतीपासून आपल्याला वाटेल तितका अविनाशी आनंद आपोआप घेतां येतो. श्रीउवा. ४. १. ११

प्रसन्नता म्हणजेच सद्गुरूचा व परमेश्वराचा आत्मा आपल्या जवळ येऊन बसणें. श्रीउवा. १. २६. ४१६

जाणणेंच राहिलें नाहीं तर जाणण्याचें राहणार कोठून ? शुद्ध जाणीव अविनाशी असल्याकारणानें तेवढी मात्र शिल्लक राहते. उसन्यासारखा हल्लीं आमचा व्यवहार होऊन राहिला. श्रीउवा. १. २०. ३०५

परंतु केवळ अज्ञानामुळें मनुष्यलोक हा विचार न करतां (असें आणि तसें, सुख आणि दुःख, माझें व तुझें, बरें व वाईट) इत्यादि द्वैत-रूपानें असलेले जे हे गुणधर्म यांना मुजरेंत धरून महत्त्व देतात व त्याच्यासाठीं अभिमान, अहंकार धारण करून द्वैताची उत्पत्ति वाढवीतच राहतात; म्हणून त्यांना शुद्ध सच्चिदानंदाचा अनुभव न येतां त्या द्वैता-पासून उत्पन्न झालेल्या सुखदुःखाचाच अनुभव जन्मोजन्म घ्यावा लागतो. या दुखःरूप द्वैताकडे दुर्लक्ष होऊन परमेश्वरी सच्चिदानंदाचा अनुभव यावा, याकरतां परमेश्वरी द्वैताचा अंगीकार करावा लागतो.

श्रीउवा. ४. १. ८

म्हणून प्रकृतीपासून उत्पन्न होणारें जें भासमान द्वैत त्याच्याकडे पाहूं नका. श्रीउवा. ४. १. १०

सारांश आपलें स्थूल शरीर ही जड प्रकृति त्या शरीराकडून जग-व्यवहाराकडे जेव्हां पूर्ण लक्ष होईल, म्हणजे शरीराच्या कोणत्याहि अवयवापासून जगापैकीं विशेष व्यवहार होणार नाहीं व बहुतेक जड शरीरावर दुर्लक्ष होऊं लागेल; तेव्हां तेंच जड शरीर भासमान् प्रकृतीच्या अवस्थेंत जातें. मग ज्यांपेक्षां जें जड शरीर जगव्यवहारापासून पूर्ण अलिप्त होऊन भासमान् अवस्थेंत आलें त्यापेक्षां तेंच स्थूल शरीर भास-मान प्रकृतीच्या अवस्थेंत अनंत आनंदाचा अनुभव घेतें.

श्रीउवा. ४. १०. २०६

असें जरुरीपुरतें जगाच्या बाहेर जाणें येणें हें तरी थोडी वासना

व देहरूप साधन आहे म्हणून होतें; पण जर कांहींच व्यवहार राहिला नाहीं, म्हणजे पूर्ण निर्वासन अवस्था झाल्यावर अर्थातच स्थूल देहाचें काम नसल्यामुळें त्याचा पात होतो व तो मुक्त होऊन निरंतर आत्मानंदांत निमग्न असतो. श्रीउवा. ४. १०. २०५

यावरून जितकी भासमान् प्रकृति सूक्ष्म, तितका आनंद जास्त. अर्थात त्या कुच्चाची, सूक्ष्म अशा भासमान् प्रकृतीची गरज आहे. आतां तुम्ही तो रस खाल्ला म्हणजे त्यांतील आनंद ग्रहण केला जातो. अशाच रीतीनें हें स्थूल शरीर जेव्हां जगव्यवहारापासून अलग केलें त्यावेळीं त्या स्थूल शरीरांत सूक्ष्म असलेली जी भासमान् प्रकृति ती आणि स्थूल शरीर एकच बनलें जाऊन त्याच्या आधारेंच तो अत्यंत आनंदाचा सांठा घेतां येतो. श्रीउवा. ४. १०. २११

आपल्या हृदयामध्यें आपल्या मनानें व बाह्य इंद्रियांच्या योगेंहि ईश्वरासंबंधीं जें आपण करीत असूं किंवा करावयाचें असेल, तें करीत असतांना जर कांहीं मनांत इतर विचार येऊं लागले, तर तें गुप्तपण समजूं नये. इतर विचार येत असतां, परमेश्वरी जें कांहीं केलें जातें तें, इतर विचारांच्यायोगें गुप्तपण नाहीं म्हणून, परमेश्वराला एकदम पोहोंचलें जात नाहीं......तरीहि तें फुकट न जातां......तें केलेलें हळूहळू परंपरेनें परमेश्वरासहि जाऊन पोहोंचतें. श्रीउवा. १. ६. १००

आपलें मन किंवा आपला आत्मा ब्रह्मसुखांत जाण्यास केव्हां अधिकारी असतो ? तर जगापैकीं कोणत्याहि गोष्टींचा संबंध किंवा संस्कार मनाला झालेला नसेल किंवा झालेला तो धुतला गेला असेल तेव्हां.

श्रीउवा. १. ६. १०५

ही सच्चिदानंद अवस्था ज्याची त्याला आणतां येत नसेल तर 'उपेक्ष्य नामरूपे द्वे' या वाक्याप्रमाणें ज्याची बुद्धि सच्चिदानंदरूप झाली असेल, अशा **सत्पुरुषाला अंतःकरणापासून** चिकटून राहिलें

म्हणजे आपले ठिकाणीं सच्चिदानंद अवस्था आपोआपच येत असते.
श्रीउवा.४. २०. ३३४

बुद्धीच्या आधारें होणारी कामगिरी तिच्याच आधारें मोडून टाकली पाहिजे, कारण कामगिरी पत्करणारा जो सच्चिदानंद तोच आपण आहों.
श्रीउवा. ४. २० ३३४

गुणधर्म पाहून उपयोगांत आणतांना नांव देणारी व आकाराचें आकलन करणारी बुद्धि एकच आहे. तीच बुद्धि जर आकार व त्याचे गुणधर्म यांचें आकलन करणार नाहीं तर सच्चिदानंदरूप होईल.
श्रीउवा. ४. २०. ३३३

ज्या वेळीं ती बुद्धि निरनिराळ्या आकारांचें ग्रहण करते व त्यांच्या गुणधर्मांप्रमाणें त्यांना निरनिराळीं नांवें देते, त्या वेळीं तिच्यांतील सच्चिदानंदपणा नाहींसा होऊन ती व्यावहारिक रीतीची बुद्धि होते.
श्रीउवा. ४. २०. ३३३

मग मन ही अवस्था रहात नाहीं; तें पूर्ण सद्रूप होतें. मग तें सत्कर्म-रूपानेंहि रहात नाहीं, केवळ जाणीव रूपानें मागें रहातें. मग आपण म्हणून जे आहोंत ते त्याच जाणीवेच्या योगें सद्रूप अवस्थेंत गेलेल्या मनाचा म्हणजेच सद्वस्तूचा अनुभव घेत रहातों. त्या सद्वस्तूंत असणारा आनंद अनिर्वाच्य, कधींहि न संपणारा व त्याचा अनुभव घेणारेहि कधीं न संपणारे असे असतात.
श्रीउवा ५. २६. ४०६

पुढें ती सद्वस्तु व मन एक होऊन गेल्यावर आनंदानुभव नाहीं.
श्रीउवा. ५. २६. ४०७

ज्यावेळीं आनंदानुभव घेणें असेल त्या वेळीं पुन्हां आपण अलग होऊन जाणीवेच्या आधारें त्या सच्चिदानंदापासून अखंड सुखानुभव घेतां येतो.
श्रीउवा. ५. २६. ४०७

तर पूर्ण अद्वैत अवस्थेंत गेलेल्या सच्चिदानंदरूप विद्यमान असलेल्या

सत्पुरुषाजवळ कोणीहि श्रेष्ठ व हीन जाती यांचा स्पर्शास्पर्श वगैरेबद्दल दोष मानूं नये. श्रीउवा. ५. २७. ४३२

पूर्ण परब्रह्म सच्चिदानंद अवस्थेंत गेलेला असून पूर्ण अद्वैत वृत्ति ज्यांची झालेली आहे, ज्याला सुखदुःख समान, मान अपमान समान, शत्रुमित्र समान, पापपुण्य समान, ज्याला स्पृश्य अस्पृश्य समान, वगैरे वरे-वाईट सर्व विरुद्ध ज्याला समान झालेले आहे, अशी अद्वैत वृत्ती केवळ बाह्य सोंगाची मतलबापुरती नसून, स्वभावतःच ज्या सत्पुरुषाची बनली गेली असेल अशा सत्पुरुषाच्या ठिकाणीं मात्र अस्पृश्यापेक्षांहि अत्यंत अस्पृश्य जरी असला, तरी त्यांनीं त्याला प्रत्यक्ष स्पर्श केला, जवळ बसविलें, एका ताटांत खात बसलें तरी तेथें दोष नाहीं.

श्रीउवा. ५. २८. ४३०

मूळच्या सच्चिदानंद अवस्थेंत असलेले आपण व जगाचा अनुभव घेऊन पुन्हां सच्चिदानंद अवस्थेंत गेलेले जे आपण यांत फरक काय तर पूर्वींचे जे आपण असतो ते कोणत्याहि प्रकारें अनुभवरहित असतों; म्हणून स्वतःच्या स्वतःला आपल्या सच्चिदानंदाचा, अखंड आनंदाचा, अखंड सुखाचा अनुभव येत नाहीं व मागाहून जे आपण सच्चिदानंद अवस्थेंत जातों, त्यावेळीं आपण सच्चिदानंदच जगरूपांत असून मनुष्याच्या आकारानें आपणच जगाचा व जगरूपानें आपल्या स्वतःचा अनुभव घेतलेला असतो. म्हणून त्या अनुभवाच्याच आधारानें स्वतःच्या मूळ अवस्थेचा व अखंड आनंदाचा अनुभव येतो; व यासाठींच त्या सच्चिदानंदाला जगरूपानें नटावें लागलें. याकरतां जगाचा अनुभव घेऊन मूळ सच्चिदानंद स्वरूपांत जाण्याची जरुरी आहे.

श्रीउवा. ५. १. ८

अशा रीतीनें सात्त्विक म्हणजे शांत गुणानें शत्रुमित्ररहित असा जेव्हां आपला शुद्ध ‘ मी ’ बनतो, तेव्हां तो अखंड आनंदानुभवाच्या अवस्थेंत

आपल्याला घेऊन जाण्याला कारणीभूत होतो. श्रीउवा. ५. २१. ३३९

याप्रमाणेंच प्रत्येक मनुष्यानें सत्कर्माच्या बाजूनें शरीराला ईश्वरी रीतीचें वळण लावून ईश्वराच्या रीतीप्रमाणें तें शरीर दिसूं लागलें, म्हणजे आंतला आपला जीवहि ईश्वररूप होऊन जातो. मग आपलें शरीर झालें देवळासारखें व जीव झाला ईश्वरासारखा. श्रीउवा. ५. २१. ३४०

माझ्या निमित्तानें जें जें आपोआप घडून राहिलें किंवा घडेल, त्यांत ज्या ज्या तुम्हां लोकांचा माझ्याशीं कोणत्याहि सद्‌बुद्धीनें होणाऱ्या व्यवहाराच्या योगें जो संबंध जोडला गेला असेल, किंवा जोडला जात आहे, किंवा जोडला जाईल, तो कोणत्याहि प्रकारें जगाच्या अवस्थेंतील न समजतां जगाच्या बाहेर जी निराकार, निर्गुण, खास सच्चिदानंद परमेश्वरी अवस्था आहे त्याच्याशीं झाला असें समजावें. मग यावरून या तुमच्या नाशवंत शरीराच्या साधनानें अविनाशी अवस्थेशीं तुम्हीं संबंध जोडल्यामुळें, ज्यावेळीं तुमचें शरीर सुटेल त्या वेळेस तुम्हीं जगाच्या बाहेर संबंध जोडून ठेवला असल्यामुळें, त्या सच्चिदानंद परमेश्वरी अवस्थेंतच तुम्ही जाल तेथें मी आहेच. श्रीउवा. ५. ३. ३८

मला स्वतःलाच प्रत्यक्ष खराखरा जो अनुभव येत आहे, त्याचीं फोड करून ही मांडणी मांडली जाते. हे विषय कोणत्याहि उपनिषदादिक वेदान्त ग्रंथांत सांपडूं शकतील. जे तुम्हां ऐकणाऱ्यांत अधिकारी असतील, त्यांना हे विषय ऐकून मोठा आनंद होईल, व चित्ताची शुद्धता होऊन अखेर ब्रह्मसुखांत जाण्याचे ते अधिकारी होतील. श्रीउवा. ५. १. १०

या अवस्थेंत गेलेला जो कोणीहि मनुष्य असतो, तोच पूर्ण ज्ञानी, योगी महासत्पुरुष व सर्व प्रकारें समर्थ असतो. श्रीउवा. ५. १. ९

त्या अवस्थेंत वाटेल त्या अघटित शक्तीचा प्रभावहि प्रकट होत असतो; मात्र त्याचा उपयोग वाटेल तर केला जातो, नाहीं तर नाहीं.

श्रीउवा. ५. १. ९

केवळ अनुभव घेतलेला असणें हीच आम्हीं पूर्वीं सांगितलेली भासमान् प्रकृति. ही स्थिति झाल्यावर स्थूल शरीर पतन होतें, किंवा नाहींसें होतें असें कांहीं नाहीं. पुन्हा हळूहळू भानावर आलें म्हणजे तें शरीर जसेंच्या तसेंच असतें व पुन्हां शरीराचा व जगाचा अनुभव येऊं लागतो. श्रीउवा. ५. १. ९

या प्रकाशाचा आणि सुखानंदाचा अनुभव घेण्याला जगापैकीं किंवा शरीरापैकीं कोणतेंहि साधन लागत नाहीं. फक्त पूर्वीं जगाचा अनुभव घेतलेला असणें, एवढेंच असण्याची जरुरी आहे. श्रीउवा. ५. १. ८

असा अनुभव घेऊन जो परत आलेला त्यानें पूर्वींच्या जगरूपानें मायावी, खोट्या अशा सुखदुःखांचा अनुभव घेतलेला असतो. तो अनुभव घेतलेला असणें याच साधनानें अखंड सच्चिदानंदाचा अनुभव तो घेत राहतो. शिवाय वाटेल त्या पूर्वीं अनुभविलेल्या आकारानें किंवा व्यक्तिरूपानें वाटेल तेव्हां गर्भवासाशिवाय, किंवा इतर कोणत्याहि साधनाशिवाय फार सूक्ष्म कालांत सुद्धां एकदम प्रकट होऊं शकतो व अघटित शक्तीसह किंवा शक्तिरहितहि निरंतर सुखभोगी किंवा सुखरूप अवस्थेंत असतो. श्रीउवा. ५. १. ८

असा हा माझा किंवा सत्पुरुषाचा किंवा कोणत्याहि इष्ट देवतेचा चैतन्यरूप फोटो आपल्या हृदयांत खरोखरीचा प्रत्यक्ष प्रकट होण्यासाठीं साधा व सोपा उपाय ऐकून ठेवा. श्रीउवा. ३. ७. ११३

कोणत्याहि अवस्थेंत कोणत्याहि वेळेस आंत बाहेर शुचिर्भूत होऊन, एकांतात अंधेऱ्यांत बसून डोळे लावून शक्य तितके इतर विचार न येऊं देतां, मनालाहि शक्य तितका एकांत देऊन, आंतल्याआंत, आपल्या हृदयांत ज्या सत्पुरुषाचा किंवा ज्या देवतेचा फोटो घ्यावयाचा आहे, त्याचेंच केवळ स्मरण, त्याचा देखावा, त्याचा आकार सारखा मनानींच पाहात राहावा. असें शक्य असेल तर जास्त वेळ करीत राहावें; निदान नित्य-

नियमानें रोज सकाळ संध्याकाळ कमींत कमी पंधरा मिनिटेंपर्यंत केलें तरी हरकत नाहीं. श्रीउवा. ३. ७. ११३

ज्या देवतेमध्यें चैतन्य आलें असेल त्या देवतेच्या गुणधर्माला अनुसरून त्या देवतेप्रमाणें अघटित शक्ति, किंवा सत्पुरुषाप्रमाणें सद्रूप अवस्था आपोआप ध्यान करणाऱ्याच्या अनुभवास येऊं लागते.

श्रीउवा. ३. ७. ११४

असें करतां करता कांहीं दिवसांनीं ती ध्यानांत आणीत असलेली मूर्ति बराच वेळ आपल्या हृदयांत स्थिर होऊं लागली म्हणजे आपल्याजवळ चैतन्य असतेंच, तेंच चैतन्य मनाच्या द्वारें त्या ध्यान करीत असलेल्या आकारांत, मूर्तींत, फोटोंत प्रवेशून त्या मूर्तीशीं ऐक्यत्व होऊन त्याच परमेश्वराची किंवा सत्पुरुषाची मूर्ति आपल्याप्रमाणेंच चैतन्यरूप होऊन, ती आपल्या हृदयांतच किंवा आपल्या हृदयाच्या बाहेर आपल्यासमोर प्रत्यक्ष प्रगट होऊन हालूं चालूं लागून आपल्याशीं बोलणें वगैरे सर्व व्यवहार करते. श्रीउवा. ३. ७. ११४

तसेंच सच्चिदानंद अवस्थेंतून आलेले पूर्वींचे रामकृष्णादिक अवतारिक महापुरुष सदासर्वकाळ अजरामर स्थितींत अखंड सुखांत तेच असतात. परंतु प्रसंगानुसार त्यांचें सामर्थ्य जगांत केव्हां असतें केव्हां नसतें. त्यांच्या सारख्यांना सात्त्विक गुणांनीं, भक्तिभावानें जे कोणी चिकटलेले असतात, तेहि अखेर त्यांच्या पदाला जातात. श्रीउवा. ३. ३४. ४४९

आतां जगाच्या बाहेरचें कांहीं आहे असें जर तुम्हांला वाटत असेल, तर तुम्हीं आणि जग ज्यांतून निघाले आहांत, त्याचें आदिकारण शुद्ध सद्रूप परब्रह्म आहे. तेंच सर्व सुखाचें व आनंदाचें ठिकाण आणि तोच खरा सच्चिदानंद परमेश्वर. श्रीउवा. ३. १३. २०३

मुलगा म्हणजे आईबापांचेंच रूपांतर; हें जसें, तसें स्थिरचर सर्व जग हें केवळ त्या सच्चिदानंदाचें रूपांतर आहे. श्रीउवा.३.१३.२०४

अशा रीतीनें जगाचा व जगापैकीं असलेल्या आपल्या शरीर, जीव, मन यांचा जो सदुपयोग करील, त्यालाच जगापासून सच्चिदानंदाचा पूर्ण अनुभव येऊन, अखंड सुख हातीं येतें; व आपण म्हणजेच सच्चिदानंद व सच्चिदानंद म्हणजे आपण असा अनुभव येऊन जाईल.

श्रीउवा. ३. १३. २०६

तसेंच तुमचें हें शरीर जसें खोक्यासारखें आहे, व त्या शरीराच्या आंतील पोकळींत म्हणजे हृदयांत परमेश्वराचें किंवा मला जर परमेश्वर किंवा सत्पुरुष ठरवलें असलें किंवा नसेल तर निश्चयानें ठरवून माझ्या आकाराचें किंवा कोणत्याहि आकाराचें स्मरण नेहमीं धरून मला किंवा परमेश्वराला तुमचा देह आहे तोंपर्यंत हृदयांत सांठवीत राहिलें म्हणजे मग हें स्थूल शरीर ज्यावेळीं निघून जाईल त्यावेळीं परमेश्वराचा जो आकार धरला असेल तो, किंवा माझा आकार धरला असेल तर तो आकार हें तुमचें नाशवंत शरीर असल्याकारणानें अनुभवास येणार नाहींत. कारण तुमच्या नाशवंत शरीरानें आमचीं नाशवंत शरीरें दिसलीं जातील; परंतु तुमचें नाशवंत शरीर जेव्हां जाईल त्यावेळेस आमच्या स्थूल शरीराचा आकार जरी हृदयांत धारण केला असेल तरी त्याचा अनुभव न येतां आमच्या हृदयांत सच्चिदानंद परमात्मा परमेश्वराचें दिव्य शरीर आहे त्याच आकाराचे तुम्ही असल्याचें तुमच्या अनुभवाला येईल हा सिद्धांत आहे.

श्रीउवा. ३. १. ८

नुसतेपणा कसा असतो त्याचें थोडक्यांत वर्णन केलें आहे; व ' केवल ' ' नुसते ' पणा म्हणजेच सच्चिदानंदाची अवस्था.

श्रीउवा. ३. १. १७

*

## सेवाधर्म

ही स्थिति मिळविण्यास आतांच म्हटल्याप्रमाणें सत्पुरुषांनीं किंवा परमेश्वरानें आपल्या जीवाचें ग्रहण केलें पाहिजे. आपल्या जीवाचें त्यांनीं ग्रहण करावें म्हणून प्रथम आपणं सत्पुरुषाची किंवा परमेश्वराची मूर्ति (आकार) आपल्या मनानें ग्रहण करून हृदयांत सांठविली पाहिजे. म्हणजे सेवाधर्म पूर्ण झाला असें समजावें. श्रीउवा. १. २३. ३४३

आपण सत्पुरुषाची किंवा परमेश्वराची सेवा करणें म्हणजे त्यांचा जो शरीररूपानें असलेला बाह्य आकार, त्यासह त्यांना सहवासाच्या योगें आपल्या पोटांत घ्यावयाचें. म्हणजे त्यांना आपल्या हृदयांत सांठवावयाचें. याचेंच नांव सत्पुरुषाची किंवा परमेश्वराची सेवा. श्रीउवा. १. २३. ३४२

सत्पुरुषाजवळ ज्या करण्या करावयाच्या त्या केल्या पाहिजेत. सेवा म्हणजे आपल्या जीवास त्रास सोसला पाहिजे. ऐहिक सुखासाठीं जसा आपण त्रास सोसतों, तसा परमार्थासाठीं सोसला पाहिजे.

श्रीउवा. १. २६. ४०६

देव म्हणतो, ' जर तुम्हांला माझ्यासारखें व्हावें असें वाटत असेल, तर सेवारूपानें प्रथम तुम्हीं मला आपल्या हृद्यांत घ्याल तेव्हांच तुम्हीं माझ्यामध्यें येऊन माझ्यासारखें व्हाल. ' श्रीउवा. ४. ६. ९८.

सेवा करीत असतांना सेवेचें फळ म्हणून त्या देवतेकडून अगर दुसऱ्या कोणाच्या द्वारें कांहींहि मिळूं लागलें तरी तें आपण घेऊं नये.

श्रीउवा. ४. ३३. ४५१

अशा रीतीनें जर सेवा पूर्ण झाली तर त्या आदिमाया, आदिशक्तीची पूर्ण कृपा तुमच्यावर होईल व कल्पवृक्ष तुम्हांला मिळेल. मग वाटेल तें फळ भोगा किंवा अनंताचा अनुभव घ्या. श्रीउवा. ४. ३३. ४५१

निष्काम सेवेनें कामनाहि पूर्ण होते; व तें अनंत सुखहि मिळतें

म्हणून निष्काम सेवेचें महत्त्व जास्त आहे. श्रीउवा. ४. ३३. ४५४

*

## सोसणें

चांगली वस्तु घाणेरड्यांत जरी असली तरी ती काढून घेण्यासाठीं तेवढ्यापुरती घाण सोसावी लागते. तसेंच अस्सल ब्रह्मसुख अस्सल दुःखांत आहे. त्या सुखाच्या प्राप्तीसाठीं तें सुख मिळेपर्यंत ती दुःखाची बाजूहि सोसावी लागते. भोगून भोगून दुःख संपलें म्हणजे सुख तेथेंच आहे.
श्रीउवा २. १४. २३८

तसें या शरीरांत आपण संभावित आहोंत, व बाकीचा विषयादिक व कामक्रोधादिक परिवार जो जमला आहे तो संभावित नाहीं; म्हणून त्यापासून आपणांस त्रास होतो. आपण जर संभावित असलों तर नानाप्रकारचे विषय व त्यांपासून होणारे कामक्रोधादिक यांचा आपल्याला कंटाळा येईल; व आपण संभावित नसूं तर त्यांच्या सारखेच आपणहि होऊन जाऊं. श्रीउवा. ४. १०. २००

*

## स्वावलंबन

कोणाचाही आधार घेणेंच असेल किंवा कोणावर अवलंबूनच राहणें असेल, तर एक सत्पुरुष किंवा परमेश्वर. यासाठीं आपल्या स्वतःचा आधार घ्यावा. दुसऱ्याचा आधार घेतला म्हणजे स्वाभाविक परमेश्वरी आधार सुटतो व त्यापासून मिळणारें सुखहि अंतरतें. कोणत्याहि ऐहिक किंवा पारलौकिक सुखासाठीं शक्य तितकें परावलंबी नसावें.

श्रीउवा. २. २५. ४३१

दुसऱ्याचा आधार सुटला म्हणजे स्वाभाविक आधार मिळतो. सर्वांचा आधार सोडून कोणावर अवलंबून नाहीं अशी आपली स्थिति झाली, म्हणजे आपल्या स्वतःचा स्वाभाविक आधार आपल्यास मिळतो व खरें सुख लाभतें. श्रीउवा. २. २५. ४३२

*

## सुधारणा

राजकीय लोकांकडून म्हणा वा प्रजाजनांच्या पुढाऱ्यांकडून म्हणा सुधारणांच्या नावाखालीं हल्लीं जे जे व्यवहार होतात, ते सगळे कोणत्या ना कोणत्या प्रकारानें तरी दुःखोत्पादक असल्याचें अनुभवास दिसून राहिलें. पन्नास वर्षांपूर्वीं सुधारणा हा विषय नव्हता तेव्हां दुःखोत्पादक असे बखेडेहि नव्हते. श्रीउवा. २. २४. ४१४

स्वातंत्र्याभिमान स्वीकारून, सुधारणेचा आव आणून, जर बखेडाच करीत बसले, तर आहे त्यापेक्षांहि अधिकाधिक बिघडतच जाणार व तोच अनुभव आजपर्यंत येऊन राहिला आहे. श्रीउवा. २. २४. ४१४

*

## स्वधर्मपालन

कोणत्याहि प्रकारें जगांत कोणालाहि वागावयाचेंच आहे, तर स्वधर्म-पालन करूनच कोणताहि व्यवहार करावा हेंच उत्तम.
श्रीउवा. ४. ९. १८६

हल्लीं व्यवहारांत ज्यांना ज्यांना संकटांतं पाहात आहां, त्यांच्या बाब-

तींत स्वधर्मपालनाच्या चुकीचा परिणाम आहे असें निश्चयानें समजावें.
श्रीउवा. ४. ९. १८७

जसें मद्य-मांस वगैरे न खाणें, अंतर्बाह्य शुचिर्भूत वागणें, कोणतेंहि पाप न करणें, शक्य तितकें पुण्य करणें, दुसऱ्याला उपद्रव न होईल असें वागणें, शत्रुत्व, द्वेषबुद्धि नसणें, देवांची पूजा, देवाविषयीं अस्तित्व-बुद्धि, देवासाठीं उपास वगैरे करणें, कोठेंहि पूज्यभाव ठेवून नम्रबुद्धीनें वागणें, फालतु विषयवस्तूंपासून अलिप्त राहून वासना न वाढविणें, सर्व प्रकारें पवित्रपणानें, निष्कपटानें वागणें इत्यादि हे सर्व श्रेष्ठ धर्मापैकीं कांहीं गुण आहेत. श्रीउवा. ४. ९. १८८

सर्व प्राणिमात्रांचे आत्मे जरी एक आहेत, तरी प्रत्येकाचें शरीर व चामडें भिन्न भिन्न आहेत. पूर्व कर्माला अनुसरून ज्याला ज्या रीतीचें चामडें आणि शरीर आलें असेल, त्याला अनुसरून ईश्वरी संकेतानें जसें ठरविलें असेल तसें वागणें यालाच स्वधर्म म्हणतात.

श्रीउवा. ३. २. २०

असा हा सिद्धांत आहे. जसें चोख्या महार, सजन कसाई, रोहिदास चांभार वगैरे हीन जातींत असूनच त्यांनीं कोणत्याहि प्रकारें मोठेपणाची बरोबरी न करतां अभिमान सोडून आपापल्या धर्माप्रमाणेंच वागत राहिल्या-मुळें, प्रत्यक्ष भगवान त्यांच्या घरीं राबून त्यांना परमेश्वररूप करून नेतले. श्रीउवा. ३. २. २८

शिवाय पापहरण करणारे जे मांग, महार वगैरे लोक असतात, ते आपल्या जातीहून इतर कोणत्याहि श्रेष्ठ जातीची बरोबरी करणार नाहींत व अभिमान धरणार नाहींत, तर त्यांना ईश्वराची नेहमी सहायता राहून ते खऱ्या ईश्वरी सुखांत अखेर जात असतात. श्रीउवा. ३. २. २८

राजा, देव, ब्राह्मण इत्यादि श्रेष्ठ कुलांत त्यांना जन्म यावा असा ईश्वरी संकेत आहे. श्रीउवा. ३. २. २८

## स्वार्थ

जो ईश्वराला दोस्त करूं पाहतो, तो आपली विष्ठा काढण्यास ईश्वराला भाग पाडत नाहीं. देवाच्या गैरसोयी दूर न करितां आपल्याच गैरसोयी दूर करण्यास जो तो पहात असतो. श्रीउवा. १. २६. ४१२

*

## संतति

अशी तयारी झाल्यावर मग त्या मुलांमुलींनीं लग्न केलें, आणि एखाद-दुसरी संतती झाली तर मग काहीं हरकत नाहीं; कारण ती संतति त्याच योग्यतेची होणार. त्या संततीलाहि तेंच वळण लावलें म्हणजे पिढीन्-पिढी सुखावस्थाच येणार. श्रीउवा. ५. ७. १३६

चित्तशुद्धि व सत्कर्में यायोगें पुण्य सांचल्यावर मग जे पुत्र उत्पन्न होतील तेच, जगाच्या व देशाच्या उन्नत दशेला आपल्या बुद्धीचा प्रभाव दाखवतील, किंवा पुण्यसंचय सांचवून जर मरून गेले तर तेच त्या पुण्य-बळाच्या सामर्थ्यानें देशोन्नतीला योग्य अशा बुद्धीचा प्रभाव घेऊनच प्रगट होतील असेंच निश्चित समजावें. श्रीउवा. ५. २२.३५१

आजकाल वाटेल त्या जाति समाजांत वाटेल तशा रीतीनें दरसाल पोरें उत्पन्न करावींत आणि दुसऱ्याला विकून पैसा कमवावा अशी स्थिति दिसून येते. श्रीउवा. २. २०. ३४३

आम्ही म्हणतों, चला भाऊ सर्वच पोरें तुम्ही विकतां तर विका; परंतु कन्या समाजांना म्हणजे स्त्रीसमाजांना विकून, त्यांच्या योगें मुळींच द्रव्य मिळवूं नये. श्रीउवा. २. २०. ३४६

*

## स्त्री समाज

अशा रीतीनें जी स्त्री सेवेसंबंधी सत्करणी केली जाते ही पुरुषांनी इतर सत्कर्मांपैकी श्रेष्ठ सत्करणी समजावी. श्रीउवा. २. ११. १९७

असा स्त्रीसमाज बाळगण्याचें कारण काय ? ज्यांना याचें वर्म कळत नाहीं अशा अज्ञानी लोकांच्या मनांत हें येणें साहजिकच आहे.

श्रीउवा. ५. ६. १०२

चढउतर करण्यासाठीं शिडी एकच असते. तसेंच संसारांत येणें, जगांत उतरणें, हेंहि स्त्रीरूप मायेच्याच योगें होतें व पुन्हां चढून मोक्ष-पदांत जाणेंहि तिच्याच द्वारें होतें. या दोन्ही गोष्टी स्त्रीच्याच स्वाधीन आहेत. श्रीउवा. ५. ११. १८७

★

## ( खरें ) सुख

मग त्या सात्विक गुणाच्या योगें परमेश्वराविषयीं आस्तिक बुद्धी व सत्पुरुषाचा सहवास यांची गोडी उत्पन्न होते. श्रीउवा. १. १७.२४०

व्यवहारी शिक्षण हें ऐहिक सुखासाठीं देण्याची जरूरी असते, परंतु ईश्वरीसंबंधाचें शिक्षण जर पुष्कळ दिलेलें असेल तर त्या शिक्षणाचाच प्रभाव असा आहे कीं, ऐहिक सुखाचा लाभ तर आपोआप होईलच, परंतु खऱ्या परमेश्वरी अखंड सुखाचा लाभहि होतच असतो.

श्रीउवा. ५. २५. ३९१

हल्लींची शिक्षणपद्धति खऱ्या परमेश्वरी सुखाच्या प्राप्तीस किंवा परमे-श्वरास हृदयांत सांठवून त्याचा अनुग्रह व्हावा अशी तर नाहींच आणि

जगाच्या रीतीला अनुसरून ऐहिक सुखाकरतांहि नाहीं.

श्रीउवा. ५. २५. ३९१

परंतु खऱ्या अमरत्व देण्याच्या परमेश्वरी खऱ्या सुखाच्या फळांकडे कोणाचें लक्ष जात नाहीं. श्रीउवा. १. १. ५

इस वास्ते दुनियेमें का सुखका अंगिकार किया तो दुःख भी आनेवालाही है; और दुःखका प्रेमसे जो कोई अंगिकार करे तो परमेश्वरका सच्चा सुख कायमका मिल जाता है. वो ऐसा सिद्धांत है.

श्रीउवा. ३. ३३. ४२९

प्रत्येक मनुष्याला आयुष्यभर व जन्मोजन्मी सुख भोगावें अशीच हौस असते, व ती असणें योग्यच आहे. श्रीउवा. ५. २. १२

परमेश्वरी अनुग्रह संपादन केल्याशिवाय खऱ्या सुखाचा लाभ मिळत नाहीं. श्रीउवा. ५. २५. ३९९

दुसऱ्या प्रकारचें जें दुःख म्हणजे प्रतिबिंबित सुखानंतर येणारें दुःख आहे, तें पुण्याच्या योगें व गुरुकृपेनें येतें, कीं जें दुःख पूर्वींच्या सुख-दुःखाच्या पलीकडील खऱ्या सुखांत घेऊन जातें.

श्रीउवा. ५. २४. ३८६

परंतु दुःख दोन प्रकारचें ठरलें. पहिल्याप्रथम पहिला जो आला, त्यानें दाखविलेलें दुःख हें एक कीं ज्यापासून भूलीचें प्रतिबिंबित सुख उत्पन्न होतें. हें खोट्या सुखाचें स्टेशन मोठें खराब आहे. तें खऱ्या-सुखापासून पहिल्या दुःखांत व त्या दुःखांतून पुन्हां प्रतिबिंबित सुखांत व प्रतिबिंबित सुखांतून पुन्हा दुःखांत असें हें नेहमीं घोटाळ्यांत पाडतें.

श्रीउवा. ५. २४. ३८५

फार दुःखाचा देखावा दिसूं लागला तर अपार सुख जवळ आलें म्हणून समजा. म्हणजे दुःख जें आहे, तें आपलें वाईट करीत नाहीं तर तें आपल्याला सुखरूप अवस्थेंत घेऊन जातें. श्रीउवा. ५. २४. ३८६

खऱ्या सुखाच्या अनुभवासाठीं मध्यंतरीं खोट्या सुखाचा, दुःख पहाण्याचा अनुभव घ्यावा लागतो. म्हणजे जसें जसें दुःख येईल तें भोगणें म्हणजेच आपण सुखाच्या अनुभवांत जातों असें होईल. दुःखच सुख होऊन बसतें; व सुखासाठींच दुःखाची गरज. श्रीउवा. ५. २४. ३८५

मूळ जी केवळ सुखरूप अवस्था त्यांत आपला चैतन्यरूप आत्मा आहेच, व केवळ सुखरूपच ती अवस्था असल्यामुळें त्या आपल्या आत्म्याला सुखाचा अनुभव नाहीं, म्हणून तीच सुखरूप अवस्था मायारूपानें दुःख रूपाला आली; मग तोच चैतन्यरूप आपला जीवात्मा जगांत आल्यावर जितक्या प्रमाणानें दुःखानुभव येईल, त्या मानानेंच ऐहिक किंवा पारलौकिक सुखाचा लाभ मिळवील असें पक्कें समजावें.

श्रीउवा. ३. ४. ७२

ऐहिक सुखापासून अंतीं दुःखाचा आरशासारखा प्रत्यक्ष अनुभव येत असूनहि हें जग आंधळ्यासारखें चालतें. श्रीउवा. ३. ४. ७०

ऐहिक सौख्य भोगीत असतां, दुःखासाठीं पापाची तयारी होतच रहाते; ऐहिक सुख भोगणें हेंच मुख्य पाप आहे. श्रीउवा. ३. ४. ७०

सर्व प्रकारच्या व्याधी दूर होऊन इहलोकीं सर्व प्रकारें आरोग्यता असावी व अंतीं अजरामर शरीर मिळून ईश्वरी सुखाचा लाभ व्हावा, अशी जर कोणाची खरोखर दृढ इच्छा असेल तर त्यानें जगांत आल्यावर जगाच्या रीतीप्रमाणें शारीरिक व सांसारिक जे योग्य व्यवहार असतील ते करीत राहून आपापलीं स्वधर्माचरण, सत्कर्में व ब्राम्हणद्वारा करून घेण्याला योग्य अशीं पुण्यकर्में अनुकूल असल्यास देवळें वगैरे बांधण्याकडे आपल्या शरीर, मन, जीवाचा उपयोग करीत रहावा.

श्रीउवा. ३. ४. ६७

त्याचप्रमाणें परमेश्वरी उपायापासून उत्पन्न होणारी जी गुप्त शक्ति ती ज्याच्या जवळ जितक्या प्रमाणाची असेल तो तितक्या प्रमाणाचें सुख

भोगण्यास अधिकारी होतो. श्रीउवा. ५. १३. २२७

व्यवहारी सुख संकोचित व तें प्रयत्न करीपर्यंतच आहे; व प्रयत्न करणारांची संख्या वाढली, म्हणजे त्या सुखाचाहि पुरवठा कमी होऊन त्याचा अभाव होतो. हें परमेश्वरी सुख किती आहे याचा अंत नाहीं.

श्रीउवा. ५. ७. १२४

अशा ईश्वरी इच्छेनें आलेल्या अकृत्रिम दुःखाची खूण कोणती ? तर कितीहि दुःखें व कशींहि संकटें आलीं तरी दुःख, संकटाचा कंटाळा न वाटतां, एक प्रकारची गोडीच असते. शिवाय परमेश्वराच्या गुणानुवादाचीहि अत्यंत गोडी वाटते. श्रीउवा. २. २४. ४०१

मनरूपानीं असलेल्या पवित्र विष्णूला व्यवहारांत अपवित्र कामांत दुरुपयोगांत आणाल तर त्याप्रमाणें जन्मोजन्म कृत्रिम दुःखाचें फळ मिळेल. श्रीउवा. २. २४. ४०५

तो विष्णू पूर्ण पवित्र अवस्थेंत तुमच्या मनरूपानीं आहे. तर विष्णूचे जे गुणधर्म आहेत, तशा गुणधर्माप्रमाणेंच त्याला आपल्या हृदयांत पवित्र ठेवाल व सदुपयोग करून घ्याल तर विष्णूसारखें अखंड अपार ऐश्वर्य त्रिभुवनांत कोणाचेंहि नाहीं, तें तुम्हांला मिळेल.

श्रीउवा. २. २४. ४०४

कोणाच्याहि रूपानें त्याला अनेक प्रकारच्या दुःखसंकटांतून काढून ऐहिक सुखाचा व खऱ्या अखंड सुखाचा लाभ करून देण्याविषयीं त्याचें ग्रहण करूं लागतो. श्रीउवा. ५. २५. ४००

★

## शत्रु

आपला शत्रु शुद्ध होणें म्हणजे जसें आपणच शुद्ध होणें.

श्रीउवा. ४. ८. १७२

तसेंच शत्रूहि आपलाच आहे म्हणून शत्रूच्या ठिकाणींहि आपले-पणामुळें आपलाच आत्मा असतो. मग शत्रूसुद्धां आपला अवयवच झाला. मग तो नको का शुद्ध व्हावयाला ?

श्रीउवा. ४. ८. १७२

द्रव्यद्वारा कोणी सेवा करतात हेंहि उत्तमच आहे; कारण द्रव्य मिळ-विण्यास तरी शरीर, जीव, मन, बुद्धि हीं झिजवावीं लागतात.

श्रीउवा. ३. २८. ३८६

जीवाचें जीवपण मोडण्याकरतां पुष्कळ उपाय आहेत; त्यांपैकीं कष्टाचीं कामें करणें हा एक आहे. श्रीउवा. ३. २८. ३८५

तशाच रीतीची कोणतीहि सत्क्रिया किंवा असत् क्रिया सुरू झाल्या-बरोबर त्या क्रियेचें फल अदृष्ट रीतीनें आहेच. श्रीउवा. ३. २८. ३९१

*

## शारीरिक कष्ट

म्हणून सेवेकरतां शारीरिक कष्टाची योग्यता श्रेष्ठ आहे.

श्रीउवा. ३. २८. ३८६

जितका रिकामा वेळ मिळेल, तितका वेळ लिहीतच बसावें. स्वतंत्र हात कांहीं श्रीराम हें लिहूं शकत नाहीं, तर तोंडानें किंवा विशेष करून मनानें राम, राम म्हणत गेल्याशिवाय हात राम राम लिहूं शकतच नाहीं. असें करीत करीत नित्य नेमानें पुष्कळ काळ कांहीं वर्षें असें करीत राहिलें, तर त्याचा परिणाम सुद्धां स्वप्नांत किंवा केव्हांहि स्थिर वृत्ति असतांना, शरीरभान न राहतां, आपण जरी श्रीराम लिहीत नसलों तरी आपण स्वतः श्रीराम हें लिहीत बसलों आहोंत असा देखावा आपल्या शरीराचा दिसूं लागेल. श्रीउवा. ३. २८. ३८८

नाशवंताचें रक्षण करणें हें अज्ञान आहे, तथापि शरीर चांगलें व्हावें याकरितां करणी करणें असेल तर परमेश्वराचें शरीर आहे असें समजून करावी. श्रीउवा. ३. ३. ६४

आपण शरीरावर प्रेम करतों, पण तें आपल्यावर करतें काय ?

श्रीउवा. ३. २५. ४३२

शरीर सुद्धां आपलें नाहीं, तें बेईमान होऊन सुटून जातें.

श्रीउवा. २. २५. ४३२

आपलें खरें शरीर स्वाभाविक, अजरामर आणि दिव्य असें आहे.

श्रीउवा २. २५. ४३३

सूक्ष्म शरीराची ओळख होऊन त्या शरीरांत शुद्ध आत्मरूपानें आपण असणें व परमेश्वरी अनुभव घेणें या अभ्यासाचें पूर्णत्व होईपर्यंत स्थूल शरीराची गरज असते. श्रीउवा. १. २. ३४

तसा जीव कोणाचें तरी शरीर घेऊन त्यांत राहतो.

श्रीउवा. २. २५. ४३२

म्हणून प्रत्येकानें शरीराला फालतु संसारी किंवा वाईट क्रियेचें वळण लावण्यापेक्षां परमेश्वरी सत्क्रियेचेंच वळण लावून आपल्या शरीराला परमेश्वराचेंच देवळासारखें घर बनवावें; आणि त्या सत्क्रियेनें तें बनतच असतें. शरीरहि दीर्घायुषी होऊन त्याला अजरामर स्थिति येते.

श्रीउवा. ५. २१. ३४१

जसजसें तें शरीर ईश्वरी रीतीचें बनत जातें, तसतसा आपला जीवहि परमेश्वरी रीतीचा बनला जातो; आणि जसजसा जीव परमेश्वरी अवस्थेंत जातो, तसतशा आंत अनेक देवता व सुखदायक अवस्था प्रगट होत राहतात. मग इतर देवालयांप्रमाणें तें शरीर व आंतील जीव जगाच्या कल्याणाला उपयोगी पडूं लागतो.

श्रीउवा. ५. २१. ३४१

आपण मरून जातों, शरीर नाहींसें होतें, आपल्यास राहण्यास जागा नसते, शरीराशिवाय राहतां येत नाहीं म्हणून आपल्या कर्माप्रमाणें कोणाच्या तरी शरीरांत घुसावें लागतें. श्रीउवा. ५. २५. ४३३

मग तें महाराचें असो, मांगाचें असो, त्यांत घुसावें लागतें. त्यांत घुसूं देतात, परंतु त्या ठिकाणीं जो कोणी होता तो म्हणतो, " माझ्यासारखें वाग. " चांभाराचे शरीरांत शिरला तर जोडे शिवावे लागतात. महाराचे शरीरांत घुसून मेलेलीं ढोरें ओढावीं लागतात. चांगल्याच्या शरीरांत घुसलें तर चांगलें होतें. चांगलें शरीरही दुसऱ्याचें व वाईटहि दुसऱ्याचें, आपलें कांहींच नाहीं. श्रीउवा. ५. २५. ४३३

★

## लग्न

आतांचें लग्न न देहाशीं न मनाशीं, मग आत्म्याशीं किंवा परमेश्वराशीं कोठून लागणार ! श्रीउवा. ३. ४. ७९

शरीर हें परमेश्वरप्राप्तीकरतां किंवा परमेश्वराशीं लग्न लावण्याकरतां साधन आहे. श्रीउवा. ३. ४. ७९

दोन्ही शुद्ध आत्म्यांचें लग्न लागतें, तेव्हां परस्परांना परमेश्वराशीं लग्न लावल्याचा अनुभव येतो; यालाच म्हणावें खरें लग्न.

श्रीउवा. ३. ४. ७९

अशा सर्व शरीराचा देवाच्या पूजेसाठीं उपयोग करावा लागतो.

श्रीउवा. ४. ७. १३१

प्रत्यक्ष रीतीनें ज्या ज्या मनुष्याच्या उपभोग्य विषयवस्तु असतात, त्यांत आपल्या भोग्य वस्तूंपैकींच सर्व पूजेचें सामान बनवून त्यायोगें देवाची पूजा करावयाची. श्रीउवा. ५. ७. १३०

आमची अट अशी आहे कीं चोवीस किंवा निदान कमींत कमी एक तास तरी माझ्यासाठीं अर्पण करा. श्रीउवा. २. २९. ५००

तें जेव्हां पूर्णपणें अर्पण केलें जाईल, तेव्हांच आपण शुद्ध राहिलों. श्रीउवा. १. २६. ४१५

माझ्या पायां पडाल तर मी तुम्हांला आपल्यासारखें करीन. माझें वाटोळें झालें तसें तुमचेंहि होईल. वाटोळें म्हणजे ज्ञान, व ज्ञान म्हणजे जगापैकीं ‘ न कळणें ’, आणि ‘ न कळणें ’ म्हणजे जागृतावस्थेंत जगापैकीं कांहीं जाणीव न होणें म्हणजे दुःख. तेंच दुःख सुखरूप अवस्थेंत नेतें. श्रीउवा. ४. १२. २६१

जीव, मन, धन व जेवढा म्हणून तुझा परिवार आहे तो जर परमेश्वराचाच किंवा सद्गुरूचाच आहे, असें पक्कें ठरविण्याच्या रीतीनें जर संबंध जोडून ठेवला जाईल, तर तुझे दोष तुला न लागतां सर्व दोषांचे अधिकारी सद्गुरु किंवा परमेश्वरच होतील व त्यांच्याकडील सर्व सुखाचा संबंध तुझ्याकडे जोडला जाईल. श्रीउवा. १. २१. ३१४

कोणाचाहि जीव माझ्या ताब्यांत आल्याशिवाय मी कांहीं करीत नाहीं. श्रीउवा. १. २६. ४०४

*

## हरण ( सर्व )

गुरुकृपेनें सर्व वित्त हरण झालें, म्हणजे अशी स्थिति होते. म्हणजे सर्व वित्त हरण होतें. आपलें शरीर समजत नाहीं, तेव्हां जगहि समजत नाहीं. श्रीउवा. १. २०. ३०५

*

## रोगी ( पूर्ण )

जो पूर्ण रोगी असेल तोच खरा डॉक्टर अथवा वैद्य. ग्रंथांचा अभ्यास करून त्या आधारें परीक्षा करण्यापेक्षां स्वतःच त्या रोगाचा अनुभव घेऊन त्या रोगाची चिकित्सा करणें उपयुक्त असतें.

श्रीउवा. १. १८. २५१

*

## वैराग्य

सत्कर्मानें पुण्य संपादन करीत गेलें म्हणजे, नाशवंत विषय/संबंधानें असलेला त्याचा अहंकार, कमी कमी होत जातो. यासच " वैराग्य " म्हणतात. श्रीउवा. २. १०. १७४

आतां ह्या ज्ञानासह आत्मसुखांत कोण गेला ? तर मनुष्यरूपानें जीवावस्थेंत आलेला शुद्ध चैतन्यरूप परमेश्वरच, स्वधर्माचरणाच्यायोगें मनुष्याच्या रजोगुणी जीवावस्थेंतून मुक्त होऊन, तोच आपल्या खऱ्या आत्मसुखांत गेला. किंवा मनुष्यच आपल्या जीवावस्थेंतून मुक्त होऊन परमेश्वरपदाच्या सुखांत गेला असें म्हणा. श्रीउवा. २. १०. १७४

तसेंच जोंपर्यंत सद्गुरुकृपा होऊन परमेश्वराशीं आपला संबंध जोडला जाऊन, परमेश्वरी सुखाची, त्या ब्रह्मानंदाची गोडी लागली म्हणजे पुढें त्या जगाच्या बाजूचा कंटाळा येऊं लागतो. श्रीउवा. २. १०. ११५

ईश्वरी घटना अशी आहे कीं, जसजशी ईश्वराविषयीं गोडी उत्पन्न होते व जगाची व ऐहिक सुखाची गोडी नाहींशी होत जाते, तसतसें जगाचें सुख नकोसें वाटत असूनहि जगांतील सुखहि, तें बळें होऊन येऊंच लागतें. श्रीउवा. २. १०. १७५

स्वधर्माचरणानेंच परमेश्वराची बाजू धरून राहिलें तर, ऐहिक आणि परमेश्वरी, अशीं दोन्हीहि सुखें, अनायासेंच प्राप्त होतात.

श्रीउवा. २. १०. १७७

*

## श्रद्धा

जगापैकीं कोणत्याहि गोष्टींविषयीं आंधळेपणा; म्हणजे सर्व प्रकारांनीं दुर्लक्ष असणें आणि देवापैकीं कोणतेंहि जें कांहीं धरलें गेलें असेल, तें कोणत्याहि प्रकारें त्याचें ज्ञान होवो न होवो, त्याला कांहीं विघ्नें येवोत न येवोत, बरें असो वाईट असो. कशाहि स्थितीमध्यें तें सोडलें जात नाहीं किंवा सोडावयाचेंच नाहीं अशा दृढ निश्चयानें पूर्ण धरून ठेवणें व एकाच विश्वासवृत्तीनें असणें त्याचें नांव अंधश्रद्धा. श्रीउवा. १. ६. १०५

अंधश्रद्धेपासून व्यवहारांतहि केव्हां केव्हां उपयोग झाल्याचीं उदाहरणें आहेत. अंधश्रद्धा म्हणजे एक प्रकारचा विश्वास. श्रीउवा. १. ६. ९६

वाटेल तसें वेदवेदांचें अर्थपांडित्य वाढवून मनाचें चांचल्य अधिक करणें बरें, किंवा वेदाक्षरांवरती किंवा भगवन्नामाक्षरांवरती एक विश्वास ठेवून मनाचें चांचल्य अंधश्रद्धेनेंच गेलेलें बरें हें ज्याचें त्यानें धोरण पहावें. श्रीउवा. १. ६. ९८

सद्गुरु आंतल्याआंत गुप्तपणें कोणास ब्रह्मज्ञानाची किंवा आत्मज्ञानाची खूण समजावून देतात ? तर अंधश्रद्धेनें ज्याचें मन सुसंस्कृत निश्चल झालें असेल त्याला. श्रीउवा. १. ६. ९३

जगाविषयीं किंवा जगांतील कोणत्याहि गोष्टींविषयीं आंधळ्यासारखें व्हावें म्हणजे जगांतील कोणत्याहि गोष्टीविषयीं दुर्लक्ष करून परमेश्वरापैकीं कांहींहि हृदयाशीं पक्कें करून घेणें. श्रीउवा. १. ६. १०५

त्यांच्या त्यांच्या गुणांचा आरोप त्यावर करून, आपण आपला हेतु साध्य करून घेतों, व साध्य होतोहि पण जो पूर्ण आरोप करील, त्याचाच कार्यभाग होईल, इतरांचा होणार नाहीं.

श्रीउवा. १. २२.३३५

मानवी देह किंवा इतर कोणत्याहि चैतन्य आकारांत, स्वतःच्या अस्तित्वाची थोडी जरी जाणीव झाली, तर तें शुद्ध चैतन्यच "अहंकार" या रूपाला येतें, याच काळांत अहंकाराचें द्योतक "मी" (अहम्) स्वरूपाची उत्पत्ति होते. श्रीउवा.. २. १०. १६९

त्याच अहंकाराच्या योगें, तेंच शुद्ध चैतन्य, अभिमान स्वीकारून आपल्या अस्तित्वाचा विचार किंवा मनन करूं लागलें, म्हणजे त्या शुद्ध चैतन्यालाच "मन" अशी संज्ञा प्राप्त होते. श्रीउवा. २. १०. १६९

जसें, प्रिय वस्तु सत्पुरुषांस किंवा परमेश्वरास अर्पण करून आत्मशुद्धि होते, तसेंच कोणत्याहि प्रकारें अभिमान नष्ट झाला, तरीहि आत्मशुद्धि होऊन, सत्पुरुषाची किंवा परमेश्वराची कृपा होते.

श्रीउवा. २. ९. १५९

विषयाचें ज्ञान होण्यापूर्वी तेंच शुद्ध चैतन्य त्या मनाच्या योगें केवळ शरीरपोषणापुरतीच वासना धारण करूं लागलें म्हणजे, त्या वासनात्मक अवस्थेमुळें, त्या शुद्ध चैतन्याला "जीव" किंवा "जीवात्मा" ही संज्ञा प्राप्त होते. श्रीउवा. २. १०. १६९

ह्याच जीवात्म्याकडून कर्म करण्याकरितां निश्चयात्मक अवस्था होण्यापूर्वीं, कर्म कसें करावें, असें करावें का तसें करावें अशा कार्याच्या जाणीवेच्या अनिश्चित स्थितींत जें चिंतन केलें जातें, त्याला चित्त म्हणावें.

श्रीउवा. २. १०. १७०

कार्य करण्याचें निश्चित ठरलें गेलें म्हणजे त्याला बुद्धि म्हणतात.

श्रीउवा. २. १०. १७०

यावरून जीव, अहंकार, मन, चित्त, बुद्धि हे सगळे, एका त्या शुद्ध चैतन्याचेच प्रसंगानें निरनिराळे प्रकार झाले आहेत.

श्रीउवा. २. १०. १७०

तो जीव मनष्यरूपानें मुळ आनंदरूप अशा शुद्ध चैतन्यास विसरून, या दुःखरूपी भवसागरांत वासनेच्या पाशांत सांपडून गटांगळ्या खात जन्ममरणाचे हेलपाटे खात राहतो.

श्रीउवा. २. १०. १७०

आतां सात्त्विक गुणाचा आश्रय न करितां, जो जीवात्मा रजोगुणाला स्वीकारून जरूरीपेक्षां अधिक हांवरे धरून, खोट्या विषयसुखाच्याच वासना वाढवीत राहातो, तो आपले ठिकाणीं ज्या ज्या विषयांचा कमीपणा असेल, तो भरून आणण्याकरितां सखल भागाकडे पाण्याचा ओघ जसा वेगानें जातो, तसें त्या मनाचा ओघ विषयाकडे अतृप्तपणें वारंवार जोरानें धांव घेतच राहतो, व त्या विषयाशीं संलग्न होऊन रहातो.

श्रीउवा. २. १०. ११२

ही अहंकाराची व मनाची संक्षेपानें व्याख्या सांगितली.

श्रीउवा. २. १०. १६९

*

## ( खरें ) ऐहिक सुख

नेहमी मनाची समाधानवृत्ति असते; चिंता, काळजी हा विषय नसतो. जीवाला मनाला तळमळ नसून शांतता असते; फालतु वासनेची वाढ नसते. पुष्कळ जरी असलें, तरी त्यायोगे दुःखाला कारणीभूत अभिमान, गर्व, ताठरपणा हे नसतात व समाजात आपसांत मत्सरादिक दुर्गुणांच्या योगें मनाची दुःस्थिति नसते.

श्रीउवा. १. ३. ४१-४८

त्या आनंद लहरींत उत्पन्न होणारे जे सूक्ष्म परमाणू तेच ईश्वरी श्वासोच्छ्वासांतील आनंदरूप परमाणू. तेच सर्व प्रकारांनीं आपल्याला सौख्य देणारे आणि रक्षक होतात. श्रीउवा. ३. १५. २२३

कोणताहि मनुष्य आपल्या दृष्टीस पडूं नये, व आपणहि कोणाच्या दृष्टीस पडूं नये अशी मनाची दृढ भावना होऊन त्या उमेदीच्या जोरांत त्या विकट कपारींत जाऊन बसलों मग महाराज जसजसा जगाचा विसर पडत जातो, आणि आनंदाच्या लहरी एकामागें एक उत्पन्न होतात त्याचें वर्णन काय सांगावें ? श्रीउवा. ३. १५. २२३

* * *

## "श्रीउपासनी कन्याकुमारी-स्थान, साकुरी" येथें केलीं जाणारीं सत्कर्में

१. **अभिषेक :** श्रींच्या पादुका (समाधि), श्रीदत्त, श्रीगणपती, श्रीशंकर, श्रीशनी, श्रीमारुति, श्रीखंडोबा आदि देवतांवर पाणी, दूध, उसाचा रस तेल. पंचामृत आदि द्रव्यांनीं एकादशिनी, लघुरुद्र वगैरे; "कन्या" द्वारां झोंपडींत व ब्राह्मणद्वारां मंदिरांत.

२. **महापूजा :** श्रीबाबा, श्रीसती, माताजी, श्रीदत्त वगैरेंची.

३. **श्रीसत्यनारायण पूजा :** "कन्यां" च्याद्वारें-विशेषतः झोंपडींत पौर्णिमेस व अमावास्येस व ब्राह्मणद्वारां श्रीदत्तमंदिरांत-कोणत्याहि दिवशीं.

४. **यज्ञयाग :** पुढें निर्देश केल्याप्रमाणें याग या स्थानांत होत असतात. त्यांचा सर्व अगर यथाशक्ति खर्च देऊन संकल्प सोडणे, किंवा त्यांचेसाठी हवनद्रव्य तूप, नारळ वगैरे देणें.

(१) श्रीरामयाग—चैत्र शु. अष्टमीपासून पौर्णिमेपर्यन्त.

(२) श्रीविष्णुयाग—वैशाख व. दशमीपासून अमावास्येपर्यंत.

(३) श्रीसद्गुरुयाग—आषाढ शु. नवमीपासून आषाढ व. प्रतिपदेपर्यन्त.

(४) श्रीचंडीयाग—ब्राह्मणद्वारां श्रीदत्तमंदिरांत श्रावण वद्य पक्षांत संपुटित नवचंडी.

(५) श्रीगणेशयाग—भाद्रपद शु. तृतीयेपासून भाद्रपद शु. चतुर्दशीपर्यन्त.

(६) श्रीचंडीयाग—आश्विन शु. प्रतिपदा ते आश्विन शु. नवमीपर्यन्त.

(७) श्रीसूर्ययाग—मकर संक्रमणानिमित्त तारीख १ जानेवारीपासून १५ जानेवारीपर्यन्त पौष महिन्यांत

(८) श्रीरुद्रयाग— महाशिवरात्रीनिमित्त माघ वद्यांत अकरा अगर कमी दिवसांचा, पूर्णाहुती महाशिवरात्रीचे दुसरे दिवशीं.

चैत्र शु. नवमी श्रीरामनवमी–श्रीदत्तमंदिरांत श्रीरामजन्माचें कीर्तन व दुपारी १२ वाजतां श्रीरामजन्म, पालखीमहोत्सव, श्रीरामयाग हवनास आरंभ झोपडींत व श्रीदत्तमंदिरांत नामसप्ताह, श्रीअध्यात्म रामायणाच्या पारायणाची समाप्ति.

चैत्र शु. पौर्णिमा : श्रीहनुमान जयंति–पहांटे स्नान वगैरेची घंटा २॥ वाजतां, श्रीदत्तमंदिरांत काकड आरतीला सुरुवात ३॥ वाजतां, झोंपडींतील काकड आरतीनंतर श्रीदत्तमंदिरांत श्रीहनुमान जन्माचें कीर्तन व सूर्योदयास श्रीहनुमान जन्म, पालखीमहोत्सव, श्रीरामयागाची पूर्णाहुती.

वैशाख व. द्वितीया : **श्रीउपासनी महाराज जयंति**—श्रींची महापूजा, श्रीदत्तमंदिरांत श्रीजन्माचें कितन व रात्रीं ८ वाजतां श्रींचा जन्म, पालखी महोत्सव, झोंपडींत श्रीसत्यनारायण पूजा कितन वगैरे वेळेनुसार. ( श्रींचा जन्म वैशाख व० २, शके १७९२, तारीख १५ मे १८७० इ )

आषाढ शु. पौर्णिमा : **गुरुपौर्णिमा** :—श्रीदत्तमंदिरांत पूजा झोंपडीत श्रींच्या पादुकांची महापूजा व वेद घोषसहित भक्तमंडळींकडून श्रीचे पादुकावर पाणी घालणें, गुरुपूजन, श्रीमाताजींची भक्तमंडळींकडून पूजा, श्रीसत्यनारायण, पालखीमहोत्सव कीर्तन वगैरे.

' सच्चिदानंद-सोपाना ' चे शिल्पकार श्रीसंत उपासनी महाराज हे श्रीसाईबाबांचे सच्छिष्य. श्रीसाईबाबांच्या पारमार्थिक जीवनाचा कीर्तिगंध साऱ्या महाराष्ट्राला व्यापून भारतांत दूरवर दरवळलेला आहे.

नाशिक जिल्ह्यांतील सटाणें गांवचें उपासनी घराणें पांडित्य आणि परमार्थ या दोहींची एकसाथ उपासना करणारे. मुल्हेरच्या श्रीउद्धवमहाराजांचे अनुगृहीत असलेल्या या पंडित घराण्यांत श्रीउपासनीबाबांनीं जन्म घेतला. कांहीं काळ गृहस्थाश्रमोचित उद्योग-व्यवसायानिमित्त महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं निवास केल्यावर पूर्वसंचिताच्या बळावर त्यांना श्रीसाईबाबांच्या अनुग्रहाची प्राप्ती झाली. आणि त्यांचें सारें जीवन अंतर्बाह्य उजळून निघालें. श्रीसाईबाबांच्या शिर्डीपासून जवळच असलेल्या साकुरी गांवीं महाराजांनीं आपलें परमार्थ-जीवन व्यतीत केलें आणि त्याच ठिकाणीं अनेक आर्त जीवांना परमार्थाचा महामंत्र देऊन १९४१ डिसेंबरमध्यें महासमाधीचा स्वीकार केला.

••

आज त्यांचा पारमार्थिक वारसा सती गोदावरीमाता या दिन-प्रतिदिन समृद्ध करीत आहेत. त्यांच्या प्रेरणेनें महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेरहि श्रीउपासनीबाबांच्या विचारांचीं चैतन्यबीजें पेरलीं जात आहेत. हा ' सच्चिदानंद-सोपान ' त्याच चैतन्यबीजांचा वाङ्मयावतार आहे.